1621

॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# मुमुक्षूचें सिंहावलोकन

म्हणजेच

## मुमुक्षूंतील निवडक निबंध



### भाग तिसरा.



संपादक व प्रकाशक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

मुमुक्षु कचेरी, पुणें शहर.



किंमत रु. १०४

# मुमुक्षूंतील निवडक निबंध

## तिसऱ्या भागाची प्रस्तावना.



मुमुक्षूंतील निवडक निबंधांचा हा तिसरा भाग स्वतंत्र पुस्तकरूपानें आज प्रसिद्ध होत आहे. पहिले दोन्ही भाग ६ वर्षांपूर्वी म्हणजे शके १८४५ सालीं प्रसिद्ध झाले. पाहिल्यांत २८ व दुसऱ्यांत ३५ असे दोन्ही भागांत मिळून ६३ निबंध आले आहेत. पहिल्या भागाला सिंहावलोकनाची सविस्तर प्रस्तावना जोडली असून तींत तेथपर्यंतच्या कार्याचा आढावाही दिला आहे. पहिल्या भागांत ईश्वर-विषयक संवाद, मूर्तिपूजा, श्रीरामजन्मोत्सव, श्रीकृष्णावताराची माधुरी, राष्ट्रीय प्रार्थना, पंढरीची यात्रा व पालख्यांचे समारंभ, वेदांताचा व्यवहारांत उपयोग, घंटा, होळी व शिवलिंग यांचीं रहस्यें, हिंदूधर्म व हिंदुधर्माची योग्यता, आमचे पुढारी संतच, भक्तिमीमांसा, डिप्रेस्ड क्लासेस मिशन ऊर्फ पंढरीचा भागवतसंप्रदाय इ० महत्वाच्या विषयांवरील निबंध आलेले आहेत. दुसऱ्या भागांत आईचा पराक्रम, एक गांवढळ तत्वज्ञ, एका गाणेशाची गोष्ट, मामामामींचा संसार, सती आवडाबाई, सतीचें आत्मतेज, शेतकऱ्याची गोष्ट वगैरे मनोरंजक, बोधप्रद व प्रत्यक्ष घडलेल्या ७।८ गोष्टी दिल्या असून धर्माकडे केव्हां वळणार, सुखाची दिवाळी, भागवत-धर्माचें मंदिर, मातृभाषेचें प्रेम, दयेचे प्रकार, वेदांताचीं चार मतें, वाङ्मयतप, गोपाळराव आगरकर, बालविवाह व प्रौढविवाह इ० विषयांवरील निबंध आले आहेत. प्रस्तुतचा तिसरा भाग अंमळ लहान आहे तरी यांतहि तामील भाषेंतील एक अपूर्व कथा, दोन सुंदर गोष्टी, ग्रंथ व ग्रंथसंग्रहालयें, हिऱ्याची आंगठी, त्यागाचा अभ्यास, साधुसंतांच्या मेळ्यांतल्या मौजा, अद्वैतबोध, पारिजातकाचीं ताजीं फुलें, त्रिगुणांचे धर्म, समाधानाची गोष्ट, संत माताजीची गोष्ट, श्रीशारदास्तोत्र (काव्य), शारदेचें स्वरूप, सुधारकांनो ! सावध व्हा, आरोग्य–ब्रह्मचर्य व देश-सेवा, राजवाडे, दक्षिण महाराष्ट्रांत संचार व हिमाचल आणि महाबळेश्वर इ० लेख बोधप्रद व मनोरंजक आहेत. मुमुक्षुच्या मुख्य धोरणाप्रमाणें यांतील बहुतेक लेख धार्मिक आहेत, तरी कांहीं वाङ्मयात्मक, कांहीं सामाजिक व वर उल्लेखलेले शेवटचे दोन प्रवासवर्णनपर व सृष्टिसौंदर्यात्मक आहेत. शक्य तितकी विविधता ह्या लेखांत आली आहे असें दिसून येईल. घरीं स्त्रीपुरुषमिश्रित समाजांत वाचण्या-लायक व बोधप्रद सर्वच लेख आहेत. हे तीनही भाग जवळ असले म्हणजे 'मुमुक्षु'ची २१ वर्षांची संगत जोडल्यासारखें होणार आहे.

पुणें, मुमुक्षु कचेरी<br>गणेशचतुर्थी शके १८५१  साधुसंतांचा दासानुदास,<br>**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# अनुक्रमणिका



# १ चतुर्थीच्या दूर्वा

१. हे विघ्ननाशका ! तूं ज्या अर्थी आम्हांस संसारांत आणून ठेवलेंच आहेस त्या अर्थी आमचा संसार असा होऊं दे कीं, संसारांत आम्ही असून नसल्यासारखें वागावें. करून अकर्तेपणाचें वर्म आम्हांस दाखवून दे. प्रारब्धवशात् विघ्नें येतील पण आम्हांला विघ्नोपहत असतांहि निर्भयपणानें वागतां येईल असें सात्विक धैर्य दे. निष्कंपचित्तानें विघ्नांकडे, आपत्तींकडे, शत्रूंकडे स्थिर पाहण्याचें सामर्थ्य आम्हांस दे. आम्हांकडे पाहतांच शत्रूंचा शत्रुभाव व विघ्नांचें विघ्नपण हतप्रभ होऊन गळून पडावें अशी आत्मप्रभा आम्हांला दे.

२. हे विघ्नान्तका ! संसारांत दुःखक्लेश अगणित आहेत, व ते आमच्या पूर्वकर्मांप्रमाणें आमच्या वांट्याला आल्याशिवाय राहणार नाहींत. ते येऊं देऊं नकोस असें ओझें आम्ही तुझ्यावर लादीत नाहीं, पण आमचा स्वरूपानंदाचा सूर्य चिदाकाशांत अखंड तळपत राहूं दे म्हणजे त्यापुढें दुःखक्लेशांचे ढग हां हां म्हणतां वितळून जातील.

३. हे जगन्नाथा ! आम्हांला हवे तितके जन्म दे, पण प्रत्येक जन्मांत तुझ्या चरणांचें अखंड ध्यान व सत्संग हें दे, मग जन्मांला आम्ही भीत नाहीं.

४. मंगलमूर्ते ! आयुष्याची दोरी असेल तोंवर मरण येणार नाहींच. पण मरणसमयीं तुझी मंगलमूर्ति चित्तांत उभी राहूं दे. जिवंतपणींच मरणाला मारून उरण्याची युक्ति दे. जन्ममृत्यूंचे ढग येवोत आणि जावोत, तुझ्या स्वरूपाचें अनुसंधान पळहि न सुटेल असा आत्मारामरवि स्वप्रकाशानें हृदयांत नित्य माध्यान्हकाळच्या तेजानें तळपत राहूं दे.

५. हे चित्स्वरूपा ! हृदयांतलें तम पार हुसकून लाव. सकल इंद्रियांत तुझें स्वरूप भरून ठेव.

६. हे सत्यप्रकाशा ! आमच्या वाणीला, संकल्पाला कृतीला असत्याचे कांटे लागूं नकोस.

७. हे गणनायका ! आमची प्रजा वीर्यवती निपजो. सत्ता, प्रकाश व आनंद यांचा भरतभूमीवर वर्षाव कर. संतति, संपत्ति, अधिकार जे जे चतुर्विध पुरुषार्थ तुला देणें असतील ते तूं स्वतः प्रसन्न होऊन दे. दुसऱ्यापाशीं याचना करण्याचा दुष्ट प्रसंग आम्हांवर आणूं नकोस. दुसऱ्याला संताप दिल्याशिवाय, खलांपुढें मान वांकविल्याशिवाय, साधुमार्गानें जात असतां जेवढें धनधान्य मिळेल तेवढेंच दे.

८. चारी वर्ण आपापल्या धर्माला अनुसरून वागोत. भारतीय प्रजा धर्मनिष्ठ सदाचरणी, शीलवंत होवो. स्त्रिया वीरप्रसव होवोत. दैन्य, दारिद्र्य, दुःसंगति

यांपासून हे मंगलनिधे ! तुम्ही आमचें रक्षण करा. तुमच्या चरणांवांचून आमचा वाली कोणीहि नाहीं.

९. जय भगवंत ! तूं अनंत आहेस. अनेक असून एकमेवाद्वितीय आहेस. निर्गुण व गुणसागर तूंच आहेस. सौंदर्यखनि, सुखमंदिर, अनादि, अजन्म, अनुपम, अनाम व अनेकनाम असा तूंच तूं सर्वत्र भरलेला आहेस !

१०. जय मंगलनिधान ! त्रिविधतापांचा व संसारदुःखांचा नाश करणारा, त्यांची आंच भक्तहृदयाला लागूं न देणारा, तूंच आहेस. वेदांतवेद्य आणि स्वसंवेद्य अशा तुला म्या निरंतर भजावें. तुझी परमपावनी भक्ति आम्हांस दे.

११. देवा ! अद्वैतसिद्धांत माझ्या बुद्धीला पटतो, पण तुझी चरणसेवा, तुझी सगुणोपासना मला सोडवत नाहीं, तिची गोडी अपार आहे.

१२. माझा मनरूप मत्स्य तुझ्या सगुणामृतांत पोहण्याचें सोडीत नाहीं, तुझें सुंदर ध्यान मला पुरे. नेत्राची धणी त्यावांचून फिटत नाहीं.

१३. देवा ! विष्णु तूं, शिव तूं, ब्रह्मा तूंच आहेस. जगदंबा तूंच आहेस. सर्व रूपांत मला तूंच दिसतोस. सर्व भूतांतर्यामीं तूंच एकला खेळ मांडून राहिला आहेस.

१४. श्रुतिसंत सांगतात त्याप्रमाणें तुझ्या भक्तीपरता लाभ कोणताच नाहीं. तुझें भक्तिसुख अखंड दे.

१५. देवा ! तुझ्या नामस्मरणाबरोबर शरीर रोमांचित झालें आहे, नेत्रांतून प्रेमाश्रू लोटत आहेत, साऱ्या विश्वाचा विसर पडला आहे, अशा स्थितींत तुम्ही मला केव्हां कवटाळून धरणार ?

१६. नारायणा ! ज्यांना स्तुतिनिंदा समान झाली आहे व ज्यांचें चित्तच तुझ्या चरणकमलाच्या ठिकाणीं रतलें आहे असे तुझे निर्मळ भक्त भेटावेत म्हणून माझे बाहु पहा ! स्फुरण पावत आहेत.

१७. शांति, वैराग्य, नम्रता आणि प्रसन्नता या गुणांनीं मंडित असे तुझे भक्त मला नित्य भेटोत.

१८. देवा ! तूं गणेशरूपानें नटला आहेस तरी मला तुझ्या ठिकाणीं माझी प्रिय कृष्णमूर्तीच दिसत आहे !

१९. माझ्या डोळ्यांत कृष्णांजन घातलें गेलें आहे. म्हणून मला गणेश व कृष्ण यांत कांहीं भेदच दिसत नाहीं.

२०. सर्वजण जमून आज तुझ्याच ध्यानभजनांत निमग्न झाले आहेत. देवा! सर्वांना तुझ्या प्रेमाची चटक लाव, सर्व निरंतर तुझे प्रेमालाप गातील असेंच यांना प्रेम दे, त्यांचीं दुःखें दूर कर, प्रपंचक्लेशांतून सर्वांना सोडीव.

२१ भक्तांचें राज्य, सुराज्य, स्वराज्य, साम्राज्य सर्व तुझे चरण आहेत. म्हणून भगवंता ! तुझ्या चरणांची अवीट गोडी जन्मोजन्मीं दे !

---

# २ दीनदयाळ हरि.



१

परमात्मा दयाघन आहे असा श्रुतिशास्त्रांचा डिंडिम आहे व भाविकांचा अनुभवही आहे. लोकांवर व माझ्या स्वतःवर आलेल्या अनेक आपत्तींचा सूक्ष्म विचार करून पाहतां शेवटीं हेंच सार निघतें कीं देव दयाळु आहे!

२

ज्यांना आपण आपत्ति, संकटें, विघ्नें, आघात, दुःखप्रसंग असें वरवर पाहून म्हणतों ते सारे प्रसंग भगवंताच्या दयेचेच निदर्शक आहेत असें अनुभवांतीं आढळून येतें.

३

आपत्ति ह्या मोह उडवून जगाचें नश्वरत्व प्रतीतीला आणतात, आपत्तीं-मुळेंच ह्या विश्वाच्या जंजाळापासून क्षणभर तरी दूर सरून आपण आपला विचार करितों, आपत्तींमुळें वैराग्याची शीतळ छाया अनुभवतां येते, आपत्तीं-मुळें ज्ञानांजन डोळ्यांत पडतें, आपत्तींमुळें अहंकाराचें भूत पळून जातें, आपत्तींमुळें ताठरलेलें मन नम्र होतें, आपत्तींमुळें परमेश्वर आठवतो! अशा या आपत्ति आपल्या कल्याणार्थच देवानें धाडल्या आहेत असें विवेक आप-णांस शिकवतो.

४

आमचीं कायावाचामनाचीं कर्में किती अमंगळ असतात हें पाहतां आमच्या दुष्कृतींच्या मानानें आम्हांस भोगाव्या लागणाऱ्या यातना कांहींच नाहींत व हा विचार मनांत येऊन देवाच्या दीनदयाळुत्वाच्या स्मरणांत मी गहिंवरून जातों.

५

'मातृवत्परदारेषु' हा देवाचा कायदा आहे, पण डोळा कधीं तरी पाप करितो कीं नाहीं? 'परस्त्रीतें म्हणतां माता। चित्त लाजवीतें चित्ता' हा अनुभव बहुतांचा आहे. या पापामुळें देवानें आंधळें केलें तर देवाच्या न्यायी-पणास बाध येईल काय? पण हा बाळ आज नाहीं उद्यां सुधरेल, असें मनांत आणून देव आमचे अपराध पोटांत घालीत असतो, यावरून देवाचा दयाळु-पणाच स्पष्ट होतो.

६

मुलगा मांडीवर किंवा लुगड्यावर मुततो, हागतो, पण याला कळूं लागल्या-वर हा 'नाहीं असें करणार' असें मनांत आणून दयाळू माता त्याला धूत

असते ! व वर 'माझा बाळ शहाणा तो' म्हणून त्याचे प्रेमानें पापे घेत असते ! अगदीं असाच देव आहे.

७

मुलाचा बाह्यमळ काढतांना आईही एखादेवेळीं कंटाळेल, पण आमचा अंतर्बाह्य मळ काढून आम्ही शुद्ध व्हावें, शहाणे व्हावें, सुखी व्हावें म्हणून आमच्या दोषांच्या मानानें देव आम्हांला कांहींच शिक्षा करीत नाहीं, असें वाटून देवाच्या वात्सल्यस्मरणानंदांतच मी तन्मय होऊन जातो.

८

फांशीची शिक्षा दिली तरी थोडीच असा भयंकर गुन्हा एखाद्यानें केला असून न्यायाधीशानें त्याला सहा महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा दिली तर आपण त्याला दयाशील म्हणतों. देव अगदीं असाच दयाशीळ आहे. आह्मी पातकांच्या राशी उठवीत असतों, पण दयाळु देव थोड्या आपत्तींच्या दंडावरच आम्हांला सोडतो. असा हाः—

दिनाचा दयाळू मनीं आठवावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥

९

आम्ही पातकांची राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ १ ॥
मना येईल तें तूं करी । आह्मां तारी अथवा मारी ॥ २ ॥

अशा अनन्यभक्तीनें आह्मी त्या दयासागराला शरण जायला हवें.

१०

आपत्ति कोसळल्या तर देवानें ही शिक्षा केली असें न मानतां त्या आपत्तींत प्रगट होणारा देवाचा दयाळुपणाच आह्मीं पहावा व स्मरावा हा जीवाचा परमधर्म आहे.

११

देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥
देव उदार देव उदार । थोडयासाठीं फार देऊं जाणे ॥ २ ॥
देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

१२

चार पोरांनीं गोंधळ मांडला तर आईही त्रासून जाते, पण सर्व जीवांचा मायबाप सर्वांचीं गाऱ्हाणीं नित्य ऐकत असून कंटाळत नाहीं. आमच्या शब्दांकडे त्याचे कान सदा लागलेले ! याला काय म्हणावें ? भगवन्, तुम्ही दयासागर आहांत, उदार आहांत, चांगले आहांत, थोडे घेऊन फार देतां. जीव घेऊन आपलें परिपूर्ण ऐश्वर्य देतां. कवडी घेऊन परीस देतां. मूठभर पोहे घेऊन सोन्याची नगरी देतां ! सोन्याची नगरी कोणती ती आहे ठाऊक ? अमृतरायांना विचाराः—

श्रीकृष्णें सुदामजीला सोन्याची नगरी दिली ॥
स्वानुभूति हृदयामधली ! ॥ ध्रु० ॥

# ३ दर्शनाची आवड



१. हे सांवळ्या श्रीकृष्णा ! तुझें दर्शन दे. दर्शनावांचून माझा जीव कासा-चीस झाला आहे. आतां धीर निघत नाहीं. भेटीवांचून कशाचीही चाड नाहीं. पाण्यावांचून मत्स्य तडफडतो, किंवा जलधारांवाचून चातक कासावीस होतो, अगदीं तसाच, हे मनमोहना ! तुझ्या दर्शनावांचून मी घाबरा झालों आहे. जागृतींत व स्वप्नांत तुझ्याच रूपाचा ध्यास लागून राहिला आहे. या उत्कंठेस तूंच साक्ष आहेस !

२. प्राणविसाव्या गोपालनंदना ! माझे दुर्गुण व माझीं पापें अनंतानंत आहेत. वाळवंटांतल्या कणांपेक्षां अमित आहेत, पण तीं तूं विसरून जा. जिवलगाचे दोष प्रेमाच्या डोळ्याला दिसत नाहींत म्हणतात, हें तूंच खरें करून दाखीव. नाथा ! मी सरळ आहे आणि जन्मोजन्मींचा तुझा दास आहे. कुब्जा दासी तूं प्रीतिपात्र केलीस, मी तिच्यापेक्षां वक्र आहे काय ? अजामेळ्यापेक्षां माझीं पापें अधिक नाहींत, मग देवा, मला भेटायला उशीर कां लावतां ? भगवन् ! व्रजवधूंच्या उत्कंठित प्रेमाची मी बरोबरी करूं शकणार नाहीं. पण म्हणून काय झालें ? तूं दर्शनानें धन्य केलेल्या भक्तांत कितीजण त्यांच्या प्रेमाची बरोबरी करूं शकले, याचाही देवा ! उदारपणानें विचार करा !

३. याचकाच्या लायकीकडे न पाहतां उदारा ! आपल्या मोठेपणाकडे लक्ष देऊन याला दर्शनाची भिक्षा घाला. कोळसा आंतबाहेर काळा, उगाळावा तितका काळाच. तसा मी पापराशि आहे, पण जळदोदारा ! हें तूं विसरून दर्शन देशील तरच तूं उदार खरा आहेस असें मी म्हणेन.

४. माझ्या हृदयांत श्रीकृष्णा ! तुझी मूर्ति अखंड आहे. मस्तकावर मुगुट, कानांत कुंडलें, गळ्यांत तुलसीमाल, मुखांत व हातांत मुरली, दीड पायांवर उभा, सभोंवार गोपाळांचा व गाईंचा मेळा, यमुनातीरची गर्द वनछाया--नाथ ! ही तुमची सुरत स्वप्नांतही माझ्या डोळ्यांपुढून जात नाहीं. माझें चित्त ह्या रूपाच्या ठिकाणींच लगटलें आहे. गंगातीरावर देह आहे, पण यमुनातीरावर माझा मानसहंस बागडत आहे ! देह संसाराच्या हातीं सांपडला आहे. पण चित्त तुला विसंबत नाहीं. नाथ ! खरेंच सांगा, दर्शन केव्हां देणार तें निरोपानें लवकर कळवा, माझा जीव कालाभुला झाला आहे. संतांहातीं तरी एका शब्दानें कळवा.

५. ज्ञानाचा उपदेश तुम्ही दुसऱ्या कोणास तरी करा, मला तो नको. ह्या ग्रंथांत, ह्या उपदेशांत, ह्या ज्ञानांत, हे प्रेममया ! तुझी गोडी नाहीं. तुझ्या दर्श-

नाचा आनंद मनांत येतांच मी देहभान विसरून जातों. मला ज्ञान नको, दर्शन दे; प्रेमभक्तिसुख दे.

६. नाथा! मला एकटयाला येथें टाकून तुमच्यानें मथुरेस राहवतें तरी कसें? खरेंच, माझ्यावांचून तुम्हांला तेथें करमत नसेल, मग उडी घाला, धांवा. मी भेटीची वाट पाहत उभा आहे.

७. हे मनमोहना! काल मी गंगातीरीं तुमच्या रूपाचें ध्यान करीत भटकत असतांना भक्तिप्रेमानंद माझ्या हृदयांत इतक्या वेगानें उचंबळून आला कीं त्या आनंदाला न समावणारा हा देह किती लहान, किती हलका आहे असेंच मला वाटून गेलें. देवा! ह्या आनंदाची भरतीच भरती येऊं द्या. त्याला ओहटी लागूं देऊं नका. प्रेमाला कोणा चांडाळाची दृष्ट लागेल कीं काय अशी मला भीति वाटते. विद्याव्युत्पत्ति ह्या गंगाडोहांत पार बुडवून टाकावी आणि तुझ्या प्रेमविरहानें वेडा होऊन नाचावें, असेच डोहळे माझ्या मतीला होत आहेत. भगवन्! तुझ्या भेटीचें हें मी शुभ चिन्हच समजूं ना? सांग सांग. लवकर सांग. धीर धरवत नाहीं.

८. प्रेमसागरा! तुला धुंडतां धुंडतां माझे पाय, डोळे व मति थकून गेली. तुला नक्की कोठें शोधावें तेवढें सांग. कोणत्या जागीं तुला कसें पहावें एवढें शिकवून दे, बाकीचें सगळें ज्ञान जाऊं दे गंगेच्या लाटांबरोबर वाहत. मला त्या ज्ञानाची चाड नाहीं. सूरदास, मिराबाई, तुकोबाराय, नामदेव, ह्या तुझ्या प्रियभक्तांच्या चरणांचा मी एक रजःकण आहे; पण देवा! तुझ्या प्रेमाचा त्याला स्पर्श होऊं दे कीं तोच आकाश गिळून टाकील. तुझें प्रेम! अहाहा! त्याला कशाची साम्यता देऊं? देवा! प्रेम बडें का तूं बडा, हें स्वमुखानें सांग बरें एकवार!

९. नारायणा! दीनाची लाज व काळजी तुला. दयाळा! अपराधांची क्षमा करून दया कर. तुझ्या चरणकमलाचा आश्रय दे. प्रेममया! प्रेमाचा कण पुरे, तेवढाच दे सारी दुनिया स्वार्थी प्रेमाची आहे, त्या खरकट्या प्रेमाची मला नाहीं गरज. मला तुझ्या दिव्यप्रेमाचा बिंदु दे. भक्तिप्रेमसुखाचा भुकाळु हा दीनदास तुझ्या भेटीची वाट पहात आहे. याचें ध्यान धर, याला विसरूं नकोस. याला पालक, मालक, चालक तूंच एक आहेस.

---

# ४ देवाशीं लडिवाळपणा



१

देवा! सर्वभावें मी तुला शरण आलों आहें, आतां तुजवांचून मी दुसऱ्या कोणाची आशा करावी? तुजवांचून दुसरा कोणी तारक या त्रैलोक्यांत नाहीं अशा विश्वासानें मी तुझे चरण जवळ केले, आणि आतांहि तुझ्याशिवाय इतरांकडे मी पाहिलें तर यांत स्वदासतारक या तुझ्या बिरुदाला कमीपणा येणार नाहीं काय? माझा विचार बाजूला राहो, पण श्रीकृष्णा! तुझ्या बिरुदाला कमीपणा येईल ही कल्पनाही मला अत्यंत असह्य होते. तुझें बिरुद रक्षिलें जावें, तुझा बडिवार जगांत वाढावा, तुझ्या नामाचा डिंडिम जगांत वाजावा, तुझ्यावर प्राणिमात्रांचा विश्वास बसावा, याविना हृदयारामा! खरोखर सांगतों कीं, मला या जगांत कोणतीच वासना नको! म्हणून म्हणतों कीं, आत्मब्रीदरक्षणासाठीं या शरणागत दीनदासाला कृतार्थ कर.

२

पक्वान्नांच्या जवळ बसून भुकेनें मरावें, धनराशीवर बसून याचककर्म करावें, गंगाकिनारीं बसून कूपजलाची इच्छा करावी, हें काय उचित? तसें नारायणा! निकट, हृदयनिवासी, आत्माराम तूं अगदीं संन्निध असतां काय म्यां क्षुद्र वासनांचा दास होऊन रहावें? जीवाच्या जिवलगा! अहो नारायणा! यांत तुम्हांला उणेपणा येऊं पहात आहे!!

३

भक्तवत्सला! सूर्य माध्यान्हीं तळपत असतां अंधकारानें काय उजळ माथ्यानें वावरावें? तूं भक्तकामकल्पद्रुम असें तुझें यश श्रुति, शास्त्र, पुराणें व संत गाऊन राहिले आहेत, मग या पामराचे त्वद्व्यतिरिक्त अन्य सर्व काम एकदम दूर करून कां टाकीत नाहींस?

४

भगवंता! तूं अमृताचा सागर आहेस, तुझ्यापाशीं मागावयाचें काय? तूंच पाहिजेस, इतर क्षुद्र काम नकोत. ते आमची कुतरओढ या संसारांत नित्य करीत असतात. त्यांपासून आमचें संरक्षण करणें भवकेसरीला-तुला काय दुर्घट आहे? अमृततीरीं राहून ऐहिक वासनांचे तुकडे चघळीत राहणें हें काय आम्हांस उचित? देवा! खास नव्हे.

# ५ श्रुतिमाउली व अन्नसंतर्पण.



हिंदुधर्माच्या आचारधर्मांपैकीं अन्नसंतर्पण हें एक प्रधान अंग आहे. एकनाथ महाराजांसारखे महात्मे व अहल्याबाईसारखे धर्मशील राज्यकर्ते यांच्या चारित्र्याला त्यामुळें शोभा आली आहे. याला श्रुतीचा आधार आहे:--

**१ अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ।**
**अन्नेन जातानि जीवन्ति । अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥**

तो भृगु, अन्नच ब्रह्म आहे असा निश्चय करितां जाला. अन्नापासून हीं भूतें उत्पन्न होतात, अन्नाच्या योगें जीवंत राहतात व लीन होतांना अन्नांतच सर्वथा प्रविष्ट होतात.

**२ अन्नं न निंद्यात् ।** अन्नाची निंदा करूं नये, हें उपासकानें व्रत पाळलें पाहिजे.

**३ अन्नं न परिचक्षीत ।** कोणी कोणाला अन्न देत असला तर त्याचें निवारण करूं नये, किंवा पानांत वाढलेलें अन्न टाकून उठूं नये.

**४ अन्नं बहु कुर्वीत ।** अतिथींना देण्यासाठीं पुष्कळ अन्न संपादन करावें.

**५ न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत ।** रात्रींच्या विसाव्याला कोणी अतिथि किंवा पांथस्थ आल्यास त्याला नाहीं म्हणून लावून देऊं नये.

तैत्तिरीयोपनिषदाचा तिसरा अध्याय 'भृगुवल्ली' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यांतून अन्नदानापुरती पंचसूत्री काढून वर दिली आहे. ही श्रुतीची आज्ञा आहे. वस्त्रपात्र विचार करून द्यावें, पण अन्नदान सर्वांसच द्यावें.

**अन्नदानात्परं दानं--विद्यादानमतः परम् ।**
**अन्नेन क्षणिका तृप्तिर्यावज्जीवं च विद्यया ॥**

अन्नदानाहून विद्यादानाची महती ह्या सुभाषितांत अधिक सांगितली असली तरी अन्नदान थोरच आहे. जीवांस अत्यवश्य, सद्यःसंतोषदायी व उभयतांना कल्याणप्रद असें अन्नदान आहे. अन्नार्थी कोणताही जीव विन्मुख जाऊं नये, गेल्यास घराण्याचा पुण्यक्षय होतो. अन्न संतोषपूर्वक, प्रसन्नतेनें, मृदुभाषण करून, याचक ही नारायणाची मूर्ति आहे अशा सद्भावानें, कोणासही द्यावें. 'सर्वांभूतीं अन्नदान । द्रव्यपात्र विचारून' असें तुकोबाराय सांगतात. ज्या पूज्यतेनें देवद्विजांना त्याच पूज्यतेनें 'मुके पांगळे आंधळे आणि थोटे' यांना व पशुपक्ष्यानांही अन्नपाणी द्यावें. हा भूतयज्ञ आहे.

---

# ६ दोन सुंदर गोष्टी.



## १ राधेचें गुरुत्व.

एकदां नारदांची व दुर्वासांची गांठ पडली.

**नारदः**—दुर्वासा ! स्वारी कुठें चालली होती ?

**दुर्वासः**--नारदा ! कालपासून मी तुझेंच स्मरण करीत होतों. पुष्कळ दिवस एक गुप्त गोष्ट विचारायची होती. बरं झालं आज भेटलास.

**नारद**--विचारा, खुशाल विचारा.

**दुर्वासः**--नारदा ! तूं महाभक्त म्हणून गाजला आहेस; सर्वत्र लोक तुझी स्तुति करितात. देव, ऋषि, गंधर्व, दानव, मानव हे सर्व तुला मानतात. तर तुझा गुरु कोण ?

**नारदः**—माझी गुरु राधा.

**दुर्वासः**--काय राधा ? वेडा आहेस झालं. अरे त्या वृंदावनांतली, त्या कृष्णाची राधा तुझी गुरु ?

**नारदः**—होय तीच माझी गुरु.

नारदाची राधेवर एवढी निष्ठा कां याचा दुर्वासास मोठा अचंबा वाटला. राधेची परीक्षा पाहण्यासाठीं ते वृंदावनांत गेले. राधेची भेट घेतली. राधेनें चरणवंदन केलें, आसन देऊन सत्कार केला.

**दुर्वास**–राधे ! तुला लोक भली बुरी म्हणतात. कोणी तुझी स्तुति करितात व कोणी निंदा करितात. तूं भली आहेस कां बुरी आहेस ?

**राधाः**—मला त्याची उठाठेव करून काय करायचें आहे ?

**दुर्वासः**—मग तूं काय करीत असतेस ?

**राधाः**—मी कि नाहीं त्या मुरलीधर भगवंताच्या रूपगुणांचें चिंतन करीत असतें. मला खरेंच त्या चिंतनाचेंच सुख इतकें अपरंपार, अवीट व पोटभर मिळतें कीं, मला भगवत्सुखापुढें माझें असें कांहीं सुचतच नाहीं.

**दुर्वासः**—तें नाहीं मी तुला विचारीत. तूं शुद्ध आहेस का अशुद्ध आहेस, लोक तुझ्या आचरणावर बरी वाईट टीका करीत असतात, म्हणून विचारतों कीं तूं आहेस तरी कशी ?

**राधाः**—तें त्या कृष्णाला विचारा ! मी तुम्हांला एक सांगते कीं, माझ्या

अंतरंगांत त्याच्यावांचून दुसरें कांहींच नांहीं. मी कशीही असले तरी माझा पतकर भगवंतानें घेतला आहे. मी त्याच्या चरणाची अनन्यदासी आहे. लोक मला काय म्हणतात त्याच्याशीं मला काय करायचें आहे ? त्रैलोक्यमंगल नारायण- त्यानें माझा अंगीकार केला आहे. चिंतनसुखांत मला खरोखर माझी आठवणच होत नाहीं. माझ्यांत गुण असले तर तें सर्व त्या प्रभूच्या दयेचें फळ आहे; दोष असले तर गुणदोषांसगट मला हरीनें आपली म्हटल्यावर मी त्या दोषाचें काय लागतें! आणखी खरें सांगूं कां ? मला माझी निंदा करणारांचा मुळीं रागच येत नाहीं, कां कीं माझा प्रभु अनंत ब्रह्मांडांत भरून उरला आहे, तेव्हां निंदकही त्याचींच रूपें नव्हत काय ? मला आपलेपणानेंच त्यांच्याकडे पहावेसें वाटतें, नव्हे माझ्या हरिसुखामृतांत तेही विलीन होऊन जातात व निर्वैरपणाचा आनंद गगनांत मावेनासा होतो. धन्य माझ्या कृष्णाची. धन्य भगवान्, धन्य त्याचें चिंतन व ही भक्तिसुखामृतांत निरंतर पोहणारी मीही धन्य कां नाहीं ? दुर्वासा ! तुम्ही ज्यासाठीं तप करितां तो हरि माझा आहे. मी न् तो एकमय आहोंत. मी कशी आहे हें तोच एक जाणतो.

राधेची तन्मयता पाहून दुर्वासही क्षणभर तटस्थ झाले. इतक्यांत नारद तेथें प्राप्त झाले.

**दुर्वासः**—नारदा ! राधा धन्य आहे. पण कायरे ! अशा सप्रेमभरित भक्तांचीही लोक निंदा कां करितात ?

**नारदः**—हें पहा. ही भगवंताची लीला आहे. परमात्मा अच्युत आहे. तो चुकेल कसा ? भक्ताच्या हातून चुकून कांहीं दोष झाले किंवा घडले असले तर त्या दोषांचें पाप जे निंदा करितात त्यांच्याकडे जातें आणि जे भक्तांची स्तुति करितात त्यांच्याकडे त्यांचें पुण्य जातें! भक्तांचें पाप निंदकांकडे व पुण्य गुणगौरव करणाऱ्या भाविकांकडे जातें. एवंच पुण्यपापविवर्जित होत्साते भक्त कैवल्यपदाचे अधिकारी होतात. देव करितो तें सर्व बरोबर आहे. देवाचे होऊन जावें म्हणजे झालें.

**दुर्वासः**—आतां पुरा उमज पडला.

---

## २ सीता व मारुति यांचा संवाद.

**सीताः**—मारुति ! अरे तुझे आम्हांवर अपार उपकार झाले ते फेडतां येणें नाहीं म्हणून मी प्रेमानें स्वामींच्या सन्निध त्यांच्या अनुज्ञेनें माझ्या गळ्यांतला नवरत्नहार तुझ्या कंठांत घातला आणि तूं हें काय केलेंस ?

**मारुतिः**--आई! मी काय केलें?

**सीताः**--अरे! पुन्हां विचारतोस? तूं लगेच उड्डाण करून त्या समोरच्या अश्वत्थवृक्षावर जाऊन बसलास आणि एकेक मोतीं फोडून टाकून दिलेंस. तूं मोत्यें कां फोडून टाकलींस?

**अंगद** ( आपल्याशींच ):--जाणत्या माणसांचे भाषणांत गूढार्थ असतो असें काका परवां म्हणत होते. मग यांच्या म्हणण्यांत काय बरें रहस्य असावें! सीतामाईनीं मारुतिरायांच्या गळ्यांत आपल्या गळ्यांतला नवरत्नहार घातला म्हणजे त्यांना नवविधा भक्तीचें रहस्य शिकविलें असें तर नाहीं?

**मारुतिः**--आई! आपण मज लेंकरावर दया केलींत. मला त्या हाराचा प्रथम फार आनंद झाला, पण एकेक मोतीं व एकेक रत्न फोडून आंत पाहूं लागलों तों आंत मला राम दिसेना म्हणून तीं मीं सारीं टाकून दिलीं!

**अंगद** ( आपल्याशींच ):—काय रत्नांत आणि मोत्यांत राम नाहीं? संपत्ति आहे तेथें देव नाहीं असा कां अर्थ? कां नवविधा भक्तींपैकीं सर्व प्रकार केले तरी त्यांत राम नाहीं असें समजायचें?

**सीताः**--मग राम आहे तरी कुठें?

**मारुतिः**—दाखवूं? दाखवूं? असें म्हणून मारुतिरायानें आपलें हृदय विदारण करून दाखविलें, उघडें केलें, तों राम आपल्या सहजसिंहासनावर विराजमान झालेले दिसले.

**सीता** ( आनंदित होऊन ):--मारुति! अरे माझा राम तुझ्याही हृदयांत आहे हें पाहून मला फार आनंद झाला. मारुति तुझे माझ्यावर अनंत उपकार आहेत. अरे मी अशोकवनिकेंत असतांना केवळ रामचिंतनानें अंतःसुख मानीत होतें, पण तूं माझा राम मला प्रत्यक्ष भेटविलास. तूं गुरु आहेस.

**अंगदः**—अशोकवनिकेंत रामचिंतन? हो खरेंच. शोकवनांत रामचिंतन कुठलें? अशोकवनांत आई होत्या म्हणूनच रामाचें अनुसंधान त्यांचें अखंड राहिलें!

**मारुतिः**--आई त्या सेवेनें संतुष्ट होऊन आपण नाहीं कां नवरत्नहार माझ्या गळ्यांत घातला? पण मी पडलों चंचळ.

**सीताः**--हो खरेंच! आपल्या जातिस्वभावावर गेलास, तशांत तूं वातपुत्र!

**मारुतिः**—आई! पण ज्यांत राम नाहीं असा हा नवरत्नहार घेऊन मला काय करावयाचें आहे?

**सीताः**—वेड्या! अरे हृदयांत राम आहे आणि काय ह्या बाह्य भावांत किंवा विषयांत राम नाहीं? ज्याला हृदयांत राम सांपडला त्याला तो सर्व बाह्य

भावांत ( पदार्थांत ) सुद्धां ओतप्रोत भरलेला दिसलाच पाहिजे ! आंत राम आणि बाहेर राम. सर्वत्र रामही राम !

**अंगद**--साध्यांत राम आणि साधनांतही राम. आंत भरलेला राम बाह्य जगांत, बाह्य विषयांतही आहे. बाह्य विषय, बाह्य भाव हेही रामरूप आहेत.

**मारुतिः**--( चिंतन करून ):--आई ! ही अन्वयाची दृष्टि तुम्ही मला आज दिलीत. मला आतां आंत बाहेर एक रामच दिसतात.

**सीताः**--होय ना ? मग आतां चिंतनसुख अखंड भोगीत असतांना ह्या जगांत व जगाच्या व्यवहारांत निरंतर राम पहात जा. तूं जें करशील ती रामसेवा आहे. तूं चालशील ती रामाची यात्रा आहे. तूं मनांत आणशील तें रामचिंतन आहे. तूं निजशील ती समाधि आहे. तुझ्या सर्व व्यवहारांत आदिमध्यावसानीं रामच आहेत असा अनुभव घे आणि सुखी हो. वेडया ! पेढा काय सोलून खावा लागतो ? पेढयाला काय पाठपोट आहे ? तसा आंत बाहेर एक राम आहे. हें जग कोठें लांब टाकून देऊन कां राम निराळा पाहायचा असतो ? जगही रामरूपच आहे ! मोतीं फोडून मग सांधीत बसण्यापेक्षां आहे तसेंच पाहण्यांत शोभा व आनंद आहे. मनांतला दुजाभाव जातांक्षणींच सर्वत्र राम आहे. दुजेपणाची कल्पना गेली कीं सर्व सहजच राम आहे. रामावांचून दुसरें काय आहे ? मीही तुला रामांतच दिसेन. मी व राम दोन नाहीं. दोघे मिळून एक राम आहों. मौज म्हणून राम आपल्या ठिकाणीं राम व सीता, शिव व शक्ति, प्रकृति व पुरुष, देव व भक्त असें दुजेपण दाखवितात; पण अद्वैतांत द्वैत व द्वैतांत अद्वैत अनुभवणें यालाच ज्ञान म्हणतात. बाकी सारें अज्ञान आहे. अज्ञान ही काय वस्तु आहे ? ज्ञान आणि अज्ञान दोन्ही माझा राम गिळून बसला आहे. त्याच्या ठायीं दोन्हीं नाहींत.

**मारुति** ( हात जोडून ): --आई ! तूं गुरु आहेस. मला चोख दृष्टि दिलीस तुझे उपकार काय वानूं ?

( चरणावर मस्तक ठेवतात. अंगद दोघांच्याही चरणीं नम्र होतात. )

---

गुरुच्या उपकारा । उपकारा । नाहीं पारावारा ॥ गु० ॥ ध्रु० ॥
देवुनि आपुला डोळा । दाखविलें घननीळा ॥ गु० ॥ १ ॥
देवुनि आपुली दृष्टि । चिन्मय केली अवघी सृष्टी ॥ गु० ॥ २ ॥
जिकडे पाहे तिकडे । अवघें ब्रह्मचि दिसतें उघडें ॥ गु० ॥ ३ ॥
नयनीं स्वरूप जडलें । सद्गुरुनाथें डोळस केलें ॥ गु० ॥ ४ ॥
केसरिसद्गुरुपायीं । शिवदिन ब्रह्मचि केलें पाहीं ॥ गु० ॥ ५ ॥

## ७ तामीळ भाषेंतील एक अपूर्व कथा.



१. तामीळ देशांत सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी एक अद्भुत गोष्ट घडली असून ती तामीळ वाङ्मयांत प्रसिद्ध आहे. मद्रासपासून रामेश्वरापर्यंतचा जो अगदीं दक्षिणेकडचा प्रदेश त्याला तामीळ देश म्हणतात. आपला तंजावर प्रांत या तामीळ प्रदेशांतच आहे.

२. तेथें दोन हजार वर्षांपूर्वी वेदमौळी नामक एक सदाचारसंपन्न ब्राम्हण होता. तो ज्योतिषी असून भविष्यवेत्ता होता. लोक तर त्यास सिद्ध समजत. हा एके रात्रीं आपल्या घराच्या अंगणांत नक्षत्रतारांकडे पहात उभा असतां अकस्मात एक दैदीप्यमान तारा आकाशांतून तुटून महारवाड्यांतील एका घरावर पडलेला यानें पाहिला. ती बरोबर वेळ लक्ष्यांत ठेवून यानें गणित केलें व कोणी मूल या वेळीं जन्मास आलें आहे कीं काय याचा त्यानें तपास केला. तों एका अंत्यजाची स्त्री प्रसूत झाली असून तिला एक कन्या झाली आहे असें त्यास कळलें. हें ऐकतांच तो मनांत फारच भ्याला, कां कीं या मुलीचा विवाह आपल्या मुलाशीं होणार हें विधिलिखित त्यास भविष्यज्ञानामुळें कळलें !

३. अंत्यजकन्या कर्मठ ब्राह्मणाची सून व्हायची ! केवढा घोर प्रसंग हा ! हा योग कसा टाळतां येईल याचा विचार वेदमौळीच्या मनांत सुरू झाला. त्याचा पिरली नावांचा बारा वर्षें वयाचा मुलगा होता त्याला या वार्तेची गुणगुण कळली होती. वेदमौळीनें ग्रामस्थ ब्राम्हणांस बोलावून आणलें व त्यांच्या संमतीनें त्यानें अंत्यजास कळविलें कीं ' या मुलीमुळें ब्रम्हवृंदावर संकट कोसळणार आहे तर ब्राम्हणांसाठीं तूं या मुलीची हानि सोसण्यास तयार आहेस काय ? ' ब्राम्हणांवरील भक्तीमुळें त्या थोर अंत्यजानें मुलीचा त्याग करण्याचें कबूल केलें, पण तिचा स्वतः घात करण्याचें नाकारलें. ब्राम्हणांनीं तिचा घात न करितां तिला एका पेटींत बंदोबस्तानें ठेवून ती पेटी कावेरी नदीच्या प्रवाहांत सोडून दिली. त्यावेळीं सर्वांप्रमाणें पिरली यानेंही तिला पाहिली व तिच्या मांडीवर एक विशेष आकृतीचा सतेज तीळ त्याला स्पष्ट दिसला. वेदमौळीनें आपल्याकडून भविष्य खोटें पाडण्याचा याप्रमाणें प्रयत्न केला, पण ब्रह्मलिखित कोण खोटें पाडूं शकणार ?

४. त्या अंत्यजकन्येची पेटी वाहत वाहत ५।७ कोस पुढें गेली व शेवटीं एका घाटाला लागली. तो घाट त्या गांवांतील ब्राह्मणांच्या स्नानसंध्येचा होता. तेथें एक अत्यंत विद्वान् ब्राह्मण स्नानसंध्या करीत बसला होता त्याच्या नजरेस ती पेटी आली. त्यानें ती पेटी उघडली व आंत पाहतो तों एक नुक-

तेंच जन्मलेलें सुंदर बालक त्याच्या नजरेस पडलें. त्यानें ती बालिका घरीं नेली व आपल्या बायकोस मोठ्या कौतुकानें दाखविली. अनपत्यत्वामुळें उभयतांस त्या बालिकेचा मोह पडला व त्यांनीं तिला पोटच्या मुलीसारखें वाढविलें आणि तिला शिक्षण देऊन नीतिशास्त्रांत निष्णात केलें. ह्याप्रमाणें त्या अंत्यजाच्या उदरीं जन्मलेल्या कन्येस प्रारब्धवशानें सुब्राह्मणांच्या घरीं उत्तम संस्कार मिळाले. ती मुलगी इकडे वाढत असतां तिकडे वेदमौळीचा अंत झाला. पिरली विद्वान् झाला होता. पण त्यास आणखी शास्त्राध्ययन व्हावें अशी बुद्धि होऊन तो घराबाहेर पडला. दैवयोगानें तो फिरत फिरत ज्या ब्राम्हणाच्या घरीं ती वाढत होती त्याच घरीं आला व तिच्या पालक बापानें त्याला आपल्या घरीं अध्ययनार्थ ठेवून घेतलें. याप्रमाणें पिरली व त्याची ब्रह्मदत्त वधू एकाच घरीं अध्ययन करीत राहत असतां उभयतांचें प्रेम जमलें व त्या ब्राह्मणानें त्यांचा विवाहसमारंभ घडवून आणला ! वेदमौळीचें भविष्य खरें ठरलें; मात्र त्याचा खरेपणा पहाण्यास तो हयात नव्हता. दैवघटित कोण टाळूं शकेल !

५. या गोष्टीस कांहीं काळ लोटला. वय, विद्या, सदाचार व सद्गुण यांनीं समान अशा त्या तरुण पतिपत्नींनीं संसारसुख कांहीं काळ पूर्णपणें अनुभविलें. तुल्यगुण वधूवरांचा समागम स्वर्गसुखतुल्यच होय. एके दिवशीं ती स्त्री न्हाऊन वस्त्रांतर करीत असतां पिरलीच्या दृष्टीस तिच्या मांडीवरील तो तीळ लख्ख दिसला. त्याबरोबर तो मनांत चमकला व बापाचें भविष्य त्यास आठवलें. तो मनांत चरकला, भयभीत झाला. त्यानें प्रेमळ वाणीनें स्त्रीस कांहीं हकीकत विचारली. तेव्हां ही कन्या त्या ब्राह्मणाची नसून कावेरी नदीच्या प्रवाहाबरोबर पेटींत वाहून आलेली अंत्यजकन्याच होय हें त्यास कळून आलें, व स्त्री गुणवती पण अंत्यजबीजाची होय या कल्पनेमुळें वैतागून तो एकाएकी घर सोडून देशांतरीं गेला. आपला ब्राह्मणदेह भ्रष्ट झाला असें वाटून पिरलीस पराकाष्ठेचा खेद झाला.

६. पिरली अकस्मात् घर सोडून व आपला त्याग करून गेला हें पाहून त्याच्या पत्नीनें अनिवार शोक केला. त्यागाचें कारण तिच्या लक्षांत येईना इतकें त्यांचें प्रेम अनुपम होतें. ती आपल्या मानीव बापाची परवानगी घेऊन पतिशोधार्थ घराबाहेर पडली. गांवोगांव फिरतां फिरतां एका गांवीं अकस्मात् पतीची व तिची गांठ पडली. गांवीं येण्याबद्दल तिनें त्यास परोपरीनें विनविलें. पण तो त्यास कबूल होईना. मग तीच त्याचे मागोमाग हिंडूं लागली. त्यागाचें कारणहा तिनें फारफार विचारलें, पण मौनाशिवाय त्यानें उत्तर केलें नाहीं. तिच्या जन्माचें रहस्य तिला सांगून तिचें मन दुखवणें त्यास योग्य वाटलें नाहीं. याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर एके रात्रीं ती निद्रिस्त असतां

त्यानें पुन्हां तिचा त्याग करून पलायन केलें. तिनें पुन्हां शोक केला, पुन्हां त्याच्या शोधार्थ ती गांवोगांव हिंडूं लागली. असें करतां करतां ती एका गांवीं एका श्रीमान् गृहस्थाचे घरीं गेली. तो वृद्ध मनुष्य फार सज्जन होता. त्यानें तिचें कन्येप्रमाणें परिपालन केलें. एक वर्ष त्याचे घरीं राहिल्यावर तो गृहस्थ मरण पावला. मरतेसमयीं आपल्या संपत्तीची वांटणी मुलांत समसमान करून ही कन्या समजून हिलाहि एक भाग दिला. बरीच संपत्ति हातीं पडतांच तिनें अन्नछत्र उघडलें व अतित अभ्यागत, यति, संन्यासी, भिकारी, क्षुधित या सर्वांस सप्रेम अन्नदान करण्याचा तिनें क्रम चालू ठेवला. तिचें भूतदास्य व निरपेक्ष परोपकार यांची कीर्ति चहूंकडे फांकली. कोणीही अतिथि आला कीं अपत्यासमान त्यास तिनें प्रेमानें वागवावें. या पुण्याचें फळ तिला मिळालें. त्या अन्नछत्रांत एके दिवशीं तिचा पतिही उतरावयास आला. त्याच्या वेषांतरामुळें तिनें त्यास ओळखलें नाहीं. तथापि चार दिवस इतरांबरोबर तेथील आतिथ्य पूर्णपणें अनुभवून तिचें सच्छील, पातिव्रत्य, सौम्यता इ० गुण पाहून त्याचें हृदय पूर्णपणें द्रवलें व ही एक महापुण्यशील देवता आहे असें वाटून तें पूज्यतेनें व प्रेमानें भरून आलें व आपलें गांठोडें तसेंच टाकून त्यानें ओळख दिली व तिला घट्ट आलिंगन दिलें. पतिपत्नींना परस्परांच्या अत्यंत प्रेमाविर्भावामुळें यापुढें वियोग असह्य झाला. यानंतर तें दंपत्य अत्यंत आनंदानें एकत्र राहून पुन्हां संसारसुख भोगूं लागलें.

७. पुढील काळांत त्या दंपत्यास चार मुली व तीन मुलगे मिळून सात अपत्यें झालीं. १ अव्हेअर, २ आपग्गा, ३ वालीज व ४ मुरग्गा हीं मुलींचीं नांवें व ५ तेरूवेल्लवर ६ आधिकनान व ७ कपिलर हीं मुलांचीं नांवें होत. हीं सातही नांवें तामीळ वाङ्मयांत अत्यंत प्रसिद्ध व लोकप्रिय आहेत. हीं सर्व मुलें अत्यंत विरक्त व विद्वान् निघालीं. त्यांनीं तामीळ भाषेंत उत्कृष्ट ग्रंथरचना केली व सातहीजण अविवाहित राहिलीं! या मुलांचे जन्म एका गांवीं झाले नाहींत, कां कीं पिरली व त्याची बायको उभयतां फिरत असतां जेथें जें मूल होईल तेथेंच तें अरण्यांत, धर्मशाळेंत किंवा मंदिरांत ठेवून त्यांनीं पुढें जावें असा त्यांनीं क्रम ठेवला होता. याचें कारण पिरलीनें आपल्या बायकोस सांगितलें नाहीं व त्या महासतीनेंही त्यास तें कधीं पुसलें नाहीं! 'स रक्षिता रक्षति यो हि गर्भे' या भागवतवचनावर तिची श्रद्धा होती.

८. आतां पिरलीच्या मुलांची थोडक्यांत हकीकत सांगून ही अद्‌भुत कथा येथें संपवितों:--

(१) अव्हेअर-ही सातही भावंडांत अत्यंत विद्वान् होती. ती नीति-

शास्त्र, ज्योतिष, वैद्यक, रसायनशास्त्र व भूगोल यांत इतकी निपुण होती कीं, यांपैकीं प्रत्येक शास्त्रावर तिनें ग्रंथ लिहिले आहेत. अत्तिसुदी, मुदुरसी व नादवाली हे तिचे नीतिशास्त्रावरील ग्रंथ होत. हिचे अनेक शास्त्रांवरचे ग्रंथ तामीळ देशांत इतके सर्वमान्य आहेत कीं, ते विद्यालयांत व पाठशाळांत शिकविले जातात. ही मंत्रशास्त्र, धातुवाद व कल्पविद्या यांतही पारंगत होती. मंत्रविद्याप्रभावानें ही २४० वर्षें वांचली होती असें ह्मणतात.

( २ ) **आपग्गा**—हिचा जन्म अर्काट प्रांतांत ऊटकाडू नामक गांवीं झाला. ही एका परटाच्या बाईस सांपडून तिच्याच घरीं ही वाढली. हिनें नीतिपातल नांवाचा एक ग्रंथ नीतिशास्त्रावर लिहिला आहे.

( ३ ) **वालीज**--हिला कारवार लोकांनीं वाढविलें. तामीळ भाषेंत हिचें पुष्कळ कवित्व आहे.

**४ मुरग्गा**-हिचें जन्म कावेरीपट्टण येथें झालें, व ही एका भंडाऱ्याच्या घरीं वाढली. हिचीही कविता प्रसिद्ध आहे.

( ५ ) **तेरू**-मैलापूर येथील वेल्लुवर नामक पुरुषानें यास वाढविल्यामुळें तेरू वेल्लुवर असें याचें नांव प्रसिद्ध आहे. हा अत्यंत विद्वान् झाला. मदुरा शहरच्या वेदशेखर राजाच्या दरबारांतील ४९ पंडितांस यानें जिंकलें. व्यालुवरकोरल नामक तामीळ भाषेंत जो ग्रंथ आहे त्याची प्रसिद्धी सर्व दक्षिण हिंदुस्थानभर आहे. मानवी प्राण्याच्या आयुष्यांतील निरनिराळ्या स्थितींचें उपदेशरूपानें यांत क्रमवार श्लोकबद्ध सुंदर वर्णन केलेले आहे. तामील भाषेंतील सर्व ग्रंथांत या ग्रंथाची योग्यता अत्यंत श्रेष्ठ मानली आहे. एलिस साहेबानें या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर केलें आहे. याची नीतिविषयपर कविता सर्वमान्य आहे.

( ६ ) **आधिकनान**—हा मोठा भाग्यशाली निघाला. यास एका राजानें वाढविलें. त्याच राजाचा यास जन्मभर आश्रय मिळाल्यावरून यानें अनेक काव्यें रचलीं आहेत.

( ७ ) **कपिलर**— याचें एका ब्राह्मणानें संगोपन केलें. यानें पुष्कळ कविता केली आहे. त्यांत ' आगवर ' नामक ग्रंथांत आपलें व आपल्या भावंडाचें इतिवृत्त लिहिलें आहे.

कांडप्र नामक तामीळ ग्रंथांत पिरलीची मनोवेधक हकीकत दिलेली आहे.

---

# ८ हिऱ्याची आंगठी !



[ एक आध्यात्मिक गोष्ट ]

१. आत्मारामशेट यांची पेढी काशीक्षेत्रांत अनेक वर्षें मोठया इभ्रतीनें चाललेली होती. यांच्याइतकी जुनी पेढी उत्तरहिंदुस्थानांत कोणतीही नव्हती म्हटलें तरी चालेल. सर्व लहानमोठया पेढयांचा या पेढीशीं व्यवहार चालू असे. शेटजींची संपत्ति व दातृत्वशक्ति यांचा डंका भरतखण्डभर गाजून राहिला होता.

२. आत्मारामशेट यांचा मुनीम प्राणनाथजी फार विश्वासू व नेकीचा पुरुष होता. धन्याचें यश दिगंतीं वाढविणें यांतच ते आपला पुरुषार्थ मानीत. आत्मारामशेट व मुनीम प्राणनाथजी यांचा एकांत रात्रीं व्हायचा. धन्याचा पूर्ण विश्वास प्राणनाथजींवर व सर्व लोकही मालकाच्या ठिकाणींच त्यांना मानीत.

३. आत्मारामशेट यांचा जीवनराम नांवाचा एकुलता एक मुलगा—शेटजींचा तो जीव कीं प्राण ! प्राणनाथजी वयोवृद्ध झालेले, यजमानांचे ते समवयस्कच. जीवनराम आपल्या ईश्वरदत्त अलोट संपत्तीची वहिवाट पाहून भोग घेऊं लागले कीं आपल्या जन्माचें सार्थक झालें असें दोघांनाही वाटे ! शेटजी व मुनीम दिसायला दोन पण दोघांचें अंतरंग एकच.

४. एकदां आत्मारामशेट कांहीं कामानिमित्त परगांवीं गेले व सर्व कार्यभार मुनीमावरच पडला. जीवनरामाला बापाच्या संगतीचा फार लळा लागलेला, बाप सन्मुख असला कीं तो आनंदराशीवर बसलेला दिसे. बापाची पाठ फिरल्यावर सर्व सुखें घरीं सज्ज असून जीवनरामाला करमेना, कशांतच त्याचें मन रमेना. जीवाला विरंगुळा वाटावा म्हणून जीवनराम आपल्या बापाच्या पेढीवर गेला. प्राणनाथजींना त्याला पाहून फार संतोष झाला. त्यांनीं त्याचा योग्य सत्कार केला व त्यानेंही त्यांना भक्तिनम्रतापूर्वक अभिवादन केलें. प्राणनाथजींनीं जीवनरामाला ती सर्व पेढी दाखविली. पेढीचीं मुख्य पांच दालनेंही दाखविलीं. पेढीवरचा मुख्य कारकून मनसाराम हा फार चंचल व बुद्धिवान् होता. त्यानें पेढीचे केव्हांच बारा वाजविले असते, पण त्यावर मुनीमांचा फार मोठा दाब होता. मुनीम व जीवनराम हे एकत्र येतांना त्यानें पाहिलें तेव्हां तो नरम पडला. मुनीम जीवनरामास म्हणाले, " ह्या आपल्या पेढीवर ह्या मनुष्यावर मला मुख्य नजर ठेवावी लागते. " जीवनरामानें बालसहज अशा उतावीळपणानें विचारलें, " तो असा वाईट मनुष्य आहे तर त्याला काढून कां टाकीत नाहीं ? " यावर

प्राणनाथजी हंसले व म्हणाले " त्याचा आपल्या कारभाराला फार उपयोग होतो. त्याला काढून चालायचें नाहीं. तो चंचळ आहे, गोंधळ्या आहे, व बाहेरचे पांच सोंदे दुकानांत घेऊन बसायची त्याला खोड आहे! पण त्याच्यावर सख्त नजर ठेविली तर त्याच्याकडून आपल्या पेढीचें काम चोख करून घेतां येतें. तो आहे अंमळ छांदिष्ट, म्हणून त्याला संभाळून घ्यावें लागतें. गोड बोलून, धाक दाखवून आंतल्या कारभाराचा भार त्याच्या अंगावर टाकून व वेळोवेळीं त्याला प्रसन्न ठेवूनच त्याच्याकडून काम करून घ्यावें लागतें. तो वळला तर आहे देवमाणूस, बिघडला तर मात्र पिशाच्च! बाकी त्यावर एकसारखी नजर ठेविली म्हणजे पुरतें." हें प्राणनाथजींचें भाषण ऐकून जीवनरामाला मोठी मौज वाटली व तो आनंदानें मुनीमास म्हणाला " आपली नजर आहे म्हणून बरें आहे. आपणच यावर सतत बारकाईनें लक्ष ठेवीत जा म्ह० बाबांना व मला निर्घोर राहतां येईल." याप्रमाणें ती सर्व पेढी, पेढीवरील कामगार मंडळी व त्यांचीं कामें यांची पुरी ओळख करून दिल्यावर प्राणनाथजी जीवनरामाला अगदीं आंतल्या खोलींत घेऊन गेले.

५. एकांत मिळतांच प्राणनाथजींस फार आनंद झाला. दीर्घकालपर्यंत त्यांना उत्कंठा असूनही जीवनरामाशीं एकांत करायला मिळाला नव्हता. त्यांनीं तरतऱ्हेच्या चिजा त्या तरुण यजमानपुत्रास दाखविल्या व त्याचें मन रिझविण्याचा प्रयत्न केला. तो एकांत, ती रम्य व निवांत वेळ, मनाचा उल्हास, सभोंवार पसरलेलें नेत्र दिपविणारें विविध प्रकारचें उंची जवाहीर, हें सर्व पाहून जीवनरामाचा अंतरात्मा फार प्रसन्न झाला.

६. मुनीमांनीं त्याची प्रसन्नता पाहून त्यास हिऱ्याची एक उंची आंगठी दाखविली. आधीं तो हिराच अत्यंत तेजस्वी, त्यांत सुंदर जडावांत बसविलेला. जीवनरामाचेंही चित्त तो हिरा पाहतांच लोभावलें. तो मुनीमास म्हणाला; ' कांहीं नाहीं, मला ही आंगठी जरूर पाहिजे.' मुनीम म्हणाले, ' आंगठी आपल्याकडे विकायला आली आहे. सध्यां आपल्यामागें खर्चाची फार ओढ आहे.' जीवनराम म्हणाला,' ते कांहीं चालावयाचें नाहीं, मला ही आंगठी हवी. बाबांना सांगा अन् ही आंगठी मला द्या. हिची किंमत काय?' मुनीमांनीं उत्तर केलें, ' हिची किंमत एक लक्ष!' जीवनराम उतावळेपणानें म्हणाला ' किंमत कांहींही असो; ही आंगठी मला पाहिजेच.' मुनीम यावर किंचित् हसले व म्हणाले. ' यजमान गांवाहून आले म्हणजे मागून घ्या. मीही आपली उत्कंठा किती आहे तें त्यांस सांगेन.' प्राणनाथजींनीं यावर तो हिरा जडावाचे भाग वेगवेगळे करून त्यास दाखविला, तेव्हां तो हिरा हातावर घेऊन व त्याची प्रभा सर्वत्र फांकलेली पाहून जीवनराम आनंदानें बेहोष झाला. तो नाचूं उडूं लागला. त्याला गाण्या-

च्या लहरी आल्या. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले. इतकी अमोल वस्तु आपल्या भांडारांत असून बाबांनीं मला इतके दिवस कां दाखविली नाहीं याबद्दल क्षणभर मनांत तो रागावलाही ! असो. कांहीं वेळानें तो मुनीम जीवनरामास घेऊन बाहेर आला.

७. कांहीं दिवसांनीं आत्मारामशेट परगांवाहून आले. जीवनराम लडिवाळ-पणें त्यांच्या गळां पडला व त्यांना घेऊन पेढीवर गेला. प्राणनाथजी तेथेंच होते. तिघे मिळून आंतल्या खोलींत गेले व जीवनरामानें ती हिऱ्याची आंगठी आपल्याला पाहिजे म्हणून हट्ट धरिला, व मुनीम यांनीं सर्व हकीकत सांगितली. तो प्रकार पाहून आत्मारामशेट यांस हंसू आलें व त्यांनीं संकेतपूर्वक प्राणना-जींकडे पाहिलें ! त्यांनीं ती हिऱ्याची आंगठी कपाटांतून बाहेर काढली, पुन्हां तिच्या जडावाचे भाग वेगवेगळे करून दाखविले. खालीं 'जीवनराम' अशीं अक्षेरं कोरलीं होतीं तींही त्यास दाखविलीं. तीं अक्षरें पाहून जीवनराम चपा-पला व म्हणाला 'काय ? ही आंगठी माझीच आहे ?' प्राणनाथजींनीं उत्तर केलें 'होय ! ही आंगठी आपलीच आहे. आपल्या जन्मकाळींच ही आपणांस मिळाली आहे. सणावाराला आपल्या हातांत घालायला हीच आपणांस दिली जाते !' बाळ उत्सुकतेनें म्हणाला 'काय ? ही आंगठी माझीच आहे ? मग मला परवांपर्यंत ही इतकी कां आवडली नाहीं ?' आत्मारामशेट म्हणाले, 'बाळ ! ही सारी संपत्ति तुझीच आहे. मी पुराणपुरुष झालों आहे. हिचा भोक्ता तूंच आहेस. ही पहिल्यापासून तुझीच आहे. तूं ही नेहमीं वापरीत असतोस, पण हिचें कोंदण वेगळें करून तुला प्राणनाथजींनी दाखवीपर्यंत तुला हिची किंमत झाली नाहीं. आतां झाली, तुला आवडली तर तूं घे. हातांत घाल. संभाळ मात्र. गमावूं नकोस.'

८. इतके आत्मारामशेट बोलताहेत तोंच जीवनरामाचें सर्व लक्ष त्या आंग-ठीनें विशेषतः त्यांतल्या त्या हिऱ्यानें इतकें वेधलें कीं—काय सांगावें ? ते आत्मारामशेट, ते प्राणनाथजी, तो जीवनराम सर्व जणों त्या आंगठींत गडप झाले ! हिऱ्याच्या अंगकांतीनें दशदिशा व्यापून गेल्या !!

९. वाचकहो ! आमची गोष्ट संपली. इटकुली मिटकुली गोष्ट. तुम्हांला पाहिजे कां ही आंगठी ? एक लक्ष द्यायला तयार व्हा ! आंगठी तुमचीच आहे !

> ऐसी कहाणी निरंतर । विवेकें ऐकती जे नर ।
> दास ह्मणे जगदुद्धार । तेचि करिती ॥ २० ॥—श्रीदासबोध द. १३ स.५

# १ हास्याची महती !



( १ ) हांस म्हणजे तूं शरीरानें पुष्ट होशील. —बेन जॉन्सन.

( २ ) मनमोकळेपणानें पोटभर हांसणें म्हणजे अंतःकरणांतल्या दुःखशोकचिंतारूप दिवाभीतांना पळवून लावणाऱ्या आनंदसूर्याचा उदय होणें होय. —थॅकरे.

( ३ ) हांसण्यावांचून जीवित म्हणजे तें भयाणच ! —थॅकरे.

( ४ ) तूं हांस म्हणजे सारें जग तुझ्याबरोबर हांसेल, तूं रड कीं कोणीही तुझ्या थाऱ्याला उभें राहणार नाहीं. —विल्कॉक्स.

( ५ ) मूर्खपणानें अतिरेकाचें हांसणें म्हणजे रडण्याची ती प्रस्तावनाच होय हें कधीं तुझ्या लक्षांत आलें आहे काय ? —ली हंट.

( ६ ) घरांतल्या मुलामुलींच्या हांसण्या-खिदळण्याचा ध्वनि पृथ्वीवरचा अत्यंत मधुर नाद होय. —डी क्वेन्झी.

( ७ ) हांसण्यासारखा आरोग्यदायक दुसरा व्यायाम नाहीं. —ग्रूफलंड.

( ८ ) मोकळें मन व मनसोक्त हांसणें पाहतांच अंतरात्मा किती शुद्ध व आनंदभरित आहे हें कळून येतें. —व्हिक्टर ह्यूगो.

( ९ ) सज्जनांसारखें दांभिकांना रडून दाखवितां येईल, पण तें दिव्य मधुर हास्य एक वेळही त्यांच्या मुखावर तुम्हांला दिसणार नाहीं. —औडा.

( १० ) अंतरंगाची कळी उमलून जें सहज हांसूं येतें त्याबरोबर आयुष्याचा एक दिवस वाढतो. —स्टर्न.

( ११ ) हांस म्हणजे दीर्घकाल जगशील. —शेक्सपीअर.

( १२ ) तर मग आपण सर्वजण जन्मभर हांसूं या. गरीब, श्रीमंत सर्वांना बिनखर्चाची मजा भोगतां येते. हांसण्यानें शरीरांत रक्तप्रवाह आपलें काम उत्तम बजावतो, छाती रुंद होते, मेंदूंतील दुःखचिंतांचीं जाळीं तुटून जातात, व साऱ्या शरीराचें आरोग्य सुधारतें. हांसण्यानें अश्रुप्रवाहही सुखाचा होतो व वृद्धपणानें चेहऱ्यावर आलेल्या सुरकुत्याही तारुण्यदर्शक होतात. —मॅथ्यूज्.

---

# १०. ग्रंथ आणि ग्रंथसंग्रहालयें.



(१) शरीरपोषणास जसा व्यायाम तसा बुद्धिविकासार्थ ग्रंथपरिचय अत्यवश्य आहे. —स्टील.

(२) निवडून पसंत केलेला उत्तम ग्रंथ (ज्ञानेश्वरीदासबोधासारखा) हा जन्माचा सोबती होतो. —जेरल्ड.

(३) ग्रंथ हे छडीवांचून निष्कपटपणें ज्ञानदान करणारे गुरु होत.—डीबेरी.

(४) ग्रंथवाचनप्रसंगीं शरीर विसांवतें पण मन काम करीत असतें व विकास पावत असतें. —फेस्वेल.

(५) मला ग्रंथांचा स्नेह फार आवडतो. मी ग्रंथांच्या संगतींतच जन्मलों आणि वाढलों आहें. —होल्म्स.

(६) ग्रंथांच्या संगतींत माझा काळ जितका सुखांत जातो तितका दुसरा कोणाच्याही संगतींत जात नाहीं. —शर्ले.

(७) ज्याला नाश नाहीं असें अविनाशी धन म्हणजे विद्याधनच होय. —ल्यंगफर्ड.

(८) उद्यां लागणारा ग्रंथ आजच विकत घ्या. शहाण्यांच्या कोशांत 'उद्यां' हा शब्द नसतो, 'आज' हाच असतो.

'वर्तमानेन कालेन प्रवर्तन्ते विचक्षणाः'

(९) ग्रंथवाचनानें किती तरी मनुष्यांच्या चरित्रांत फरक पडून ते उच्च पदाला पावले आहेत! —इमरसन.

(१०) ग्रंथांची आवड उपजत असल्यामुळें मी अत्यंत सौख्य व वैभव पावलों आहे. —गिबन.

(११) ग्रंथसंपत्ति ही जगांतील इतर सर्व संपत्तीपेक्षां फार थोर व अमोल आहे. —लॅटिन म्हण.

(१२) ग्रंथ हे कालाच्या महासागरांतले दीपस्तंभ आहेत. —व्हिपल.

(१३) ग्रंथप्रेमी वीराला असाध्य कांहींच नसतें. —गॉडविन.

(१४) दुसऱ्यांच्या (थोर ग्रंथकारांच्या) मनांत (विचारांत) मिसळून जाणें मला फार भाग्याचें वाटतें. —लॅंब.

(१५) उत्तम ग्रंथांत केवढा अपार आनंद भरला असतो! —पोर्टर.

(१६) ग्रंथ वाचण्याच्या लायकीचा असेल तर तो विकत घेण्याच्याही लायकीचा आहे हें लक्ष्यांत ठेवा. फुकट ग्रंथ वाचण्याचें दारिद्र्य बुद्धींत ठेवूं नका. —रस्किन.

( १७ ) घरांत ग्रंथसंग्रहालय असणें ह्मणजे धोंड्यामातीच्या घराला प्राण असणें होय. उन्मत्त श्रीमंतांप्रमाणें 'भेटायची आतां वेळ नाहीं' असें ग्रंथ केव्हांही म्हणत नाहींत. —सिसरो.

( १८ ) सल्लामसलत विचारण्याची उत्तम खोली ह्मणजे ग्रंथसंग्रहालय होय. —डौसन.

( १९ ) 'मनाचा दवा,' 'बुद्धीचें औषध' अशीं अक्षरें अलेक्झांड्रा येथील जगविख्यात ग्रंथसंग्रहालयावर खोदलेलीं असत!

( २० ) जुना कोट फाटेतों वापरा. पण नवीन पुस्तक विकत घेतल्याशिवाय राहूं नका. —फेल्प्स.

( २१ ) 'अधिक शिका, अधिक मिळवा' अशा अर्थाची एक म्हण चिनी भाषेंत प्रसिद्ध आहे.

( २२ ) अपरिचित मार्गावर चालतांना अनुभवासारखा प्रकाशमान दुसरा दीप नाहीं.

( २३ ) उत्तम ग्रंथ ह्मणजे महाप्रज्ञावंत थोर पुरुषांनीं जगासाठीं मागें ठेवलेलें वारसधन होय. —ॲडिसन.

( २४ ) ज्ञानतृष्णा असणें ह्मणजे ज्ञानमंदिराकडे चालूं लागणेंच होय. —कॉन्फ्यूशिअस.

ग्रंथसंग्रह करी । तो सत्वगुण ॥ ( रामदास ).

( २५ ) सर्वकाळीं सर्व स्थळीं मनुष्यांच्या उत्क्रांतीस उत्तम ग्रंथच कारण झाले आहेत.

( २६ ) प्रत्यहीं कितीं वेळां तरी ग्रंथ हे योग्य सल्ला देणाऱ्या सन्मित्राचें कार्य करीत असतात.

( २७ ) मनुष्यांत जें पूजार्ह श्रेष्ठ असें कांहीं आहे त्याचा निधि म्हणजे उत्तम ग्रंथच होत. —गॉडविन्.

( २८ ) मानवजातीचा इतिहास म्हणजे ग्रंथच. —कार्लाईल.

( २९ ) उत्तम ग्रंथ सर्वकाळ चिरंजीव असतो. —आल्कॉट.

( ३० ) ज्ञानाची आवड असलेल्या प्रत्येक मनुष्याचें ग्रंथांवर अत्यंत प्रेम असलेंच पाहिजे. —डीबेरी.

( ३१ ) उत्तम ग्रंथ पुढें आला तो वाचून घ्या, कदाचित् तो वाचायची तुम्हांला पुढें कधींच संधी यायची नाहीं. —थोरो.

( ३२ ) मला मित्रांची संगति आवडतेच, पण त्याहून अधिक ग्रंथांची संगति आवडते. —पोप.

( ३३ ) ग्रंथांशीं जडलेला स्नेह कधींच ओसरत नाहीं. —डिकन्स.

( ३४ ) उद्वेगचिंतांच्या वेळेचें आनंदाच्या वेळेंत रूपांतर करणारें दिव्य रसायन म्हणजे ग्रंथच होत. —मॉंटेस्क.

( ३५ ) ग्रंथ हे तारुण्यांत मार्गदर्शक व वार्धक्यांत समाधान देणारे मित्र होत. —कौंटेस डी ग्यान्लिस.

( ३६ ) मार्ग चुकलेल्या माणसांस योग्य रस्ता दाखविणारे मशालजी म्हणजे ग्रंथ. —ॲडिसन.

( ३७ ) वाढत असलेला ग्रंथसंग्रहालय म्हणजे संग्रहकर्त्यांच्या चरित्राचा उज्ज्वल इतिहास होय. ग्रंथसंपत्ति म्हणजे असली, असली नसली नसली, अशी केवळ चैनीची वस्तु नाहीं, मनुष्यत्वास ती अत्यवश्य आहे. —बीचर.

( ३८ ) ग्रंथांतरीं सामावलेला दुसऱ्याचा अनुभव घेऊन विवेकी मनुष्य आपल्या शहाणपणांत भर टाकीत असतो.

( ३९ ) अत्यंत सुधारलेल्या समाजांतही अत्यंत श्रेष्ठ अशी चीज म्हणजे ग्रंथच होत.

( ४० ) उत्तम ग्रंथ माणसांस अधिक शहाणे व अधिक श्रेष्ठ नर बनवीत असतात.

( ४१ ) पुस्तकें गवतासारखीं असंख्य वाढत असलीं तरी ग्रंथरत्नांची प्रभा पडतेच पडते.

( ४२ ) मित्रांची निवड कसोशीनें करितां, तशी पुस्तकांची निवडही कसोशीनें करून उत्तम ग्रंथांचा चिरस्नेह जोडा.

( ४३ ) ग्रंथवाचनानें मनुष्यत्वाचा पूर्ण विकास होतो. —बेकन.

( ४४ ) भीक मागून, चोरून आणून, उसने घेऊन पुस्तकें वाचण्याची संवय हीनपणाची आहे, म्हणूनच रस्किन म्हणतो कीं ‘ स्वतःच्या मालकीचे ग्रंथ जवळ नसणें ही दरिद्रीपणाची परमावधि होय. ’

( ४५ ) स्वतःचे ग्रंथ जवळ असल्याशिवाय ग्रंथांची योग्यताच कळत नाहीं. ग्रंथसंपत्तीचें थोर भांडवल ज्याजवळ नाहीं तो जन्मदरिद्रीच रहायचा !

( ४६ ) स्मरणशक्ति स्वभावतः अपूर्ण असते म्हणून ग्रंथसंग्रह नेहमीं सन्निध असावा. —ओवेन्स.

( ४७ ) ज्ञान मुरण्यासाठीं श्रवण, मनन व वाचन सतत ठेविलें पाहिजे. —सेनेका.

( ४८ ) पुस्तकें असंख्य असलीं तरी उत्तम ग्रंथ विरळच असतात.

( ४९ ) ज्ञानानें परिपक्व झालेल्या बुद्धीसारखें दुसरें रत्न नाहीं, ग्रंथसंग्रहालयासारखा दिव्य खजिना नाहीं.

( ५० ) म्हणून उत्तम ग्रंथ विकत घ्या, वाचन करा, मनन करा, त्यांचा स्नेह जोडा. ज्ञानानें यश मिळतें म्हणून ग्रंथ विकत घेण्यास कांकू करणें ही काटकसर नव्हे, हा आत्मनाश आहे. 'माझी ज्ञानतृष्णा अनावर आहे हें परमभाग्य मी समजतों' असें कार्लाईलनें म्हटलें आहे. तो आणखी म्हणतो कीं 'ह्या काळांत ग्रंथसंग्रहालय हीच खरी युनिव्हर्सिटी आहे.' उत्तम ग्रंथांच्याद्वारें थोर पुरुष आपणाशीं बोलत असतात म्हणून ग्रंथसमागम हा सत्संगच होय असें चॅनिंगचें म्हणणें आहे, तें यथार्थ आहे.

---

## ११ थोडी मौज.



एक विनोदी मित्र एकदां म्हणाला कीं, सारें जग 'ककाकीकु'ची बाराखडी सदा घोकीत असतें ! मी त्यास याचा अर्थ विचारला. तो म्हणाला:—

क=कनक
का=कांता
की=कीर्ति
कु=कुचेष्टा

पहिल्या तीनपैकीं एकही ज्याजवळ नाहीं त्याला आपला जन्म वरील तिघांच्या कुचेष्टेंत घालवावा लागतो ! मी लगेच उत्तर केलें 'पण या चौघांच्या तावडींतून जो सुटेल त्याला याच बाराखडीचा उत्तर भाग तारायला समर्थ आहे ! तो म्हणाला 'कसा ?' मी म्हणालों:—

के=केशव
कै=कैलासपति

केशवाला किंवा कैलासपतीला ( हरिहरांला ) शरण जाणारा त्यांचा भक्त वरील चौकडीला वश होत नाहीं.

जो कालीं, केशव किंवा कैलासपति यांना निर्मळ भावानें भजेल त्याला कैवल्यपदप्राप्ति होईल.

Wealth, Wife, and Wine ह्म० कनक, कांता, कादंबरी हे जगाचे तीन मोह आहेत.

---

# १२ त्यागाचा अभ्यास.

१. चतुर्मास जवळ आला आहे. त्याचा पारमार्थिकांनीं चांगला उपयोग करून घ्यावा व परमार्थांत चार पावलें पुढें टाकावींत अशा बुद्धीनें मी ह्या ' त्याग ' विषयावर दोन शब्द सांगत आहे. आपलें धर्मशास्त्र मनुष्यस्वभाव कसा आहे हें ओळखून त्यांतल्या उत्तमांशाची वाढ करणारे उत्कृष्ट नियम घालून देण्यांत मोठें दक्ष आहे. चार वर्ण व चार आश्रम यांची योजना अत्यंत चातुर्याची, धोरणीपणाची व श्रेयस्कर झाली आहे. ब्रम्हचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ्य व संन्यास हे चार आश्रम शास्त्रानें सांगितले आहेत. ब्रम्हचर्याश्रमांत शरीर, मन व बुद्धि यांची शक्ति वाढवावयाची असते. गृहस्थाश्रमांत धन मिळवून सविधि व नियमित विषयभोग भोगावयाचे असतात. दुसरा आश्रम भोगार्थ दिला असून बाकीचे तीन आश्रम त्यागार्थ दिले आहेत. सूक्ष्म विचारानें पाहिलें तर चारी आश्रमांत त्यागच प्रधान आहे. भोगलालसा ही भूतांची प्रवृत्ति आहे, पण वस्तुतः निवृत्ति ही फलप्रद आहे, त्याग हाच श्रेयस्कर आहे. त्यागांत धर्माचें रहस्य आहे. त्यागाचें वर्म ज्या प्रमाणानें साधत जाईल त्याप्रमाणें जीवाची उन्नति होत राहील. थोर महात्मे त्यागानेंच नारायणाला प्रिय झाले आहेत. त्यागानें त्यांना महत्त्वाला चढविलें आहे. संतसज्जन व वीर पुरुष, परमार्थी, राजकारणी व खरे गृहाश्रमी यांचें चरित्र पाहिलें तर त्यागामुळेंच त्यांनीं आपलें आयुष्य धन्य केलें आहे असें दिसून येईल. तुकोबांनीं संसारसुखाचा त्याग केला व भंडारा गांठला म्हणूनच एकांतभजनध्यानानें त्यांना देव आपलासा करितां आला. समर्थ ब्रम्हचर्याश्रमांतच संन्यासधर्म आचरते झाले. म्हणूनच त्यांना देवकार्य व लोककार्य करितां आलें. गौतमबुद्धांनीं ऐन तारुण्यांत राज्याचा, तरुण पत्नीचा व प्रथम अपत्याचा त्याग करून एकांतवास केला म्हणून त्यांना निर्वाणपद मिळालें. कोणताही पुरुषार्थ त्यागाशिवाय होत नाहीं. ' विषयत्यागेंवीण कांहीं । परलोक तों प्राप्त नाहीं, ' ' विषय अवघा त्यागावा । तरीच परमार्थ करावा ' हें अगदीं सत्य आहे, पण असा विषयत्याग सर्वथा आपल्या हातून होणें दुर्घट असतें, म्हणून संतः--

> सबळ विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण घेणें ।
> विषयत्यागाचीं लक्षणें । वोळखा ऐसीं ॥ दास० १२-७-२७ ॥

असा मध्यम मार्ग सांगत असतात.

> मागें ज्ञानी होऊन गेले । तेहीं बहुत कष्ट केले ।
> तरी मग विख्यात जाले । भूमंडळीं ॥ १० ॥

वैराग्यापरतें नाहीं भाग्य । वैराग्य नाहीं तें अभाग्य ।
वैराग्य नसता योग्य । परमार्थ नव्हे ॥ १७ ॥
प्रत्ययज्ञानी वीतरागी । विवेकबळें सकळत्यागी ।
तो जाणिजे महायोगी । ईश्वरी पुरुष ॥ १८ ॥

वैराग्य, योग, विवेक या सर्वांचें बीज त्यागांत आहे, त्यागबुद्धींत आहे. कोणांस अंतस्त्याग व बहिस्त्याग दोन्हीही घडतात; व ते आपल्या वैराग्याच्या प्रखर तेजानें सूर्यासारखे तळपतात; पण हें सर्वांसच साध्य नाहीं. बहिस्त्याग ज्यांना सर्वस्वी शक्य नाहीं त्यांनीं हळुहळु तरी तो करीत राहावा व अंतस्त्याग पूर्णपणें साधावा. 'अंतस्त्यागी बहिःसंगी लोके विहर राघव' हें सांसारिकांनीं साधल्यासही फळ एकच आहे. सांसारिकांनीं बहिस्त्याग हळुहळु कसा करावयाचा तेवढेंच आज पहावयाचें आहे.

२. काशीयात्रेहून आल्यावर 'तुम्ही काय सोडलेंत ?' म्हणून इष्टमित्र प्रश्न विचारीत असतात. कुणी कांहीं कुणी कांहीं असा एकेक पदार्थ त्या पुण्ययात्रेच्या स्मरणार्थ सोडल्याचें अजूनही सांगतात. या सोडल्याच्या गोष्टी क्षुल्लक असतील, पण यांत त्यागाचें वर्म आहे. आमचा स्त्रीवर्ग त्यागाच्या बाबतींत पुरुषांच्या फार पुढें आहे. त्यांचे चतुर्मास व्रतें, वैकल्यें, नियम वगैरे बहुत असतात. व्रतवैकल्यांचें महत्त्व व उपयोग चिंतनीय आहेत. लहान मोठया सर्व साधनांनीं नारायणाची प्राप्ति करून घेणें हा मुख्य हेतु आहे.

करा जप तप अनुष्ठान याग । संतीं जे मारग स्थापियेले ॥ १ ॥
सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुम्ही ॥ २ ॥

असा तुकोबारायांचा उपदेश आहे. चतुर्मासांत बायका कांहीं तरी नियम करीत असतात. लक्ष वातींचा नियम, लाख फुलें किंवा अतुट तांदुळ मोजून ते देवाला वाहणें, वायनें किंवा अन्नपाणी ब्रम्हचाऱ्याला किंवा कुटुंबवत्सलाला पोंचवणें, कथापुराणें नियमितपणानें ऐकणें व पुराणिकाची किंवा कोणा सच्छील ब्राम्हणाची संभावना करणें, देऊळ, नदी, घाट यांच्या जीर्णोद्धारकार्यास यथाशक्ति साह्य करणें, प्रातःस्नानाचा नियम पाळणें, कांहीं प्रिय वस्तु खायची सोडणें किंवा एकेक वस्तूच एकेक महिन्यांत धरणें किंवा सोडणें, एकभुक्त किंवा उपवासी राहणें इ० प्रकारचे चतुर्मासांत नेमधर्म चालत असतात. ही पद्धत फार चांगली आहे. हिच्यांत सद्व्यवसायांत मन गुंतवणें, परोपकार, देहासक्ति व ममत्व हटवणें, कांहीं तरी बंधनाची अटक लावून घेऊन नित्यनेमाच्या मार्गानें देवाकडे लक्ष वेधणें इ० लाभ होतात. कित्येक पुरुष हे स्वतः कांहींच न करितां व आपल्या उच्छृंखल स्वैर वर्तनास आळा न घालतां, या व्रतवैकल्यरूप अभ्यासमार्गाची टवाळी करण्यांत धन्यता मानतात, पण हें त्यांचें केवळ

अज्ञान आहे. पुरुषांनींही कांहीं तरी व्रत पत्करावें, पसंत असेल–उपकारक वाटेल तें पत्करावें, पण व्रतावांचून माणूस काय कामाचा ? नुस्त्या लठ्ठ गोष्टी बोलून काय लाभ ? शरीराला कर्माचें वळण लावणें अवश्य आहे. व्रतानें नित्यनेमाचें वळण लागतें.

नित्य नेम दृढ चित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ती ।
होउनीयां भगवंतीं । मार्ग फुटे ॥ ५ ॥ ( अंतर्भाव )

नित्यनेमानें भ्रांति उडते, संदेह तुटतात, समाधान अंगीं जडतें, चित्त शुद्ध होऊन बोध वाढतो, प्रपंचखेद तुटतात, देहबुद्धीचा थारा मोडतो, दृढभाव जडतो, सत्वाचें तेज, शांति बळावतात व देव भेटतो. याप्रमाणें नित्यनेमाचें महत्त्व श्रीसमर्थांनीं अंतर्भाव प्रकरणांत सांगितलें आहे. हें कांहीं नुस्तें कवित्व नाहीं. हा समर्थांचा अनुभव आहे व या मार्गानें जाणाऱ्या शेंकडों भाविकांचा अनुभव आहे. पुरुषांनींही भगवत्प्रीत्यर्थ कांहीं व्रत नियम आचरले पाहिजेत. प्रत्यहीं गायत्रीमंत्राचा किंवा आपल्या उपास्य देवतेच्या नाममंत्राचा जप केला पाहिजे. 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि' असें देवच बोलले आहेत. चतुर्मास तरी:–

( १ ) गीता ( २ ) भागवत ( ३ ) योगवासिष्ठ ( ४ ) अध्यात्मरामायण ( ५ ) ज्ञानेश्वरी ( ६ ) एकनाथी भागवत ( ७ ) भावार्थरामायण ( ८ ) मूळ रामायण ( ९ ) महाभारत ( १० ) तुळसीरामायण ( ११ ) पांडवप्रताप, रामविजय, हरिविजय इ० श्रीधरी ग्रंथ ( १२ ) महिपति वगैरेंचीं संतचरित्रें ( १३ ) दासबोध, मनोबोध वगैरे समर्थग्रंथ ( १४ ) गुरुचरित्र ( १५ ) शिवलीलामृत यांपैकीं एक किंवा अनेक ग्रंथांचीं एक अथवा अनेक पारायणें करण्याचा नेम धरून तो बिनचूक व्रतबुद्धीनें पाळला पाहिजे. हाच अभ्यास पुढें दृढ करण्याची बुद्धि वाढत जाते. बायका कांहीं पदार्थ सोडतात त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांनीं [ १ ] चहाकॉफीपान [ २ ] नाटकें सिनेमादि खेळ पाहणें [ ३ ] जेथें नैवेद्य वैश्वदेव होत नाहींत अगर देवपूजाभजनादि नाहीं त्या घरीं अन्न सेवन करणें इ० सोडावेत.

( १ ) कोणत्या तरी रूपानें गाय पाळून अथवा गोरक्षण कार्यास साह्य करून गोसेवा करणें ( २ ) विद्यार्जन करणाऱ्या विद्यार्थ्यांस अगर विद्यादान करणाऱ्या ज्ञात्यांस किंवा संस्थांस मदत करणें ( ३ ) स्वदेशी व्रत आचरणें, म्ह० परदेशी माल शर्करादि पदार्थ न सेवणें इ० नियम व्रतबुद्धीनें पाळले तरी मनाची, घराची, राष्ट्राची शुध्दि होण्यास पुष्कळ साहाय्य होईल !

३. सर्व व्रतनियमांचा उद्देश पाहिला तर देहबुध्दि हटवून चित्त भगवत्परायण करणें हाच असतो. त्यानें त्यागबुध्दि वाढत जाते, भोग आस्ते आस्ते सुटत जातात. भोग सोडण्याची प्रत्येकास गरज आहे. जग केव्हां तरी प्रत्ये-

कास सोडून जायचें आहे. आमचे शेजारीं एक केशवराव म्हणून गृहस्थ होते. चारचौघांप्रमाणें संसारांत पुरे गुरफटलेले होते. त्यांचा एकुलता एक 'बाब्या' होता. त्यावर त्यांचें सारें लक्ष. सारा संग्रह त्याच्यासाठीं. त्याच्या प्रेमामुळें त्यांनीं स्वतःचे भोग पुष्कळ सोडले होते. ते विवेकपूर्वक सोडले असते तर अधिक बरें होतें! एकदां प्लेगांत 'बाब्या' वारला. संपला, सारा कारभार आटोपला. केशवरावांना जग ओसाड झालें, त्यांनीं बाब्याचीं पुस्तकें, कपडे, खेळ सारे देऊन टाकले. शेवटीं त्याचा सर्व संग्रह देऊन टाकला. त्याचीं भांडीं चांदीचीं सुध्दां देऊन टाकलीं. केशवराव विरक्त झाले, मात्र विवेकाचा बोध नव्हता. सहा महिन्यांनीं ते बाहेर पडले म्ह० कधीं जोडा कोणाला दे, कधीं उपरणें दे, कधीं पागोटें दे, असा देण्याचा सपाटा चालविला. बाब्याच्या मागून दुःखावृत होऊन केशवराव वर्षानें गेले. संचित केलेल्या वस्तु येथेंच टाकून तुम्हां आम्हां सर्वांनाच जायचें आहे. मग कालिशी उलटल्यावर तरी विवेकपूर्वक त्यागाचा अभ्यास आपण कां करूं नये? आमचे येथें एक स्नेही होते. ऑफिसचा वेळ सोडून सकाळ संध्याकाळ त्यांची लायब्ररींत जायची. वाचनाचें मनस्वी वेड, पण फक्त टाइम्स, क्रॉनिकल इ० पत्रें वाचण्याचें! त्यांना मीं एकदां म्हटलें कीं, 'तुम्ही एक वेळ लायब्ररीला द्या व एक वेळ तरी घरीं ज्ञानेश्वरी, दासबोधादि ग्रंथांना किंवा भजनपूजनांना द्या.' पण छे! ते झालें नाहीं. ते म्हणत 'माझें—परमार्थाचें नांव काढलें कीं—डोकें फिरतें!' शेवटीं चहा आणि टाइम्स यांच्या निदिध्यासांत ते परलोकवासी झाले. एक आंकडे-शास्त्री, जावा आणि कानडा प्रांतांत स्त्री—पुरुषांचीं गणती किती होती व कस्टमचें उत्पन्न किती होतें व आतां किती आहे हें बिनचूक सांगत. स्मरणाचे धड, बुद्धि चांगली, पण मला आपलें वाटे कीं, 'आंकडे सोडण्याचें यांचे वय नाहीं कां झालें?" ही कोणाची निंदा नाहीं. आपल्या सावधानतेसाठीं बोलायचें इतकेंच. वयोपरत्वें एकेक गोष्टी सोडल्या पाहिजेत. पंचविशींत शाकुंतल व मालती—माधव मिटक्या मारीत वाचलें म्हणून त्यांतील शृंगारपर पद्यें साठींत कोणी गुणगुणत बसला तर बरें कां दिसेल? ऐन तारुण्यांत वादाच्या हमरीतुमरींत मनुष्य पडला असला तरी सत्तरी झाली तरी त्यानें तेंच कां करीत बसावें? आस्ते आस्ते सर्व गोष्टी विवेकवैराग्यपूर्वक तोडल्या पाहिजेत. कोठें जायचें तें स्मरण सदा ठेवावें.

> शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।
> वार्धके मुनिवृत्तीनां योगेनांते तनुत्यजाम् ॥

ही रघुवंशराजांची सुंदर वर्तनपद्धती कालिदासानें वर्णिली आहे. गृहस्थाश्रमांतच त्यागबुद्धि ठेवून पुढील आश्रमांची तयारी करणें म्हणजेच गृहस्थाश्रम

नेटका करणें होय. वानप्रस्थाश्रमांत तूर्यावस्थेप्रमाणें एक डोळा ब्रह्मवस्तुकडे व एक मावळणाऱ्या संसाराकडे पाहिजे. परोपकार यांत निर्लोभ होऊं शकतो. त्यागाकडे दृष्टी ठेवून यावज्जीव वागेल त्यालाच मरणावसरीं संसाराचा गुंफा राहाणार नाहीं. देत जाणें, सोडीत राहणें, विवेकवैराग्याच्या दोन्ही डोळ्यांनीं सोडीत राहणें हें साधलें पाहिजे. पूर्ववयीं धरिलेलें असतें म्हणून सोडण्याचे सायास. ज्यानें धरिलेंच नसतें त्याला धरणें व सोडणें या दोन्ही कल्पना मिथ्या आहेत. जीवन्मुक्त महात्म्यांची ती उंच कोटी होय ! संसार आपल्याला निभ्रांत सोडणार, मग आपणच विवेकानें त्याला सोडलें तर काय मौज होईल !

---

## राधेचें भाग्य.

—*—

पद ( ख्याल )

( एका जुन्या वाडांत सांपडलेलें हें पद रा. नरसिंह कृष्ण मोघेकर, सातारा यांनीं पाठविलें आहे. )

घुंगुरूवाले तेरे बाल राधे ॥ धृ० ॥
रूण झुण रूण झुण पैंजण वाजे । च्यलत कुंजर च्याल ॥ राधे ॥ १ ॥
लाल कुसुंबा सुवा हत हय । चोली लाल गुलाल ॥ २ ॥
आखो लाल अधरभी लाल । लाल कपोल और भाल ॥ ३ ॥
श्रीमुख परमुख चंद्र बिराजे । गलबीचे मोहन माल ॥ ४ ॥
कहे भीमराज सुन्हो एक अर्ज । तुमपर रिझे (रिझे) नंदलाल ॥५॥

---

१. जीवात्मा व विश्वात्मा यांचें ऐक्य होऊन भूतहितार्थ आत्मप्रेमानें झटणें हा खरा वेदांत होय.

२. आत्मसंतोषासारखें आरोग्यदायक दुसरें कांहीं नाहीं.

३. हें कठिण आहे, हें मला साधायचें नाहीं असलें रडगाणें गात बसूं नकोस. ईशकृपाबलानें हें मी साधीनच असा आत्मविश्वास ठेवून कार्याला लाग, यश तुझ्या घरचें आहे.

४. कार्य करीत असतांना उत्साहबळ वाढतें. कार्यांत आनंद व सुख आहे. सत्कार्याचरण हाच आनंद आहे.

५. पराचें चित्त दुखवणें म्हणजे आत्मबळ कमी करणें होय.

# १३ पवित्र ग्रंथ वाचावेत कसे ?



१

सर्व पवित्र ग्रंथ पवित्र मनानेंच वाचावेत. गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, नाथ-भागवत, योगवासिष्ठ, दशोपनिषदें, दासबोध, गुरुचरित्र–कोणत्यांना कोणत्या ग्रंथाचें नित्य वाचन ठेवावें. वाचनानें किंवा साधल्यास सत्‌श्रवणानें मनन होतें व निदिध्यासन होतें. उत्तम ग्रंथ पूजनीय आहेत, गुरुरूप आहेत. शुद्ध-भावानें त्यांजकडे पहावें, शुचिर्भूतपणानें त्यांना स्पर्शावें, विमल बुद्धीनें व निर-हंकारानें ते वाचावेत.

२

साधुसंतांचीं स्तोत्रें, अष्टकें, पदें, अभंग ज्या सद्‌बुद्धि–प्रवाहाबरोबर प्रगट झाले आहेत त्याच सद्‌बुद्धीनें त्यांचें गायन, मनन व पठण केलें असतां त्यांचे विचार आपलेसे होतात.

३

कीर्तन, व्याख्यान, निरूपण, पुराणश्रवण सद्भावपूर्वक केल्याशिवाय त्याचा कांहीं उपयोग नाहीं. शब्दचावटी वाढविणें आत्महिताचें नाहीं. भावापाशीं देव आहे, भावच देव आहे.

४

संतांच्या पवित्र ग्रंथांत देवाचा शोध घ्यावा ह्मणजे तो आपल्या हृदयांत सांपडतो. विद्वत्ताप्रचुर शास्त्रीय ग्रंथांच्या परिशीलनानें विद्वत्व व वक्तृत्व वाढेल, पण विद्वत्त्वांत व वक्तृत्वांत देव नाहीं, देव विमल भावांत आहे.

५

श्रुतिस्मृत्यध्ययन, पुराणश्रवण, स्नानसंध्या, देवतार्चन, तीर्थाटन हीं सारीं अवश्यच आहे, पण प्रेमभावावांचून, निष्काम हरिप्रेमावांचून हीं उपयोगाचीं नाहींत. प्रासादिक ग्रंथांत ग्रंथरचनेचे लौकिक गुण न पाहतां प्रसादगुणच पहावा व आपलें चित्त हरिप्रेमानें भरून घ्यावें.

६

ग्रंथकारांचीं अनेक कचाटें आलीं आणि गेलीं. त्यांचे नश्वर देह गेले, पण त्यांनीं जीं स्वानुभविक प्रमेयें सांगितलीं तीं अविनाशी आहेत. म्हणून वक्त्याचा विचार जरा दूर सारून तो जें शाश्वत सत्य बोलला त्याशीं तन्मय व्हावें.

७

लौकिकांसाठीं, विद्वत्तेसाठीं, स्फीतीसाठीं सद्ग्रंथ वाचूं नका. आत्महिता-साठीं, आत्मशुद्धीसाठीं व आत्मशोधनासाठीं ते वाचा. शुद्धभावानें व नम्रतेनें वाचा.

८

कोठें कांहीं अडलें तर ग्रंथाला नांव ठेवूं नका. माझा हें कळण्याचा आज अधिकार नाहीं असें मानून तो अधिकार अंगीं आणा. सत्संग धरा.

---

# १४ सगुणनिर्गुणविवेक.



१

पिंडीं तें ब्रह्मांडीं, हा न्यायच आहे. पिंडांत शोधून पहावें ह्मणजे ब्रह्मांडाचा उलगडा होतो. पिंडाचा शोध झाल्यावर ब्रह्मांडांत वेगळें शोधायला कांहीं नाहींच.

२

पंचमहाभूतें पिंडांत व तींच ब्रह्मांडांत; पिंडांत जीव व ब्रह्मांडांत शिव. जीवशिव ऐक्य अनुभवून उभयातीत परब्रह्मपद पावावें व निवांत असावें. मोक्ष तो हाच.

३

The Great Truth, to be realised, has first to be specialised, particularised and localised! निर्गुणबोध होण्यासाठीं सगुण पाहिजे. ' सगुणाचेनि आधारें । पाविजे ब्रह्म ' असें समर्थ म्हणतात, तें यथार्थ आहे.

४

पितृभक्ति, बंधुप्रीति, प्रजानुरक्ति, उदारमति इ० गुणांचा विचार कोठवर करीत बसणार? एक रामरायाच्या मूर्तीकडे पाहिलें कीं या सर्व गुणांचा स्वच्छ बोध होतो. देव प्रेमस्वरूप आहे ( God is love ) हें नुसतें म्हणून पटत नाहीं. पटायचें तर कृष्णचरित्राकडे पहा.

चरित्र तें विचारावें । केलें देवें गोकुळीं ॥ १ ॥

—तुकोबाराय.

५

एकनाथमहाराजांनीं याचा उलगडा उत्कृष्ट केला आहे:—

निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचे अगम्य जाण ।

शास्त्रासी न कळे उणखूण । वेदीं मौन धरियेलें ॥ १ ॥
तैसी सगुणमूर्ति नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण ।
देखतां जाय भूकतहान । निवताहे मन सप्रेमें ॥ २ ॥

—नाथभागवत अ० ११.

६

आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा ॥ १ ॥

७

निर्गुणनिराकार परब्रह्म आकळणें कठिण, मनवाचाबुद्धीला तें अगम्य—पण तेंच नांवारूपाला येऊन सोपें झालें आहे. विकल्प सोडून, कल्पनेचें रान मोडून, त्यालाच सप्रेमभरित होऊन झोंबा व देवाचें प्रेम लुटा व सुखी व्हा.

८

सगुण भक्ति करून निर्गुणबोध कसा होईल ? नाथसाहेबांनीं याचा खुलासा फारच नामी केला आहे:—

दीपकळिका हातीं चढे । तैं घरभरीं प्रकाशु सांपडे ।
माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आंतुडे अवघेंचि ॥
जो कसु सुवर्णाचिये खोटी । तोचि वाला एका कसवटी ।
सगुण निर्गुण परिपाटी । नाहीं तुटी चित्सुखा ॥

हातीं कंदील घेतला कीं घरभर प्रकाशच प्रकाश, त्याप्रमाणें देवाची मूर्ति ध्यानीं घेतली कीं विश्व तदाकार होऊन 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हा बोध न मागतां अंगीं जडतो. सोन्याच्या शंभर शेर लगडीला जो कस तोच वालभर सोन्याला! तात्पर्य सगुण तेंच निर्गुण. चित्सुखानंद एकच आहे.

९

लक्षूनियां योगी पाहती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ १ ॥
कर दोनी कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २ ॥
अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कवतुकें तुका म्हणे ॥ ३ ॥

* * * * *

अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदाघरीं ॥ १ ॥

१०

अमृतमय वाणींतून निघालेले हे अमृतमय उद्गार भक्तभाविकांना तन्मय केल्याशिवाय राहत नाहींत. ह्या सगुणप्रेमानंदाचाच निर्गुणबोध हा पर्याय शब्द आहे. भक्ति तेंच ज्ञान. दोहोंत भेद लवमात्र नाहीं. हें जाणून जीवानें हरीला भजावें व त्या प्रेमानंदांत जीवभाव विरून जावा.

# १५ साधुसंतांच्या मेळ्यांतल्या मौजा.



१

श्रीएकनाथ महाराजांची एक नवीन गोष्ट संतसज्जनांच्या मेळ्यांत नुकतीच ऐकण्यांत आली. ती बोधप्रद वाटल्यावरून ' मुमुक्षु ' वाचकांसाठीं देत आहों.

पैठणास नाथसाहेबांच्या गुणांची ख्याति चोहोंकडे कमलगंधाप्रमाणें फांकली असतां एक विद्वान् वादाच्या खुमखुमीनें त्यांजकडे आले व पूर्वपक्ष उत्तरपक्ष करण्याची आपली इच्छा त्यांनीं प्रगट केली. नाथांनीं त्यांस उत्तर केलें:"महाराज! वाद करून आपण जो मजवर विजय मिळवूं इच्छितां तो वाद न करितांच मी आधीं कबूल करितों व आपण सर्व प्रकारें श्रेष्ठ व वंदनीय आहांत हें पाहिजे तर आपणांस लिहून देतों. भगवंताच्या कथालापांत किंवा सुखसंवादांत काळ आनंदानें घालविणारा मी गरीब मनुष्य आपल्या पायांचा दास आहे. आपण मला जिंकलेत हें खरें आहे." परंतु नाथाचें हें म्हणणें त्या पंडितास मानवलें नाहीं व विद्वानांची सभा भरवून त्यांत नाथांशीं वाद खेळण्याची त्यानें तयारी केली. ' पूर्वपक्ष आधीं तुम्हीं करा, मग मी उत्तरपक्ष करीन, आपण जें बोलाल त्याचें खंडन करीन ' असें त्यांनीं नाथांस कळविलें व गांवांत प्रमुख जागीं मोठी सभा भरविली. आतां भक्तांना वाद नको असतो. सुखसंवादाचे ते भुकेले असतात. ' तुष्यन्ति च रमन्ति च ' यापुढें वाद काय होय? अतिशय आग्रह पडला तेव्हां नाथ सभास्थानीं आले व त्या पंडिताचे चरण नम्रपणें वंदून आपल्या जागीं बसले पंडितानें वादास आव्हान केलें. नाथांनीं हात जोडून भाषण सुरू केलें. ते म्हणाले, " महाराज! आपण फार पुण्यशील, ज्ञाते व सद्भक्त आहांत, आपल्यासारख्या सत्पुत्रास जन्म देणारीं आपलीं मायबापें धन्य आहेत. ज्या गुरूपाशीं आपण अध्ययन केलेंत ते आपले गुरूही खरोखर धन्य आहेत. ह्या तीन गोष्टी मी सांगितल्या! माझा पूर्वपक्ष झाला. आपला उत्तरपक्ष, खंडन वगैरे आपल्यास काय करावयाचें असेल तें यापुढें आपण करावें!" पंडित स्तब्ध झाला, त्याचें तोंड उघडेना. सभेंत फार मौज उडाली. ' सत्पुरुष व्यवहारपटु, चतुरही असतात ' असें म्हणत श्रोते घरोघर गेले.

२

सुमारें वीस वर्षांपूर्वी पुढील गोष्ट काशीक्षेत्रीं घडलेली आहे .....घाटावर एका धर्मशाळेच्या कोपऱ्यांत एक लांकडी तावदानाचें कपाट होतें व त्यांत एक योगी पद्मासन घालून आत्मा ब्रह्मांडीं नेऊन प्रहरोन्प्रहर बसत असे. वर्णानें गौर व तेजःपुंज अशी ही मूर्ति असे. घाटावर हजारों यात्रा स्नानदानार्थ जमत

असे. त्यांत एकदां सोलापुरकडील एक संपन्न लिंगायत बायकापोरें व नोकर-चाकर घेऊन स्नानार्थ आला होता. २५-३० माणूस त्याच्याबरोबर. तो स्नानास गंगेच्या पाण्यांत उतरला असतांना पांच सात बुचकळ्या मारल्यावर पाहतो तों गळ्यांतील लिंगांतून महादेव उदकांत पडल्याचें त्यास समजलें. महादेव सांपडेना. पुष्कळांनीं शोध केला, महादेव नाहीं. निष्ठावंत लिंगायतास महादेव नाहीं तर देहत्यागच करावासा वाटतो. तो लिंगायत फार भाविक होता. महादेव सांपडला नाहीं तर देह गंगार्पण करण्याचा निश्चय त्यानें सर्वांस सांगितला. त्याचीं माणसें घाबरलीं व रडारड सुरू झाली. इतक्यांत तो योगी कपाटांतून निघाला व वाऱ्यासारखा धांवत येऊन त्यानें गंगेत बुडी मारली व एका बुचकळींत बाहेर येऊन हातांतून हरवलेला महादेव लिंगायताच्या हातीं दिला व तो पायां पडायला लागण्यापूर्वीं धूम ठोकीत कपाटांत जाऊन बसला. ही गोष्ट आमच्या ' माई ' च्या डोळ्यासमोर घडलेली आहे.

३

हैद्राबाद येथें अच्युतस्वामी म्हणून एक सत्पुरुष होऊन गेले. त्यांच्या भोंवतीं एकदा शेंपन्नास शिष्य व दर्शनेच्छु लोक जमून सुखसंवादांत डोलत बसले होते. एक नवीन आलेले पंडित स्वामींशीं बोलत असतांना म्हणाले " लोकांना बहुधा आत्मस्तुति व परनिंदा करण्याची वाईट संवय असते, पण ती मी पार टाकून दिली आहे ! " हें ऐकतांच स्वामींनीं चमत्कारिक मुद्रा केली व ' हं ' करून स्मित केलें ! यावर जाणत्या लोकांत हंशा पिकला, पण लोक कां हंसले हें त्या पंडिताच्या लक्ष्यांत आलें नाहीं.

गर्दी मोडल्यावर पंडितानें स्वामींच्या एका शिष्यास स्वामींच्या व लोकांच्या हंसण्याचें कारण विचारलें. शिष्य म्हणाला ' तुम्ही जें बोललांत त्याचा अर्थ तुमच्याशिवाय इतर सर्वांस समजला. ' तो काय म्हणून पंडितानें विचारलें तेव्हां शिष्य म्हणाला, लोकांना तुम्ही ज्याबद्दल दोष दिलांत तो दोष तुम्हीच आपल्या भाषणानें व्यक्त केलांत. कसा तो पहाः—लोकांना आत्मस्तुति व परनिंदा आवडते हें म्हणण्यांत तुम्हीं लोकांची निंदा केलीत व ती संवय मी टाकून दिली असें म्हणण्यांत आत्मस्तुति केलीत ! लोकांना आत्मस्तुति व परनिंदा आवडते व ती मला आवडत नाहीं असें म्हणण्यांत हे दोन्ही दोष घडतात.

४

प्रातःस्नान करणें उत्तम, पण रामा प्रातःस्नान करीत असला तरी मी स्नान करितों व कृष्णा करीत नाहीं असें मनांत आलें कीं रामाच्या प्रातःस्नानाचें पुण्य उडालें !

धर्माचरण स्वतः करावें पण दुसरा तें करीत नाहीं असें बोलूं नये व मनांतहीं आणूं नये. देशसेवा स्वतः करावी पण दुसरा करीत नाहीं असें मनांतच

५

आमचे ' बाबा ' इतके थोर आहेत कीं त्यांच्या थोरवीची त्यांना कधीं जाणीवच नसते, व इतके सौम्य आहेत कीं शिवी तर काय पण कठोर शब्दही त्यांच्या तोंडून निघाल्याची साक्ष कोणी देऊं शकणार नाहीं. दहा पांच मंडळी बसून गोष्टीबाता चालल्या होत्या. एकजण जरा लवंडला, इतरांना ती बेअदबी वाटल्याचें दिसलें, पण बाबा मधुर हास्य करीत म्हणाले, " छे छे उठूं नका. तुम्ही निजलेत म्हणजे शेषशायी नारायण दिसतां, बसलांत म्हणजे मोरया दिसतां व उभे असलांत म्हणजे विठोबा दिसतां ! " आणि ह्यांत कृत्रिमतेचा लवलेश नव्हता हें सांगायला नकोच. बाबा निरहंकारपणाची मूर्ति आहेत.

६

हैद्राबादेस दंडीस्वामी म्हणून एक सत्पुरुष आहेत. हे फार उंच कोटीचे ज्ञानी, योगी व तपस्वी आहेत. यांच्याकडे एकदां एक जाहगीरदार आपल्या योगाभ्यासी गुरूस घेऊन आले. गुरुजी आले तेही संन्यासीच होते. ते आले ते समोर खुर्चीवर बसले. दंडीस्वामी व इतर मडळी खालीं बसून बोलत होती. गुरुजींनीं पृच्छा केली, " आम्हांला योगाच्या प्रक्रियेंत कांहीं अडचणी आल्या आहेत त्या विचारण्यासाठीं आम्हीं आलों आहोंत. " दंडी स्वामींनीं शांतपणें उत्तर केलें, " आपल्या अडचणी काय आहेत त्या मी जाणतों व मीं त्या दूर केल्या असत्या; पण आपण उंच आसनावर बसल्यामुळें माझा तो अधिकार आपण काढून घेतला आहे. नाइलाज आहे ! "

७

दंडीस्वामी नाशकास आले होते. येथें एक बाई त्या वेळीं कीर्तन करीत असत. बाई जरा विलक्षण आहेत. त्यांनीं कीर्तनांत ब्रह्माची चर्चा करीत असता सगुण व मूर्ति यांवर कडक टीका केली. स्वामींस व श्रोत्यांस ती आवडली नव्हतीच पण कोणी कांहीं बोलले नाहींत. कीर्तन संपून स्वामी व बरोबरची दहावीस मंडळी बाहेर आली. पंचवटींत राममंदिराच्या आवारांत जाऊन सर्वांनीं रामदर्शन घेतलें. स्वामी रामासमोर उभे राहिले व माईकडे पाहत म्हणाले, " माई ! माझें ब्रह्म हें आहे. दुसरें ब्रह्म मी जाणत नाहीं " कीर्तनकार बाई जवळच होत्या. त्यांजकडे सर्वांनीं पाहिलें !

८

श्रीअच्युतबावा म्हणून दक्षिण हैद्राबादेंत एक सत्पुरुष कांहीं वर्षांखालीं होऊन गेले. त्यांचे दर्शनास इतर अनेक लोकांबरोबर एक विद्वान् गृहस्थ एकदां गेले होते. लोकोपचाराप्रमाणें वंदन करून ते खालीं बसले व कांहीं तरी बोलायला पाहिजे म्हणून म्हणाले: 'आम्ही आत्मस्तुति व परनिंदा सोडून दिली आहे ! अच्युतबावांनीं तें ऐकिलें व नेणतेपणाची मुद्रा धारण करून त्यास

विचारलें ' आपण काय म्हणालांत तें समजलें नाहीं. ' सभा तटस्थ झाली. तो गृहस्थ पुन्हा म्हणाला, ' अर्थ उघड आहे.' बावा म्हणाले, ' तोच तर सांगा ' लोक उमगले व तो गृहस्थही उमगून वरमला !

आमचे कांहीं वाचक अजूनही उमगले नसतील तर त्यांचेसाठीं फोड केली पाहिजे. बावांचा भावार्थ असा कीं, ' मी आत्मस्तुति व परनिंदा सोडून दिली आहे. ' असें म्हणण्यांत आत्मस्तुति होते व परनिंदाहि होते ! मी आत्मस्तुति सोडून दिली आहे या म्हणण्यांतच आत्मस्तुति होते व मी परनिंदा करीत नाहीं असें म्हणण्यानें दुसरे परनिंदा करितात हा ध्वनि निघून परनिंदाही घडते ! ' मौनं सर्वार्थसाधनम् ! '

९

हुबळीस एक सद्गृहस्थ श्रीसिद्धारूढस्वामींच्या दर्शनार्थ एकदां गेले होते. चार दिवस राहण्याचा त्यांचा बेत होता. पांचवे दिवशीं ते निघणार तों त्यांस ताप आला व तो तीन दिवस निघाला नाहीं. आठवे दिवशीं जाण्यापूर्वी स्वामींचे दर्शनास ते गेले. स्वामींच्या सभोंवार तीन चार हजार लोक बसले होते. हे गृहस्थ दर्शनास गेले तों स्वामींची लहर लागून यांचे हातीं विणा आला व कीर्तनाची आज्ञा झाली. कीर्तन प्रहरभर झालें. सर्वांस आनंद झाला. एक श्रोता म्हणाला, " हे तीन दिवसांमागें जाणार होते, पण मग आजचा हा आनंद कसा झाला असता ? " यावर स्वामी हंसून म्हणाले, ' अहो ! सज्जनांवर संकटें येतात तीं लोकांच्या कल्याणासाठींच येत असतात ! '

१०

पुण्यास श्रीअक्कलकोटस्वामींचे सच्छिष्य काळबोवा ओंकारेश्वराचे ओरींत राहत असत. ते मुखानें नेहमीं ' काळ आला काळ आला ' असें म्हणून लोकांस सावध करीत, म्हणून तर त्यांस काळबोवा म्हणत. आमची आजी पुण्यास व वडील मावळांत आमचे पौड गांवीं. एकदां आजी बोवांचे दर्शनास गेली असतां तिला पाहूनच ते म्हणाले, ' कशाला आलीस जा. गवऱ्या नदीवर गेल्या ! ' आजी हिर्मुष्टी होऊन घरीं गेली. सायंकाळीं वडील निवर्तल्याची बातमी आजीस कळून तिला काळबोवांच्या अतींद्रिय ज्ञानाबद्दल आश्चर्य वाटलें. साधूंच्याकडे Wireless कशी खेळत असते त्याचें हें प्रत्यंतर आहे. वरील गोष्ट आजीच्या तोंडून मी अनेकवार ऐकली आहे. ही गोष्ट आषाढ वद्य १२ शके १७९५ मध्यें घडली.

---

# १६ अद्वैतबोध.

[ मुंबईच्या श्रीशंकराचार्योत्सवांत ता. १४।५।२१ रोजीं रा. ल. रा. पांगारकर यांचें जें व्याख्यान झालें त्याचा हा गोषवारा पुढें दिला आहे. ]

१. 'अद्वैतबोध' ह्या विषयावर आजच्या मंगलप्रसंगीं दोन शब्द सांगावयाचे आहेत. अद्वैतशास्त्राचे सिद्धांत वेदांतशास्त्रग्रंथांत सांगितले आहेत, पण मी ते सर्व ग्रंथ पाहिले आहेत असें नाहीं. मला अद्वैताचा अनुभव नाहीं हें सांगायलाही नको आहे. मी स्वानुभवाचें ज्ञान सांगत नाहीं. पण आचार्यांसारख्या, ज्ञानोबारायांसारख्या महापुरुषांनीं स्वानुभवपूर्वक जो आपणांस बोध केला आहे त्याचाच आपण क्षणभर अनुवाद करूं. शास्त्रसिद्धांत संतगुरुमुखानें ऐकतां ऐकतां मननबळानें त्यांचा बोध होतो. अनेक जन्मांचे संस्कार असून संत सद्‌गुरूंच्या कृपेची पूर्ण छाया पडली तरच अद्वैताची सिद्धि होते. ज्ञानवानालाही बहुत जन्मांच्या पुण्यतपानें भगवत्प्राप्ति होते. माझ्यासारखा सामान्य संसारी मनुष्य ह्या आत्मविद्येच्या शाळेंत बिगरयत्तेंत नुकताच बसलेला आहे. येथून पुढें पुष्कळ मार्ग आक्रमायचा आहे ! वेदांताची, अद्वैताची आवड उत्पन्न झाली आहे ही गोष्ट खरी आहे, पण स्वानुभवाच्या अभावीं माझें बोलणें होत आहे ही जाणीव ठेवून मी बोलतों. अद्वैताचा उपदेश करण्याचा मला अधिकार नाहीं, तो अधिकार थोर महात्म्यांचा आहे; तथापि आवडीच्या विषयावर आपल्या समाधानासाठीं, आपल्याच निश्चयदार्ढ्यासाठीं चार शब्द सांगण्यांत कांहीं दोष आहे असें वाटत नाहीं. नारायणानें आवड उत्पन्न केली आहे, आतां पुढच्या वाटा दाखविणें त्याच्याकडेच आहे. आपल्या धर्मांत अनेक जन्म आपण मानतों. या येवढ्या जन्मानें आपलें कार्य होत नाहीं. या एका जन्मांत खरी गोडी लागून राहिली तरी जन्म फुकट गेला असें वाटावयास नको. ह्या जन्मीचें भांडवल पुढच्या जन्मीं उपयोगी पडेल. 'न हि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति' असें भगवंतांनीं करुणेनें आपणांस आश्वासन दिलें आहे. त्याच्या आधारावर आपल्याला आपला परमार्थमार्ग आक्रमावयाचा आहे.

२. अद्वैताची सिद्धि होणें ही गोष्ट महत्पुण्याची आहे. तुकोबासारख्यांनाही तत्प्रीत्यर्थ किती सायास करावे लागले ! नुकताच मी मिरजेस गेलों होतों तेथें छोटूमहाराज ह्मणून एक साधु पाहिले. हे एका प्राणोपासनेच्या साधनांत गुंतले

असून आज सतत २४ वर्षे एका आसनावर बसलेले आहेत ! किती कठीण आहे हें व्रत ! यावरून अद्वैतसिद्धीला पोंहचेपर्यंत किती खडतर तप आचरावें लागत असतें, याची आपण कल्पनाच करावी. आपण नाउमेद व्हावयाचें नाहीं, कारण ईश्वर सर्व भूतांच्या हृदयांत आहे, जीव ब्रह्मच आहे, ब्रह्माहून वेगळा नाहीं ही आपली निष्ठा आहे. सावधानता, साक्षेप व दक्षता किती पाहिजे एवढेंच ध्यानांत ठेवून आपल्या मार्गाला लागावें ह्मणजे आपल्या मुक्कामाला यथाकाळ खात्रीपूर्वक पोंचू.

३. सर्व धर्म, पंथ व शास्त्रें यांनीं तीनच प्रश्नांचा मुख्यतः विचार केला आहे. १ कः अहम् ? २ कथमिदं जातम् ? ३ कर्ता कोऽवास्य विद्यते ? मी कोण आहें ? मी देह नसून जीव आहें पण जीवाचें स्वरूप काय ? हा पहिला प्रश्न. हें जग कसें, कशापासून कधीं झालें ? हा दुसरा प्रश्न. ह्या सृष्टीचा उत्पन्नकर्ता कोण आहे, तो कसा आहे ? हा तिसरा प्रश्न. ह्या तीन प्रश्नांच्या विचारांत सर्व जाणतीं माणसें व सर्व शास्त्रें निमग्न आहेत. आपल्या देशांत व इतर देशांतही तत्वज्ञांपुढें हे तीनच प्रश्न आहेत व यांचीं उत्तरें त्यांनीं आपआपल्या बुद्धीप्रमाणें दिलीं आहेत. सहाही शास्त्रांनीं याच प्रश्नांचा विचार केला आहे. सर्व शास्त्रांत वेदांतशास्त्र हें श्रेष्ठ ठरलें आहे. सांख्य शास्त्रानें इतर सर्व तत्वांचा समावेश प्रकृति आणि पुरुष—‘ एक मुख्य परमेश्वरु । दुसरी प्रकृति जगदाकारु ’ ( रामदास ) या दोहोंत केला आहे व वेदांतानें त्याच्या पुढची मजल गांठली असून ब्रह्म एक व अद्वितीय आहे, त्यावांचून दुसरें कांहीं एक नाहीं–‘ देव बोलिले येक । जें दुजें नाहीं ’ ( ज्ञानेश्वरी ) असें सिद्ध केलें आहे. श्रीमदाचार्यांनीं आपल्या पंचीकरणांत —

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।
इति यस्य दृढा बुद्धिः स मुक्तो नात्र संशयः ॥ १ ॥

असें म्हटलें आहे व यांतच वरच्या तीन प्रश्नांना उत्तर दिलें आहे. कोटि ग्रंथांचें हेंच तात्पर्य आहे. याहून दुसरें ज्ञान नाहीं, या अद्वैतसिद्धीसारखा दुसरा लाभ अगर समाधान नाहीं. ब्रह्म सत्य आहे, जग मिथ्या आहे, जीव ब्रह्मच आहे, ब्रह्माहून वेगळा नाहीं, हा वेदांतशास्त्राचा निष्कर्ष आहे. जीव आणि जगत्, जगत् आणि ब्रह्म, जीव आणि ब्रह्म ह्या तीन जोडया आहेत व जीव,जगत् व ब्रह्म या तिहींचें किंवा वस्तुतः जीवब्रह्माचें पूर्ण तादात्म्य आहे.अर्थात् ब्रह्मच एक सत्य आहे हा वेदांतशास्त्राचा निष्कर्ष आहे. अद्वैताचा सिद्धांत तो हाच आहे. याचाच आपण जरा स्वस्थपणानें विचार करूं. प्रथम ब्रह्म आणि जगत् यांचा संबंध काय तो पाहूं.

४. ब्रह्म आणि जगत् यांचा संबंध काय ? याचें खरें उत्तर जग झालेंच नाहीं, ‘ अरे जें झालेंचि नाहीं । तयाची वार्ता पुससी कायी ?’ हें आहे. याला

अजातवाद म्हणतात. 'जालेंचि नाहीं' याचाच अर्थ जग मिथ्या आहे. माया कल्पना, अविद्या, अज्ञान हीं सारीं नांवें त्याचींच आहेत. पण हें सिद्धांच्या अनुभवभूमिकेवरचें उत्तर असून तें प्रापंचिकांस सहज कळणारें नाहीं. त्यांना वाटतें जग दिसतें, प्रत्यक्ष अनुभव आहे, संसार चालला आहे, हजारों गोष्टी आमच्या डोळ्यांपुढें घडतात आणि जग मिथ्या म्हणतां हें काय? सृष्टि सत्य आहे असा ज्यांचा आग्रह आहे त्यांच्या समाधानासाठीं श्रुतिमाउलीनें सृष्टीच्या उत्पत्तीची एक कहाणी सांगितली आहे. "आत्मनः आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेरापः। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधिभ्योऽन्नं। अन्नाद्रेतः। रेतसः संततिः॥" अशी ही कहाणी आहे. ही कहाणी जो विवरून पाहील त्याला वरचाच सिद्धांत यांत सांगितला आहे हें कळून येईल व दोन्ही वाक्यांचा समन्वय आहे हें समजेल. आत्मा शाश्वत, सत्य, निराबाध आहे हें उघड आहे. आत्म्यापासून आकाश झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून आप, आपापासून पृथ्वी, पृथ्वीपासून औषधी, औषधींपासून रेतरक्त, व त्यापासून चारी खाणींचे जीव असा हा उत्पत्तिक्रम सांगितला आहे. आतां सृष्टीचा प्रळय याच्या उलटक्रमानें होत असतो. जें जेथून निर्माण झालें त्याचा लयही तेथेंच होत असतो. या न्यायानें पृथ्वीचा लय आपांत, आपाचा तेजांत, तेजाचा वायूंत, वायूचा आकाशांत व आकाशतत्वाचा लय आत्म्यांत होतो. तात्पर्य मधलीं सर्व भूतें उत्पन्न होणारीं असल्यामुळें नाशिवंत आहेत व आत्मा मात्र शाश्वत सत्य आहे. पांचभौतिक सृष्टि उत्पत्तिस्थितिलय या अवस्थात्रयांतली असून आत्मा मात्र अवस्थात्रयातीत आहे हें सिद्ध आहे. आतां सृष्टि झालीच नाहीं असें म्हणणें काय आणि झाली असली तर नाशवंत आहे, म्हणून मिथ्या आहे म्हणणें काय या दोहींचें तात्पर्य एकच आहे. विरुद्ध भासणाऱ्या वाक्यांचा असा समन्वय लावणें हें अप्रतिम कार्य आचार्यांनीं केलें आहे. त्यांची या कामांत बरोबरी करणारा एकही तत्वज्ञानी जगांत झाला नाहीं. 'आत्मा नित्योऽव्ययः शुद्धो जन्मनाशादिवर्जितः' असा आहे.

५. आतां सृष्टि दिसते, भासते, तींत व्यवहार होतात, म्हणून तिला सत् म्हणायची असेल, तर दिसते पण नासते म्हणून तिला असत् म्हटलें पाहिजे. या दृष्टीनें तिला फार तर सदसद्विलक्षण म्हणा, पण आत्मा जसा सद्रूप आहे तशी ती नाहीं हें उघड आहे. आतां या सृष्टीचा ब्रह्माशीं संबंध काय याबद्दल अनेक मतें आहेत. आरंभवाद, परिणामवाद, विवर्तवाद, स्फूर्तिवाद असे याबद्दल अनेक वाद आहेत. आरंभवाद, परिणामवाद हे वाद विचाराच्या कसोटीला टिकणारे नाहींत म्हणून त्यांचा त्याग करून वेदांतशास्त्रानें विवर्तवाद थोडासा पत्करला आहे. दुधाचें दहीं हा परिणामवादाचा दृष्टांत आहे व रज्जूवर सर्प, सूर्यकिरणांवर

मृगजळ हे विवर्तवादाचे दृष्टांत आहेत. सर्प हे रज्जूचें कल्पित कार्य आहे, तसें जग हें ब्रह्माचें कल्पित कार्य आहे.

भ्रमरूप विश्व स्वभावें । तेथें काय म्हणोनि सांगावें ? ।
निर्गुण ब्रह्मावेगळें आघवें । भ्रमरूप ॥ दासबोध द० १० स० ६ ॥

ज्ञानेश्वर महाराजांनीं ज्ञानेश्वरींत व विशेषतः अमृतानुभवांत स्फूर्तिवाद सांगितला आहे. स्फूर्तिवाद म्ह० जग हें ब्रह्माची स्फूर्ति आहे, त्याहून तें मुळीं वेगळेंच नाहीं, अंगांगीभावरहित ब्रह्माचें जग हें अंग आहे:—

नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा ।
आम्हां आणि चराचरा । संबंध तैसा ॥ १२२ ॥
जालेनि जगें मी झांके । तरी जगत्वें कोण फांके ? ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ? ॥ १२३ ॥
म्हणौनि जग परौतें । सारोनि पाहिजे मातें ।
तैसा नोहे, उखितें । अवघें मीचि ॥ ज्ञाने० अ० १४ ॥

सागराशीं लहरींचें जें नातें तेंच ब्रह्माशीं जगाचें नातें आहे. जग झाल्यानें जर ब्रह्म झांकलें जातें असें म्हणाल तर उलट प्रश्न असा आहे कीं मग जगपणानें कोण विस्तारलें आहे ? जग हें कोणाचा विस्तार आहे ? सोनें अलंकारपणाला आलें म्हणजे काय सोनेपणाला मुकलें ? कमळ विकास पावून त्याच्या पाकळ्या उघडल्या म्हणजे काय कमलपण संपलें ? अवयव काय अवयवाला झांकतात कां तेंही त्याचेंच रूप आहे ? तात्पर्य ब्रह्मच जगपणानें प्रगटलें असल्यामुळें म्हणजे ब्रह्म आणि जग अगदीं एकरूप असल्यामुळें माणिक आणि कांति, ज्योति आणि प्रभा, थिजलें तूप व पातळ तूप, चंद्र आणि चंद्रिका, मृत्तिका आणि घट किंवा तंतू आणि पट याप्रमाणें त्यांचा पूर्ण अभेदभाव आहे.

म्हणोनि विश्वपण जावें । मग तें मातें घेयावें ।
तैसा नव्हे आघवें । सगटाचि मी ॥ ३८१ ॥
या कारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ।
आपणयासगट मातें । जाणावें गा ॥ ३८३ ॥

विश्वांत ब्रह्म वेगळें होऊन कोठें खोल लपलें आहे असें नव्हे, तर ' आघवें सगटाचि मी ' म्हणून ब्रह्म व विश्व यांत भेद आहे. ही कुडी बुद्धि काढून टाकावी व आपल्या सगट सर्व विश्व ब्रह्म आहे असें जाणावें. ब्रह्म ब्रह्मपणानें द्रष्टा होऊन राहिलें किंवा दृश्य होऊन दिसलें तरी दोन्ही ठिकाणीं ब्रह्मात्वांचून कांहींच नाहीं ! गंगा गंगापणानें वाहिली किंवा सिंधुपणानें जागचे जागीं स्थिर राहिली तरी तें पाणीच. त्याप्रमाणें दृश्य किंवा द्रष्टा या दोन्ही प्रकारानें द्रष्टा-

दृश्यातीत एक परमात्माच स्फूर्तिरूपानें नांदत आहे. ज्ञानोबाराय अमृतानुभवांत ( प्र० ७ ) म्हणतातः—

आतां दृश्यपणें दिसो । कां द्रष्टा होवोनि असो ।
परी हीं गांचूनि अतिसो । नाहीं येथें ॥ २४० ॥
दृश्य कां द्रष्टा । या दोनी दशा वांजटा ।
पाहतां येकीकाष्टां । स्फूर्तिमात्र तो ॥ २४१ ॥

ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्फूर्तिवाद याप्रमाणें विशद करून दाखविला आहे. दृश्य=विश्व-जगत्. द्रष्टा=विश्व. दृश्य म्हटलें तर अपेक्षतेनें द्रष्टा म्हटलें गेलेलें ब्रह्म. तत्त्वतः येथें दृश्य नाहीं व द्रष्टाही नाहीं. तें अद्वैत आहे, म्हणजे तेथें द्वैत नाहीं इतकेंच त्याबद्दल म्हणतां येतें. त्याला नांवरूप कांहीं नाहीं. तें 'एकमेवाद्वितीयम्' आहे. ही भाषाही तेथें खुपते.

६. विवर्तवाद व स्फूर्तिवाद हे दिसायला वेगळे आहेत पण वस्तुतः विचारानें पाहिलें तर दोहींचा मतलब एकच आहे आणि तो 'ब्रह्म सत्यं ब्रह्ममेव सत्यं ब्रह्मादन्यत्किंचिदपि नास्ति' म्ह० ब्रह्म सत्य आहे, ब्रह्मच एक सत्य आहे व ब्रह्माहून वेगळी वस्तु कांहींही नाहीं—हाच होय. विवर्तवादानें हें व्यतिरेकानें सांगितलें व स्फूर्तिवाद तेंच सत्य अन्वयानें सांगत आहे. दर्शन एक, पण डोळे दोन, तसें अनुभवप्राप्य वस्तु आहे एक, पण तिजकडे पाहण्याचे डोळे दोन, एक व्यतिरेक व एक अन्वय हें सर्व विश्व, हा देह, हा संसार, मन, बुद्धि, अहंकार इ०हें सर्व मी नाहीं, माझा याच्याशीं कांहींएक संबंध नाहीं. मी या सर्व स्थूलसूक्ष्मसंघाताहून वेगळा आहे—'शिवःकेवलोऽहम् शिवःकेवलोऽहम्'ही व्यतिरेकाची दृष्टि. वैराग्याला ही अवश्य पाहिजे. वैराग्य हा ज्ञानाचा पाया आहे म्हणून सर्व संतसज्जन देहगेहांत गुरफटलेल्या, अहंममतेच्या पाशांत सांपडलेल्या जीवांना प्रथम वैराग्याचाच उपदेश करितात. आतां अशा रीतीनें हा चक्रव्यूह फोडून कूटस्थ ब्रह्मापर्यंत पोंचल्यावर मुरड खाऊन जीव पुन्हा मागें वळून पाहील तर असा शुद्धबुद्ध आनंदमय आत्मा मीच आहे हें कळून आल्यावर तोच मी अहंकार, बुद्धि, मन, देह, गेह—विश्वापर्यंत नटलों आहे या बुद्धीनें साऱ्या विश्वाला आपलेपणानें कवटाळणें हा अन्वय!! व्यतिरेकानें वैराग्यलाभ होतो व अन्वयानें प्रेम वाढतें. अज्ञानपणाचें प्रेम वेगळें, ज्ञानोत्तर प्रेम वेगळें. पहिलें प्रेम देहबुद्धीचें असतें, दुसरें आत्मबुद्धीचें असतें. ज्ञानी मनुष्यही संसारी माणसांसारखे मुलाचे पापे घेतो, हंसतो, खेळतो, आहारविहार करितो; पण त्याच्या अंतरंगांत फरक असतो. हा सर्व संसार आत्मविलास अशा बुद्धीनें तो पाहतो. अन्वयाच्या डोळ्यानें तो जगाकडे पाहत असतो, पण त्याचा व्यतिरेकाचा डोळाही उघडा असतो. आपले व्यतिरेक व अन्वय दोन्ही डोळे उघडे असले पाहिजेत. बहुतेक माणसें एकाक्ष असतात! हे दोन्ही डोळे ज्याचे

सदा उघडे आहेत तोच खरा संत, तोच ज्ञानी, योगी व भक्त! परमेश्वरानें आपल्यांस दोन डोळे दिले आहेत ते याचसाठीं. एका डोळ्यानें व्यतिरेक व दुसऱ्या डोळ्यानें अन्वय पहावा. जगद्गुरु शंकर हे स्मशानांतच राहतात. कपाळाला भस्म व गळ्यांत रुंडमाला असतात—हें व्यतिरेकाचें लक्षण आहे. पण मांडीवर पार्वती व मस्तकावर गंगा—हें अन्वयाचें प्रेम आहे! ज्याला व्यतिरेक ठाऊक आहे पण अन्वय नाहीं तो जगांत तुटकपणानें वागेल. ज्याला अन्वय माहीत आहे पण व्यतिरेक नाहीं तो हर्षशोकाच्या, सुखदुःखाच्या, योगवियोगाच्या माराखालीं बेजार होऊन जाईल. म्हणून दोन्ही पाहिजेत. अन्वयव्यतिरेकही जेथें विराम पावतात तेथला सहजानंद नित्य भोगून संत सुखस्वरूप होतात. असो. ब्रह्म सत्य आणि जग मिथ्या हा विवर्तवाद व्यतिरेक शिकवितो. ब्रह्मच सत्य खरें, पण जग ब्रह्माहून भिन्न नाहीं, हा स्फूर्तिवाद अन्वय शिकवितो. दोहींचा भाव एकच.

७. येथवर ब्रह्म आणि जग यांच्या संबंधानें विवरण झालें. आतां ब्रम्ह आणि जीव यांच्या एकरूपतेचा विचार करूं. जीव ब्रम्हाहून वेगळा नाहीं. देहागणित जीव वेगळे हें सांख्यांचें मत आहे. पण हें वेदांताला मान्य नाहीं. 'जीवो ब्रम्हैव नापरः' हा आपला जीवाबद्दलचा सिद्धांत आहे. आत्मज्ञान शरीराएवढें वेगळें होऊन पडलें म्हणजे त्याला ब्रम्हाचा अंश म्हणतात. 'ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः' ( गीता १५-७ ) जीव म्ह० ब्रम्हसागरावरचा तरंग तो ब्रम्हाहून भिन्नच नाहीं. जन्ममृत्यु सत्य मानणें हा जीवलोक. संकल्पाच्या पाठी लागून भवभ्रमांत फिरणें हे जीवपण. संकल्प, वासना, मन हेंच जीवपण. संकल्पलोपीं जीवच ब्रह्म आहे. चंद्र उदकीं प्रतिबिंबला तरी उदकातीत आहे, तसें ब्रम्ह बुद्धितत्वांत जीवरूपानें प्रतिबिंबित झालें तरी तें जीवपणातीत ब्रह्मच आहे.

पै काश्मीराचा रवा । कुंकुमावरी पांडवा ।
आणिका गमे लोहिवा । तरी तो नव्हे ॥ ३४९ ॥
तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे ।
परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती ॥२५०॥ ज्ञाने.१५॥

स्फटिकाचा खडा कुंकुमावर ठेवला तर तांबडा दिसतो पण तो तांबडा नव्हे. तसें ब्रह्म अनादि व अक्रिय असून देहसंगतीनें कर्तृत्वभोक्तृत्वादि नसते अहंकार पांघरून जीवपणाला आलेलें दिसलें तरी त्याच्या निजरूपांत भेद होत नाहीं. अनात्मा=जडदेहादि संघात. आत्मा=अंतरात्मा, जीव. सर्वात्मा=परमेश्वर, शिव. परमात्मा=निश्चळ परब्रह्म. अंतरात्मा परब्रह्मच आहे. देहादिसंगतीनें आलेला जडांश जड प्रकृतीला समर्पून तो जेव्हां आपल्या चिदंशानें परमात्म्यांत आत्मनिवेदनभक्तीनें प्रविष्ट होतो तेव्हां त्याला मुक्त म्हणतात.

तुकोबा देवाला म्हणतातः—

अमर तूं खरा । नव्हें कैसा मी दातारा ॥ १ ॥
तुज नांवरूप नाहीं । तर माझें दाव कायी ॥ ध्रु० ॥
खेळसी तूं लीळा । तेथें काय मी वेगळा ? ॥ २ ॥
साच तूं लटिका ? । मीही तैसा म्हणे तुका ॥ ३ ॥

देवा ! तूं अमर आहेस, मग मी मर्त्य कसा आहे सांग बरें ! पिंडोपाधिमुळें मी जर मर्त्य, तर ब्रह्मांडोपाधिमुळें तूंही मर्त्य आहेस ! पण उपाधिरहित निजरूपानें तूं अमर आहेस, तर मीही पण अमरच आहे ! तूं नामरूपातीत आहेस, तर मीही पण नामरूपातीतच आहें. नामरूपाची बुंथी घेऊन नाना-अवतारचरित्रें करितोस व ह्या विश्वाचे खेळ खेळून पुन्हा डावांत न सांपडण्याइतका जर तूं निर्मळ आहेस, तर तुझ्या लीलांहून मी काय वेगळा पडलों आहे ? तूं साच अमलास तर मीही साच आहे, तूं लटका तर मीही लटका ! जसे तुम्ही तसे आम्ही. तुझ्या माझ्यांत मूळांतच भेद नाहीं हें वर्म मी ओळखलें आहे.

लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ? ॥ १ ॥
तैसा समरस झालों । तुजमाजीं सामावलों ॥ ध्रु० ॥
अग्निकर्पुराच्या मेळीं । काय उरली काजळी ? ॥ २ ॥
तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ३ ॥

मिठाचा खडा पाण्यांत टाकतांच विरघळतो, तसा जीवपणाचें काठिण्य—अहंकाराचें काठिण्य—तुझ्यांत विरवून टाकल्यावर आतां मी जीवपणानें वेगळा कोठें उरलों आहे ? अग्नीची कापराची संगत झाली, अग्नि कापूर खाऊन गेला व आपणही निमाला !

माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥

माझ्या नजरेंत देव मेला. कारण जीवपणा गेला तो तुझा शिवपणाही घेऊन गेला. मी आजवर भक्त म्हणून होतों तोंवर तुमचें देवपण होतें. 'तुका झाला पांडुरंग' आतां भक्तपण गेलें व त्याबरोबरच तुझें देवपणही संपलें. राधाबाई मेली ती एकटीच मेली नाहीं तर गोपाळरावाचें नवरेपणही घेऊन गेली ! आतां तो नवरा कोणाचा ? खरें सांगतोंः—

तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥

असो. ब्रह्म, जगत् व जीव हे शब्द तीन असले तरी तिन्ही मिळून एकच परब्रह्म आहे. हा अद्वैताचा खरा बोध आहे.

———

# १७ पारिजातकाचीं ताजीं फुलें.



१

निर्भयता हें ज्ञानाचें पहिलें लक्षण गीतेंत सांगितलें आहे. जनकाला याज्ञवल्क्यांनीं ब्रह्मविद्या ऐकिल्यावर त्याची पूर्ण तयारी पाहून 'अभयं वै प्राप्तोऽसि जनक' असें शिफारसपत्र दिलें आहे. परमात्मरूपता पावणें हें अभयाचें बीज आहे. द्वैतभावामुळें भय उत्पन्न होतें. 'द्वितीयाद्वै भयं भवति' अशी श्रुति आहे.

परमात्मेसी जो विभक्त। तो पुरुष बोलिजे अयुक्त।
त्यासी नानात्वें भेद भासत। निजीं निजत्व विसरोनी॥

—एकनाथी भागवत अ० ७-५७.

ऐक्यभावाचेनि पैसें। दुजें मानूनि आत्मा ऐसें।
भयवार्ता देशें। दवडणें जें॥ ७१॥
पाणी बुडऊं ये मिठातें। तंव मीठचि पाणीआतें।
तेवीं आपण जालेनि अद्वैतें। नाशे भय॥ ७२॥

—ज्ञानेश्वरी अ० १६.

२

परमात्म्याहून आपण वेगळे आहोंत असें जो पुरुष भावतो तो अयुक्त, तो आपलें व्यापक निजरूप विसरून नानात्वीं भेदच पाहत असतो. उलटपक्षीं परमात्म्याशीं आपण एकरूप आहोंत अशा भावनेनें जो आपली अखंड एकाकारता अनुभवतो तोच युक्त, योगी, ज्ञानी, भक्त. 'भक्त म्हणजे विभक्त नव्हे। विभक्त म्हणिजे भक्त नव्हे' (दासबोध). जो देवाशीं विभक्त नाहीं तोच भक्त. जो वेगळा पडतो तो त्याच द्वैतामुळें नानात्व पाहतो व दुःखांत पडतो, म्हणून अद्वैतरूपता हें अभयाचें बीज आहे. भेदांत भीति, अभेदांत भीति कुठली!

३

दुजें म्ह० जग हें आत्मस्वरूप आहे असें मानून म्हणजेच आत्मभावाचा विकास किंवा विस्तार करून भयाला हद्दपार करणें याचें नांव अभय. आपणच आत्मस्वरूपानें सर्वत्र भरलों आहोंत असें निरंतर जाणणें हें अभयत्व होय. समुद्राच्या पाण्याची लहर मिठाला बुडवायला येते तों मीठच पाणी होऊन दुजेपणा

मोडतो. त्याप्रमाणें आत्मभावाच्या विकासांत सारें दृश्य जगत् आत्मरूप होऊन जातें तेव्हांच अभयत्व प्राप्त होतें ( ज्ञानेश्वर ).

४

आत्मा जसजसा वाढवावा, आत्म्याचा विकास करावा तसतसे द्वैताचे पडदे विरळ होत जाऊन अद्वयानंदाची खाण उघडी होते व भयवार्ताही उरत नाहीं.

५

भयाचें भूत–आहे म्हटलें कीं पाठीं लागतें, नाहीं म्हटलें कीं समोर उभें राहत नाहीं. भयाच्या चिंतनानें भय शतपट वाढतें. प्रत्यक्ष आपत्तींचा वाघोबा समोर उभा राहिला तर मनुष्य गांगरत नाहीं, इतका त्याच्या आगाऊ कल्पनेनें घाबरट बनतो ! म्हणून निर्भयतेचा स्वभाव हें ' देणें ईश्वराचें ' आहे.

६

कृपण आणि उदार यांच्यांत थोडा फरक आहे. जग माझ्यासाठीं उत्पन्न झालें आहे असें कृपण समजतो व जगाच्या सेवेसाठीं देवानें मला उभें केलें आहे असें उदार समजतो ! कृपणाला जगाची भीति असते व उदार पुरुष निर्भय असतो. कोंबडीसारखें छोटें अंतःकरण जगापासून भय पावतें, पण उदारचरिताला त्याच्या विशाल अंतःकरणामुळें कोठेंच भय नसतें.

७

भक्त देवाच्या आधारावर निर्भय असतात. देवाला सर्वस्व निवेदून ते देवाचेच होऊन राहतात. म्हणून त्यांना अभय असतें.

भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥
नारायणाऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥धृ०॥
चित्त वित्त देवा । समर्पूनि रहा देवा ॥ २ ॥
तुका म्हणे मन । असो द्यावें समाधान ॥ ३ ॥

८

भय नाहीं हरिच्या दासा । शुभकाळ दाही दिशा ॥ १ ॥

हरिदासांना हरीच्या बळावर निर्भयत्व मिळतें. जें जें होत आहे हें सर्व हरीच्या सत्तेनेंच होत आहे असा भक्तांचा निश्चय असल्यामुळें त्यांना सर्व मंगलच आहे. मंगलांचें मंगल असा नारायण अखंड चित्तांत भरला असल्यामुळें त्याचें अमंगल कोण करूं शकेल ? आणि हरि करितो तेंच मंगल असा त्यांचा विश्वास त्यांच्या समोर अमंगल किंवा अशुभ उभेंच करीत नाहीं. हरिप्रकाशांत भय कोठें राहील ?

९

माझेंचि मज नवल वाटे । मीचि भेटें मजलागीं ॥ १ ॥
निजात्मबोधें उदो केला । प्रकाश दाटला कोंदोनी ॥ २ ॥

कोठें कांहींचि न दिसे दुजें । निजात्मतेचें जग भासे ॥ ३ ॥
निळा म्हणे अवघे ठायीं । मीचि नाहीं दुजी परी ॥ ४ ॥

१०

मुक्त पुरुष देह भोगाचे आधीन करून आपण मोकळे होतात. सून कर्तीसवरती झाली म्हणजे प्रपंचभार तिच्यावर सोंपवून सासू देवभजनाला मोकळी राहाते.

११

प्रपंचीजन भोगाधीन देह असूनही आपण त्याचा भार माथ्यावर घेऊन कुंथत बसतात. सून कर्तेपणानें घरप्रपंच चांगला सांभाळीत असली तर एखादी वेडगी म्हातारी ज्यांत त्यांत लुबरणा करून उगाच मनाला त्रास करून घेत असते.

१२

दोन्ही प्रकारच्या म्हाताऱ्या आपल्या पाहण्यांत येतात. पहिली ही संसारांत वावरत असते. पण जितक्यास तितका संबंध ठेवून सर्वांशीं गोडी राखून पुन्हा आपला असंगपणा सांभाळून राहते. घरांत असून ती कशांत नसते. इतरांना सुख होतें व तिलाहि होतें. संसारांत विवेकी पुरुष तसेच वागतात. सर्वत्र आहे व कोठेंही नाहीं! त्याला हा प्रपंच व हा परमार्थ असे दोन पदार्थ वेगळेपणानें आढळतच नाहींत.

१३

सुखदुःख देहाचे आहेत; देहापासून कर्मफल मिळतें, देह वासनेनें उत्पन्न होतो व वासना कर्मासक्तीनें होते असें हें जाळें परस्परांत अडकलेलें असतें. तरी जीवपक्ष्याला त्यांतून अलग ठेवण्याची हातवटी सत्संगतींतच शिकायला मिळते! सर्वांत असून कशांतही नाहीं हें ज्ञानाचें सार आहे.

१४

आत्माराम सुखरूप, स्वसंवेद्य, सर्वगत आहे, तो एकजिनसी आहे, व मी आहे हें ज्ञान. यावेगळें सर्व अज्ञान.

१५

आत्मा ज्ञानस्वरूप, आनंदस्वरूप आहे. जीव ज्याला म्हणतो तें मन होय. जीव वेगळा नाहीं. आत्म्याचें प्रतिबिंब ह्म० जीव तो उपाधीमुळें भासतो. मी देह नाहीं, मी मन किंवा जीव नाहीं, मी 'शिवः केवलोऽहम्'– ज्ञप्ति मात्र चिद्घन आहे हें ओळखल्यावर देहाशीं व देहाच्या सुखदुःखभोगांशीं आपला संबंध नाहीं. देह व देहाचें कार्य त्याहून वेगळें राहून साक्षित्वानें पाहण्याचा अभ्यास ठेवावा ह्मणजे साक्षित्वहि मावळून ब्रह्मभावाचा साक्षात्कार होतो.

१६

जग हें त्रिगुणात्मक आहे व गुणसंगानें वृत्तिही अनंत प्रकारच्या उठतात. " अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग । धरूं जातां संग । तव तो होतो बाधक ॥ " मनुष्य प्रायः दुसऱ्याच्या वृत्ति आपल्या चष्म्यानें पाहतो, स्वतःच्या वृत्ति तपासण्याचें काम करीत नाहीं. आपलें पागोटें लपवून प्रायः दुसऱ्याचें पागोटें उडविण्यांत कुशल असेच फार !

१७

सात्विक, राजस व तामस असे अखिल वृत्तींचे तीन वर्ग केले आहेत. ह्या सर्व वृत्ति, हे सर्व मनोभाव ' मत्त एवेति तान् विद्धि न त्वहं तेषु ते मयि. ' सर्व वृत्ति अज्ञानाचें कार्य आहे असें म्हणतात, पण सूक्ष्म विचार केला असतां असें दिसतें कीं, तें अज्ञानाचें कार्य नसून ज्ञानाचेंच कार्य आहे ! ज्ञानाच्या अधिष्ठानावर अज्ञानाच्या वृत्ति उठतात.

१८

असें कसें होईल ? हें पहा वन्हीवर धूम कसा उठतो ? पाण्यावर शेवाळ कसें जमतें ? डोळ्यावर डोळ्यांतल्याच पाण्यानें पडळ कसें बनतें ? तशा !

१९

देव म्हणतात ' त्रिविध गुणभाव मजपासूनच उठतात; ते मजमध्यें आहेत, पण मी त्यांजमध्यें नाहीं. ' खरें आहे. अग्नींत धूम आहे, पण धूमांत अग्नि नाहीं. ब्रह्मावर संसार उभा आहे, पण संसारांत ब्रह्म नाहीं. रामाच्या अधिष्ठानावर संसार उभारला आहे, पण संसारांत 'राम' नाहीं. '

२०

संसारांत राम आहे, अज्ञानकार्यें ज्ञानावर उठविलीं आहेत, त्रिविधवृत्तींतही देव आहे. पण तो कोणाला ? ज्ञानवंताला ! अधिष्ठानाची आठवण कायम असेल तर त्यावर उठणाऱ्या कार्यांतही अधिष्ठानच दिसेल, संसारांत राम भासेल, वृत्ति भगवद्रूप दिसतील.

२१

' विषय तो त्यांचा झाला नारायण ' असें तुकोबांनीं याच हद्दीवरून म्हटलें आहे. संतांला संसार हें धूमवत् कार्य ब्रह्माग्नीसारखेंच दिसतें. कां कीं, ब्रह्माहून संसार वेगळा कोठें आहे ?

'एका जनार्दनाकार । ब्रह्मरूप हा संसार'

२२

ह्या अनुभवांत राहून संत सर्व वृत्ति खेळवितात. त्रिविध वृत्ति त्यांच्याठायीं दिसल्या तरी ते त्यांहून निराळे आहेत, किंबहुना वृत्तींनीं वेष्टिलेले अथवा गजबजलेले दिसले तरी ते गुडगुड्या नारळांसारखे आंतून मोकळे असतात.

२३

आणिकांचिये परी । तोही एक शरीरीं ।
अशेषींही व्यापारीं । वर्तत दिसे ॥ ४० ॥
स्पर्शासि तरी जाणे । परिमळ सेवी घ्राणें ।
अवसरोचित बोलणें । तयाही आथी ॥ ४१ ॥
तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे ।
परी तेथिलचा सर्वथा नोहे । प्रतीतिबळें ॥ ज्ञाने० ॥ अ० ५.

२४ २

शहाणपण त्वरित शिका. आजचें उद्यावर ढकलूं नका. हा ' उद्यां ' कधीं संपत नाहीं व शहाणपण शिकायला मुहूर्त मिळत नाहीं. ' विलंबें पहा नाश कार्यास आहे ' असें एका मराठी कवीनें म्हटलें आहे. सत्कार्याला ' आज ' द्या, अकार्य ' उद्या ' वर ढकला.

२५

प्रपंच साधून ज्याला परमार्थ जोडायचा आहे, त्यानें प्रपंच दक्षतेनें व अक्कलहुषारीनें केला पाहिजे. प्रपंचांत जो गबाळ्या तो परमार्थ काय साधणार ? सावधानता दोहींकडे पाहिजे.

२६

लबाडी करूं नये व कोणाकडून फसून जाऊं नये. चोरी करूं नये पण चोर पकडतां आला पाहिजे. खोटें कर्म करूं नये पण खऱ्या खोटयाची निवड करितां आली पाहिजे.

मार्ग–अमार्ग देखावे । साच–लटिकें वोळखावें ॥
हित–अहित जाणावें । हिताचि लागीं ॥ ( ज्ञानेश्वरी ).

२७

' सावध साक्षेपी आणि दक्ष । तयास तात्काळचि मोक्ष ।

असें समर्थ म्हणतात. ज्याला मोक्ष, मुक्तता, बंधरहितता पाहिजे त्यानें सावध असावें–बेसावध असूं नये; साक्षेपी असावें–निरुद्योगी, आळशी असूं नये ; आणि दक्ष असावें–बावळट किंवा गबाळें असूं नये. गुण ते गुण. प्रपंचांत काय आणि परमार्थांत काय एकच.

२८

प्रपंच परमार्थरूप करणें ह्म० प्रपंच नेटका करणें होय. ' हें राज्य देवाधर्माचें आहे ' असें शिवाजी महाराज व अहल्याबाई होळकरीण म्हणत ; तद्वत् संसार देवाब्राह्मणांचा आहे; देवाधर्मासाठीं संसार आहे अशा भावनेनें वागणाऱ्याचा प्रपंच परमार्थरूप आहे.

२९

देवधर्म गोब्राह्मण यांची निरपेक्ष प्रेमानें सेवा करणारा मनुष्य संसारांत असून मुक्त आहे अशी आपल्या हिंदुधर्माची शिकवण आहे, किंवा हिंदु म्हणजे देवधर्मगोब्राह्मण यांचा सेवक.

३०

न्यायानें धन मिळवून त्याचा उदासपणें वेंच कर! लक्ष्मीची प्रसन्नता 'सावध साक्षेपी व दक्ष ' राहून जोड व धर्मन्यायाला अनुसरून तिचा खुशाल उपभोग घे. भोग व दान हे धनाचे दोन मुख्य उपयोग आहेत ; पण याशिवाय तिचा तिसरा उपयोग म्हणजे कोणाची गुलामगिरी न करितां स्वातंत्र्यसुख भोगतां येतें हा होय.

३१

स्वातंत्र्यासाठीं लक्ष्मीची उपार्जना कर. स्वातंत्र्यरत्न पृथ्वीच्या मोलाचें आहे.

३२

जो आशिष्ठ, बलिष्ठ व द्रढिष्ठ असेल त्याची लक्ष्मी आहे असें श्रुति सांगते. म्हणून आशा, बल व दृढता उर्फ मनाचा खंबीरपणा यांनीं युक्त होऊन संपत्ति मिळीव.

३३

पारिजातकाचें किंवा जुईचें फूल हातीं येतांच सुकून जातें. वळवाचें पाणी पांहतां पाहतां वाहून जातें, किंवा बर्फ समुद्रांत पडतांच वितळून जातें—तशीं इहलोकाचीं सुखें क्षणभंगुर आहेत; म्हणून या अशाश्वत सुखाच्या नादीं न भरितां शाश्वतसुखाचा शोध घे. तें तर ' तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी. '

३४

अणुरेणूंत परमात्म्याचा आनंद भरला आहे. वृक्षवेली, सूक्ष्म जीवजंतु, फळें-फुलें, नद्याओहोळ, नक्षत्रें व तारा, सर्वांत हरीचा आनंद भरून राहिला आहे. रडगाणें टाकून सर्वत्र आनंद भोगायला शीक. जन्मांत व मरणांत, संपत्तींत व आपत्तींत, संयोगांत व वियोगांत, सर्वकाळीं व सर्वस्थळीं खरोखरीचा नारायणाचा आनंद पहायला व भोगायला लाग. तुझ्याजवळ आनंदाचे महासागर आहेत.

३५

एकेका ब्रह्मांडांत अनंत परमाणु व एकेका परमाणूंत पुन्हा अनंत ब्रह्मांडें आहेत ! नारायण सर्वांत आहे.

३६

अनंताच्या लीलानुभवांत स्वतः विरघळून जा. तोच मोक्ष.

## ४ जातिभेद.

ज्ञान झाल्यावर जातिभेद राहत नाहीं, अपाप नाहींसा होतो. परंतु ज्याला ज्ञान झालें नाहीं त्याला जातिभेद आवश्यक आहे. फोड बरा झाला कीं खपली अपाप गळून पडते, पण मध्येंच मुद्दाम काढूं लागल्यास रक्त निघतें!

## ५ थिऑसफी वगैरे मतें.

. हिंदुधर्मच सनातन धर्म. सांप्रत अनेक निरनिराळे धर्म दिसतात, ते चिरकाळ राहाणार नाहीत.

थिऑसफीच्या मतांत ' महात्मे ' ' चंद्रलोक ' ' सूर्यलोक ' 'सूक्ष्मशरीर' सर्व कांहीं असेल–तुला सांगतो, बाबारे! ईश्वराची भक्ति हेंच एक सार आहे. त्यांना भक्तीचा लाभ करून घेण्याची आवड असेल, भगवानाचा लाभ हा त्यांचा उद्देश असेल तर ते लोक चांगले. महात्मे, चंद्रलोक यांच्यांतच गुरफटून राहिल्यानें ईश्वराचा लाभ होणार नाहीं. Spiritualism, Theosophy, चंद्रलोक, नक्षत्रलोक–बाबारे ! मला यांतलें कांहीं माहीत नाहीं. या असल्या हिशेबाशीं करायचें आहे काय ? तुम्ही बागेंत आंबेच खायला आलांत ना ? मग आंबे खा. झाडेंच किती, त्यांना डहाळ्याच किती, त्यांना पानेंच किती, या हिशेबासी काय करावयाचें आहे ? जगांत येऊन ईश्वराचा लाभ करून घेणें हें तुमचें कर्तव्य. तिकडे लक्ष द्या. या असल्या पंचाइतीशीं करायचें आहे काय ? एकदां ईश्वराचा लाभ झाला म्हणजे या गोष्टी जाणण्याची इच्छाही होणार नाहीं.

पुनर्जन्म आहे काय ? होय पुनर्जन्म आहे असें ऐकण्यांत आहे खरें. पण तुला या जन्मजन्मांतरींच्या भानगडींशीं करायचें आहे काय ? अगोदर ईश्वरलाभ करून घे, मग तुला काय पाहिजे तें त्यालाच विचार. अगोदर या गोष्टी जाणण्याचा प्रयत्न करणेंच चांगलें नाहीं.

ब्राम्हसमाज–कोणतेही समाज असोत, माणसांना संसारबंधनांतून मुक्त करणें, त्यांचा उद्धार करणें हें कांहीं उपदेशानें होणारें नाहीं, ही माणसाच्या हातची गोष्ट नाहीं. ज्यानें ही माया निर्माण केली तोच तिच्यापासून माणसाला सोडवूं शकेल । ज्यांना ईश्वराचा लाभ झाला नाहीं, ज्यांना त्याचा आदेश प्राप्त झाला नाहीं, अथवा ज्यांच्यामध्यें ईश्वरीशक्तीचा उदय झाला नाहीं ते कसचे दुसऱ्याला संसारबंधनांतून मुक्त करितात !

## ६ देशाचें—जगाचें हित !

वैराग्याच्या उपदेशानें–वेदांतानें–जगाचा सत्यानाश झाला आहे म्हणून जगाचें हित होईल असा कांहीं उपदेश द्यावा असें तुमचें म्हणणें–पण " बाबू ! गंगेंतलीं खेंकडयाचीं पिलें पाहिलीं आहेस काय ? या अनंत ब्रह्मांडामध्यें

मनुष्य म्हणजे तसलाच एखादा क्षुद्र प्राणि नव्हे काय ? मग त्याला स्वतःचा एवढा अभिमान कशाला हवा ? एक नुसता केंस सरळ करण्याचेंही सामर्थ्य नाहीं आणि साऱ्या जगाचें हित करावयाच्या गोष्टी ! हें जग ज्याचें आहे तो तर कांहीं विसरला नाहीं ना ?

साधनें करून अगोदर ईश्वराचा साक्षात्कार करून घ्या. त्यानें जर तुह्माला शक्ति दिली तरच तुह्मी सर्वांचें हित साधूं शकाल, नाहीं तर नाहीं.

बाबारे ! सर्व कांहीं ईश्वराधीन आहे ही गोष्ट मनुष्याला अखेरीस कळून येते.

## ७ जगन्मिथ्या !

तूं तेवढा सत्य आणि जगत् मिथ्या होय ? आपण स्वतः आहोंत तोंपर्यंत जगत् सत्य आहेच. जेव्हां अहंकार नाहींसा होईल, ईश्वरदर्शन होईल, तेव्हांच दिसून येईल कीं तोच हे जीव–जगत् झाला आहे. विचारानें समजणें निराळें आणि ईश्वरानें समजावलेलें निराळें !

८

ईश्वराचें ध्यान कोठें करावें ?

हृदयामध्यें. भक्ताचें हृदय हाच त्याचा आवडता दिवाणखाना होय.

९

एकादशी करीत जावी. त्यायोगानें मन पवित्र होतें व ईश्वराचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न होते.

१०

मुक्ति केव्हां मिळेल ? अहंकार जळेल तेव्हांच.

११

विवेक ह्मणजे ईश्वरच नित्य व इतर सर्व अनित्य हा विचार.

## १२ साधक व साधनें.

पाण्यांत नौका तरंगत असेल तर ठीक; पण नौकेंत जर पाणी शिरूं लागलें तर मात्र कठिण; त्याप्रमाणें साधक संसारांत असला तरी चालेल पण साधकांत संसार शिरला तर मात्र कठिण !

जे लोक भक्तीची, उपासनेची थट्टा करितात, धर्म आणि धार्मिकांची निंदा करितात त्यांच्यापासून साधकानें दूर रहावें !

विश्वासाची कास धरून शांतपणें साधनें करा. हजार तर्कविचार कराल, तर क्षुद्र मन तेव्हांच गढूळ होऊन जाईल. ज्याच्याजवळ विश्वास आहे त्याच्या-जवळ सर्व कांहीं आहे. विश्वास नाहीं त्याजजवळ कांहींच नाहीं.

ह्याच जन्मांत ईश्वरलाभ करून घेईन असली मर्दानी प्रचंड विश्वासाची भक्ति ईश्वराला फार आवडते.

---

# १९ रामसुधाबिंदु.

## ( स्वामी रामतीर्थांचे विचार )



१

आमच्या सर्व भावना एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेपुढें विनम्र झाल्या पाहिजेत.

२

हिंदुस्थानांत असंख्य शक्ति काम करीत असून सुद्धां प्रत्येक शक्ति परस्पर विरुद्ध दिशेनें जात असल्यामुळें त्यांची फलित प्रेरणा जवळ जवळ शून्य आहे! प्रत्येकजण आपल्या शेजाऱ्याचें दोषाविष्करण करण्यांत गुंग आहे हें त्याचें कारण होय.

३

पुढारी अथवा नेता होण्यास लायक कोण? जो आपल्या मदतगारांच्या मूर्खपणाबद्दल, अनुयायांच्या अविश्वासाबद्दल, मानवसमाजाच्या कृतघ्नतेबद्दल, व बहुजनसमाजाच्या अरसिकपणाबद्दल कधींही कुरकुरत नाहीं तो.

४

स्वातंत्र्य व प्रेम यांची जिवंत ज्योत ही सामर्थ्याचें रहस्य आहे.

५

शेजाऱ्यांवर आत्मवत्प्रेम करणें हा आध्यात्मिक आरोग्याचा नियम आहे आणि ह्याचा अवलंब करणें एवढाच काय तो परकीय राजकारणाच्या जाळ्यांतून स्वदेशाला सोडविण्याचा उपाय आहे.

६

आमच्या देशबांधवांमध्यें जर कोणती जागृति करावयाची असेल तर टीकावृत्तीची नसून रसिकता, भ्रातृभाव, समष्टित्व व सेवागौरव या वृत्तीची होय.

७

स्त्रिया, मुलें व शूद्र हीं राष्ट्रांचीं पाळेंमुळें आहेत. वरिष्ठ दर्जाचे लोक हीं फळें आहेत. पाळामुळांकडे कानाडोळा केलांत म्हणजे सर्व वृक्षालाच आंचवलांत म्हणून समजा. त्यांच्या शिक्षणाकडे ( उन्नतीकडे ) दुर्लक्ष करणें म्हणजे फांद्या कापून टाकणें होय.

८

मुखावरील प्रसन्नता व दिव्य तेज हीं त्यागी वृत्तीशिवाय प्राप्तच होत नाहींत.

९

प्रेमभक्तीच्या पूर्ण स्वाधीन झाल्याशिवाय ती मिळत नाहीं.

१०

देणें हा घेण्यापेक्षां अधिक चांगला व सोपा सौदा आहे.

११

अर्जुनानें घोड्याचा लगामा भगवान् श्रीकृष्णाच्या स्वाधीन केल्या होत्या. हेंच खरें वेदांतीजीवन होय.

१२

त्यागीवृत्तीनें सामर्थ्य वाढतें, उल्हास पल्लवित होतो, मनःशक्ति दृढावते व मुख्यतः मनुष्य परमेश्वर होतो. त्यागामुळें भय व चिंता जाऊन मनुष्य निर्भय व निश्चिंत होतो.

१३

संकुचित अहंपणाचा म्हणजे स्वार्थाचा त्याग केल्यावांचून खरा त्याग होतच नाहीं.

१४

कालियामर्दनानंतर जशा कालियाच्या स्त्रिया कृष्णचरणीं विनम्र झाल्या तशाच आशासर्प नष्ट झाल्यावर सर्व वस्तु लीनतेनें पायीं लोटांगण घालीत येतील.

१५

सद्वस्तु म्हणतात ती मीच आहे अशा अनुभवांतच मी जागा होईन असा निश्चय करून निद्रावश व्हा.

१६

आपले शेजारीपाजारी व ज्यांचा आपल्याशीं संबंध येतो ते सर्व यांच्यांशीं आपलें ऐक्य व आत्मीयत्व अनुभवणें यालाच प्रेम म्हणतात.

१७

खरें प्रेम हें सूर्याप्रमाणें आत्म्याचा विकास करितें व मोह हा धुक्याप्रमाणें आत्मसूर्याचा संकोच करितो.

१८

ज्यानें कधीं प्रेमच केलें नाहीं त्याला ईश्वराचें ज्ञान होणें नाहीं.

१९

प्रथम अंतःकरण काबीज करा, मग बुद्धिवाद सांगा.

२०

अधिक खणल्याशिवाय पाणी लागत नाहीं. प्रेम खोल गेल्याशिवाय अश्रु-पात होत नाहींत.

२१

पशुविकारांना ओहटी लागली कीं, दैवी भावनांना पूर आलाच म्हणून समजावें.

२२

जशी परिस्थिति अधिक कठीण तसें त्यांतून यशस्वी रीतीनें निभावणारे पुरुष अधिक सामर्थ्यवान् म्हणून पौरुषत्वाकरितां संकटें व काळजी यांचें स्वागत करा. संकटांचा आनंदानें स्वीकार करा.

२३

सोऽहं हा आपला जन्मसिद्ध हक्क असल्यानें निर्भय अंतःकरणानें तो प्राप्त करून घ्या. भीतीनें अंतःकरण खचूं देण्याऐवजीं आपल्या मूलरूपानें छातीठोकपणानें पुढें येऊन ' शिवोऽहं शिवोऽहम् ' असा घोष दणदणून करा. हाच तुमचा जन्मसिद्ध हक्क आहे.

२४

साधु बनण्याची किंवा साक्षात्कारप्राप्तीची इच्छा करणारे फार, पण तत्प्रीत्यर्थ किंमत देण्याची तयारी करणारे मात्र विरळा ! साक्षात्काररूपी रत्न पाहिजे असल्यास क्षुद्र अहंकार व शुष्क ज्ञान ही किंमत द्या.

२५

दृष्टिकोन बदला. प्रत्येक वस्तुकडे देवभावनेनें पहा.

२६

मुक्तीचा म्हणजे साक्षात्काराचा एकच मार्ग आहे आणि तो म्हटला म्हणजे जीवंतपणीं मरणें, स्वतःचें मरण स्वतः अनुभवणें हाच होय !

२७

पतित व पापी यांना जो अपत्यवत् वात्सल्यप्रेमानें आणि व्यापक मनानें आपलेसें मानतो तो महात्मा.

२८

ऐहिक वित्ताकरितां लोक आपापसांत लढतात, पण काय आश्चर्य आहे पहा ! पारमार्थिक वित्त ' घ्या घ्या ' ह्मणत असतां कोणी तें घेत तर नाहींतच, पण उलट तें देणाऱ्यांना ठार मारायला तयार होतात.

२९

दुष्काळांत अगर ग्रंथिक सन्निपातासारख्या प्रसंगांत लोक एक होतात,

ह्मणजे त्यांच्या दुष्ट भावना विराम पावतात. याचा अर्थ सर्वांचा सम विचार होतो. हा समविवेक, ही आत्मौपम्य बुद्धि हीच ऐक्याचें ह्मद्गत आहे. म्हणून पतिपत्नी समविवेकी, अभिन्न व विचारी बनतील तर गृहसौख्य मिळेल.

३०

इतरांपेक्षां आपण श्रेष्ठ ही कल्पना आत्मविनाशाचा पाया आहे.

३१

आचरणांत आणतां न येणाऱ्या ज्ञानाचा संग्रह हा आध्यात्मिक बद्धकोष्ठता किंवा मानसिक अपचन उत्पन्न करितो !

३२

देवाच्या दृष्टीनें जगाकडे पाहण्यास शिकणें हेंच खरें शिक्षण आहे.

३३

एखाद्यामध्यें बारीकसा दोष आढळतांच त्याच्या अंगच्या चांगुलपणाबद्दलच्या आदराला एकदम खो देणें ही कोणती वृत्ति ? ही अधमवृत्ति हें उघडच आहे.

३४

जे वर्तमानपत्रें वाचीत नाहींत ते धन्य होत, कारण ते निसर्गाकडे वळून परमेश्वराला पाहतील.

३५

बांसरी वाजवून एकदां कां सर्पाला मोहित केला कीं त्याला धरून त्याचे दांत पाडतां येतात व मग तो निरुपद्रवी होतो. त्याचप्रमाणें मन एकदां कां अध्यात्मज्ञानानें मोहित झालें कीं, तें मरतें.

३६

बांसरी आंतील मगज काढून पोकळ करावी लागते, व नंतर छिद्रित करावी लागते तेव्हांच तिच्यांतून जगाला मोहून टाकणारें संगीत बाहेर पडतें. तसेंच मनांतून अहंकार काढून टाकून त्याला भक्तीचीं छिद्रें पाडा कीं जगाला मोहून टाकणारें मनःसंगीत त्यांतून बाहेर पडेल !

३७

आत्माराम हाच प्रेमोद्भवस्थान करा, परप्रेमापेक्षी बनूं नका. तुह्मी स्वतः प्रेममय बनल्यावर इतरांची अंतःकरणेंही तुमच्याकडे आकर्षिलीं जातील. आत्मप्रेमरूपी गुरुत्वाकर्षण–शक्तीच्या बाहेर कोणता अंतःकरणगोल आहे ?

३८

क्षणभंगुर आसक्तीनें ज्याचा मार्ग रुद्ध होत नाहीं, जो समबुद्धीनें सर्वत्र वावरतो, देवघेव मोकळेपणानें करितो, कशाचीही याचना करीत नाहीं, उद्विग्नता ज्याला शिवत नाहीं–अशाचीच लोकांत पूजा होते.

३९

राष्ट्रांत भांडणास ऊत आला म्हणजे देशभक्तांचा सुकाळ होतो !

४०

सज्जनांचें केवळ जगणें हाच त्यांचा जगाला आशीर्वाद होय.

४१

सद्‌गुणाला जाहिरातीची जरूर नाहीं.

४२

सौंदर्य ही आत्मारामाची भाषा आहे.

४३

जे अंधश्रद्धेच्या नांवानें खडे फोडतात, त्यांच्या उतावळ्या चिकित्सेच्या नांवानें कां ओरड करूं नये ?

४४

टीकाकार आणि निंदक हे वाळू आणि राख यांच्यासारखे शुद्धिकारक आहेत.

४५

अंतःकरणें काबीज करण्याचा रामबाण उपाय म्हणजे आपलें अंतःकरण देणें हा होय.

---

# २० त्रिगुणांचे धर्म.



गीतेंत गुणत्रयविभागयोगाचा १४ वा अध्याय प्रसिद्धच आहे. ह्या विषयाचें असेंच सुंदर निरूपण भागवत स्कंध ११ अ० २५ मध्यें आहे. त्याच्याच आधारें पुढील कोष्टक तयार केलें आहे. तमाहून रजोगुण चांगला, रजाहून सत्वगुण चांगला व गुणातीत होणें सर्वांत उत्तम. रजतम दाबून सत्वगुण वाढवावा म्हणजे पूर्णसत्वोदयानें निस्त्रैगुण्यावस्था प्राप्त होते. असो. कर्म, कर्ता, ज्ञान, देश, श्रद्धा, सुख, आहार इत्यादि सर्व त्रिगुणात्मक आहेत. त्यांतील सत्वाचा भाग तेवढा घेऊन बाकीच्यांचा त्याग करावा. पुढील कोष्टकास ७ आंकड्यांपुढें भागवतांतील १३ अध्यायाचा आधार घेतला आहे.

| तामस. | राजस. | सात्विक. |
|---|---|---|
| १ ता० **कर्म**—हिंसा, दंभ, निंदा, मत्सर इ० मलिनवृत्तींनीं केलेलें कर्म. | रा० **कर्म**—इहामुत्रफलाची इच्छा ठेवून केलेलें कर्म. | सा० **कर्म**— ब्रह्मार्पणबुद्धीनें किंवा फलेच्छा व कर्तृत्वाभिमान सोडून केलेलें कर्म. |
| २ ता० **कर्ता**—निःशेष हारपे विवेकज्ञान। स्मृति सैरा वळघे रान। नाठवे कार्यकारण । ऐसा कर्ता जाण तामस॥३४९॥ —नाथ. | रा० **कर्ता**—फलाभिलाषेच्या चित्तीं गांठीं। तेणें अंध झाली विवेकदृष्टि। राजस कर्ता फलाशेसाठीं। अति दुःख कोटी स्वयें सोशी ॥ नाथ ॥ ३४८ ॥ | सा० **कर्ता**—सद्गुरुचरणसंगें । सकल संग छेदी विरागें । सात्विक कर्ता निजांगें। विषयसंगें असंगीं ॥ नाथ ॥ ३४७॥ |
| ३ ता० **ज्ञान**—आहार, निद्रा, भय मैथुनादि सेवनापुरतें जें प्राकृत ज्ञान तें तामस होय. “ महामोहो गिळी ज्ञानस्फूर्ति । मी जड अंध मानी निश्चिती । नश्वर पदार्थी आसक्ति । तें ज्ञान निश्चिती तामस. ” | रा० **ज्ञान**—वेदशास्त्रांचें सांग अध्ययन होऊनही ‘ अद्वैतनिश्चयो नाहीं चित्तीं’ असें असेल तर तें ज्ञान राजस होय. विषय व इंद्रियें यांच्या सेवेंत खर्च होणारें भेदज्ञान राजस होय. | सा० **ज्ञान**—आध्यात्मिक ज्ञान तें सात्विक होय. एकपणाचें अभेदज्ञान तें सात्विक ज्ञान. ‘ देहीं असोनि देहातीत । भूतीं भूतात्मा भगवंत । भूता सबाह्य समराभरित । हें ज्ञान निश्चित सात्विक ॥ —नाथ ॥ ३१५ ॥ |

| तामस. | राजस. | सात्विक. |
|---|---|---|
| ४ ता० देश—द्यूतालयें, कलालांचीं किंवा अंमल करणाऱ्यांचीं घरें, गुणदोषचर्चा जेथें होते किंवा साधुनिंदा घडते अशीं स्थानें तामस होत. | रा० देश--चव्हाटा, राजद्वार, बाजारपेठ, सभास्थानें, नाटकगृहें इ. राजस स्थानें होत. | सा० देश--एकांतवास 'पवित्र आणि तीर्थभूत। विजनवन एकांत।ऐसिये वस्ती सुखावें चित्त ।तो वास निश्चित सात्विक' हरिमंदिर, सत्संगतीं वास, सात्विक होत. |
| ५ ता० श्रद्धा—अधर्माला धर्म समजणारी श्रद्धा. 'जेथें अपेयाचें पान। स्वेच्छा अभक्ष्य भक्षण। अगम्यादि घडे गमन। ते श्रद्धा जाण तामसी.' | रा० श्रद्धा--कर्मश्रद्धा राजस. आपल्या वर्णाश्रमाचा, जातीचा, देशाचा भाषेचा, अभिमान घेऊन केलेल्या कर्मांत दिसून येणारी श्रद्धा राजस. 'मी देह' ही श्रद्धा राजस. | सा० श्रद्धा--आत्मज्ञानाविषयींची श्रद्धा सात्विक होय. ' मी आत्मा, मी ब्रह्म ' अशी श्रद्धा सात्विक. |
| ६ ता० सुख--मोहदैन्यापासून उत्पन्न झालेलें सुख तामस. | रा० सुख--वैषयिक सुख राजस. विषय व इंद्रियें याच्या संयोगानें होणारें सुख राजस. | सा० सुख--आत्मसुख सात्विक. विषयेंद्रियांच्या संगतीवांचून सहज आत्मसुख होतें तें सात्विक. |
| ७ ता० आहार--पीडादायक व अपवित्र आहार तो तामस होय. | रा० आहार--इंद्रियप्रेष्ठ आहार तो राजस. गोड, खरपूस, आंबट, तळीव, चमचमीत, फोडणीचे, पन्हीं, चटण्या इ. | सा० आहार—पवित्र, सुलभ व अप्रयासानें मिळणारा आहार सात्विक. अल्प व धर्मार्जित आहार तो सात्विक होय. |
| ८ ता० शास्त्रें--पाखंड मत हें तामस शास्त्र होय. वेद व ईश्वर यांना न मानणारीं पाखंडशास्त्रें होत. | रा० शास्त्रें —प्रवृत्तिपर शास्त्रें हीं राजस होत. राजकारण, इतिहास, अर्थशास्त्र, काव्यनाटकें, गणित, भूगर्भशास्त्र, धर्मशास्त्र, चौदा विद्या, चौसष्ट कला, व्यवहारनीतिशास्त्र, कृषि, इ. राजस होत. | सा० शास्त्रें--निवृत्तिपर शास्त्रें हीं सात्विक होत. श्रुति, गीताभागवतादि ग्रंथ, संतांचे ग्रंथ हे सात्विक होत. |

| तामस. | राजस. | सात्विक. |
|---|---|---|
| ९ **ता० उदकें**–मद्यादि. | **रा० उदकें**—सुगंधी उदकें, अत्तरें, वासाचीं तेलें, नाना प्रकारचे रस, वाळ्याचें पाणी, कापराचें पाणी इ० | **सा० उदकें**-तीर्थोदक व गुरुपादोदक हें सात्विक होय. |
| १० **ता० जन**–पाखांडी, ढोंगी, लबाडलोक. | **रा० जन**—प्रवृत्तिमार्गांतले लोक. सभापति, व्यापारी, शेतकरी, राजकारणी व प्रपंचव्यवसाय करणारे विविध प्रवृत्तींचे लोक. चव्हाठा ज्यांना आवडतो ते लोक राजस. | **सा० जन**–विरक्त, संत, ज्ञानी, योगी व भक्त, 'देव वसे ज्यांचे चित्तीं' ते सात्विक लोक. दुराचारी लोक तामस, संसारी लोक राजस व विरक्त पुरुष सात्विक होत. |
| ११ **ता० काल**–मध्यरात्र. चोर, वेश्या, पापी, यांचा अनुकूल काल. | **रा० काल**—प्रदोषसमय; सूर्योदयापासूनचा व्यवहारकाल सारा राजस. | **सा० काल**–ब्राह्ममुहूर्त. 'ब्राम्हे मुहूर्ते चोत्थाय चिंतयेदात्मनो हितम्.' |
| १२ **ता० ध्यान**-शत्रूंचें व त्यांच्या घातपातादि साधनोपायांचें ध्यान तें तामस. | **रा० ध्यान**–विषयांचें ध्यान, म्हणजे स्त्रीपुत्रगृहादिकांचें ध्यान राजस. | **सा० ध्यान**–" सत्वोपाधि शरीर साचें । चैतन्यघन स्वरूप ज्याचें । तो श्रीविष्णु ध्येय सात्विकांचें । ध्यान याचें करावें "–नाथ ॥९.४॥ उपास्याचें ध्यान तें सात्विक होय. |
| १३ **ता०मंत्र**-क्षुद्र जारणमारणादि मंत्र. | **रा० मंत्र**— काम्यमंत्र. | **सा० मंत्र**–प्रणव. सकल मंत्रांची जननी, म्हणजे गायत्री होय. |

# २१ तुळस.

—:ऽ:—

कलकत्त्यांतील एका दैनिक पत्रांत विचारणा झाल्यावरून, रावबहादूर गुप्ते यांनीं तुळशीचें वर्णन दिलें आहे तें उपयुक्त वाटल्यावरून येथें देत आहों. रावबहादूर ह्मणतातः—“ तुळशीचें रसायनशास्त्राच्या मदतीनें परीक्षण झालेलें आहे. लंडन येथील इंपीरियल इन्स्टिटयूट संस्थेंत डॉक्टर गोल्डिंग यांनीं व मिस्तर पेली यांनीं असें ठरविलें आहे कीं, तुळशीच्या पानांत एका प्रकारचें हवेंत उडून जाणारें अंमली तेल सांपडतें. हें तेल औषधी आहे. रोग–जंतुनाशक थॉयमल म्हणून एक पदार्थ वैद्यशास्त्रांत प्रसिद्ध आहे. या तेलाचेच गुण तुळशीच्या तेलांत आढळून येतात.

मेजर लारीमोर या साहेबांनींही अनुभव घेऊन सिद्ध केलें आहे कीं, तुळशीच्या अंगीं चिलटें मारण्याची शक्ति आहे. ह्मणजे तिच्या हवेनें चिलटें मरून पडतात. सर जॉर्ज बर्डवुड हे मोठे ग्रंथकार आहेत. ‘ बॉंबे ड्रग्स ’ म्हणून त्यांनीं येथें असतांना एक जंगी पुस्तक प्रसिद्ध केलें. ते ग्रँट मेडिकल कॉलेजांत प्रोफेसर होते. त्यांनींच राणीचा बाग वसविला. त्या वेळीं ती जागा दलदलीची असल्यामुळें तेथें चिलटांचा मोठा उपद्रव होता व तापसराईही फार होती. त्यांच्या हाताखालीं देखरेख करणारे पालेकर नांवाचे सारस्वत ब्राह्मण होते, त्यांच्या सूचनेवरून सर साहेबांनीं जिकडे तिकडे तुळशीच लावल्या. परिणाम--चिलटांचा नाश व तापसराईचें उद्चाटन ! तुळशीला प्रदक्षिणा घालण्यांत बायकांच्या शरीरप्रकृतीस मोठा फायदा आहे. वृंदावन उंच करून त्याजवर तुळस लावण्याची वहिवाट आपल्या देशांत आहे. तिचा हेतु प्रदक्षिणा घालणाऱ्या बायकांच्या नाकापर्यंत तुळशीची उंची येऊन तींतून निघणाऱ्या वायूचा पुरापुरा फायदा मिळावा असा दिसतो ! तुळस खिस्ताच्या थडग्यावर रुजली होती त्यामुळें तिच्या पाश्चिमात्य नांवानें ‘ सेंट बेसिल डे ’ म्हणून एक सण ग्रीस देशांत मानला जात आहे ! त्या दिवशीं तेथील मडमा तुळशीची फांदी ( बेसिलची ) हातांत घेऊन पाऱ्याकडे जातात व तीजवर पवित्र जलसिंचन करवून त्या परत घरीं आणतात आणि आपल्या मुलांबाळांसह त्यांतील थोडा पाला आमच्या गुढीपाडव्याच्या लिंबाप्रमाणें खातात ! शिलुक राहिलेली ‘ डहाळी ’ घरांत टांगून ठेविली म्हणजे चिलटांचा, कसरीचा व उंदरादिकांचा उपद्रव होत नाहीं अशी त्यांची समजूत आहे. मुसलमानी धर्मांत तुळशीच्या वर्गांतील सबजा नांवाचें झाड पवित्र मानलें आहे. तें दर्ग्याजवळ प्रेतें पुरतात तेथें लावण्याची

चहिवाट आहे. एकंदरींत पहातां पाश्चिमात्य शास्त्रान्वयें तुळशीच्या तेलांत शेंकडा ३२ भाग थॉयमल हा औषधी पदार्थ असल्यामुळें तो दाराशीं लाविल्यापासून फायदाच आहे. मात्र ती आवारांत पुष्कळ लावावी." सदरील वर्णन राव-बहादूर यांनीं कलकत्त्यांतील सर्वसंग्रहालयांतील वनस्पतिपरीक्षणपटु डॉ. हूपर यांस पाहण्यास पाठविलें तेव्हां त्यांनीं कळविलें कीं, तुळशीचा आम्ही तीन वेळ तपास केला आहे. तिच्यांतील सुगंधि तेल औषधी आहे. थॉयमल हा पदार्थ हवा साफ करण्यास फार उपयोगी आहे व डॉक्टर लोक त्याचा शस्त्र-क्रियेस आणि क्षतें पडतात तेव्हां उपयोग करीत असतात.

---

# २२ भक्तीचें गौरव.



**तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥**

—तुकाराम.

नवविधाप्रकारानें देवाची भक्ति करावयाची असली तरी भक्तीचें स्वरूप एकविधच आहे. पदार्थ नऊ वेळां सेवन केला तरी पदार्थ एकच व गोडीही एकच; तसा परमात्मा एकीएक आहे. मुख्य देव एक आहे, दोन नाहींत. निर्गुण तोच व सगुण तोच. हरि एकजिनसी आहे. मग सृष्टि त्याहून वेगळी व जीव वेगळा असें कसें होईल ? सूर्याची प्रभा, किंवा साखरेची गोडी तसा देवाचा व जगाचा संबंध आहे. देव व जग हे दोन शब्दही समजुतीपुरते. बाकी शब्द गाळले कीं, हरिरसायन एकच आहे व तो एकच आहे हेंही म्हणायला दुसरें कोणी नाहीं ! अशा हरीच्या स्वरूपीं समरसतेचा आनंद भोगणें याचें नांव भक्ति. ज्ञानोबाराय १३ व्या अध्यायांत म्हणतातः—

नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा ।
आम्हां आणि चराचरा । संबंध तैसा ॥
जालेनि जगें मी झांके । तरी जगत्वें कोण फांके ? ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ? ॥
अलंकार आलें । तरी सोनेपण काई गेलें ? ।
कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ? ॥
म्हणोनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोहे–उखितें । आघवें मीचि ॥

लाटांना समुद्राची संतति म्हणावी पाहिजे तर, पण तेथें समुद्रावांचून दुसरें काय आहे ? जगानें देव झांकतो तर जगद्रूपानें कोण नटलें आहे ? वरच्या प्रभेनें काय हिरा लोपतो–कां अधिक प्रगटतो ! अलंकारपणानें प्रगटलें म्हणून काय सोनेपण गेलें ? कमळ फांकल्यावर काय कमळ नष्ट होतें ? तात्पर्य, जग वेगळें सारून नारायणाला पहायला नको आहे. जगद्रूपानें तोच नटला आहे. अशा देवाशीं भक्तही ‘जैसें कनकेसीं कांकणें । असिजे अनन्यपणें’ तसा अनन्यच असतो. अनन्य असतो तोच भक्त !

१–२

स वै पुंसां परो धर्मो यतो भक्तिरधोक्षजे ।
अहैतुक्यप्रतिहता ययात्मा सुप्रसीदति ॥ १ ॥

वासुदेवे भगवति भक्तियोगः प्रयोजितः ।
जनयत्याशु वैराग्यं ज्ञानं यत्तदहैतुकम् ॥ २ ॥

--स्कंद १-२

**भावार्थः**—अधोक्षज ह्म० भगवान् विष्णु यांच्या ठिकाणीं निर्हेतुक व अखंड (अप्रतिहत) भक्ति जेणेंकरून उत्पन्न होते तो पुरुषाचा परम धर्म होय. भक्तीच्या योगानें अंतरात्मा प्रसन्न होतो. भगवान् वासुदेवाच्या ठायीं उत्पन्न झालेला भक्तियोग ज्ञान आणि वैराग्य देण्यास समर्थ असतो. भक्तीमुळें वैराग्य व ज्ञान यांचा लाभ होतो व तें ज्ञानही अहेतुक असतें—त्या ज्ञानाला हेतु ह्म० तर्कादि कारण नसतात.

१ **अधोक्षज**:--अधःकृतं अक्षजं इंद्रियजं ज्ञानं येन सः ह्म० इंद्रियजन्य ज्ञानाला तुच्छ करणारा, इंद्रियजन्य ज्ञानानें प्राप्त न होणारा तो अधोक्षज. ज्ञानोबांनीं ' जो इंद्रियांसी चोरून जेवी । तयासीच फावे ' असें याच अर्थानें म्हटलें आहे.

२ **वासुदेवः**--वसन्ति भूतानि यस्मिन् स वासुः । स चासौ देवो द्योतनशीलः ह्म० ज्याच्या स्वरूपीं सर्व देव राहतात असा प्रकाशमय ( देव-दिव्-प्रकाशणें ) थोरला देव.

३-४

भजंति ये विष्णुमनन्यचेतस-
स्तथैव तत्कर्मपरायणा नराः ।
विनष्टरागादि विमत्सरा नरा-
स्तरंति संसारसमुद्रमाश्रमम् ॥ ३ ॥
नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं
न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ।
कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे
न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥ ४ ॥

--स्कंध १-५

जे भगवान् विष्णूला अनन्यभावानें भजतात व त्याच्या प्रेमामुळें श्रौतस्मार्त कर्म करून तें त्यालाच समर्पण करितात, आणि त्यामुळें रागद्वेषरहित व निर्मत्सर होतात असे भक्त संन्यासयोगादि परिश्रमावांचून (आश्रमम्) भवसमुद्र तरून जातात.

ब्रह्मज्ञान निरंजन म्हणजे मायारहित निर्मल असें झालें व निष्काम कर्मयोगाशीं संगत जरी झालें तरी भगवद्भक्तिविरहित असेल तर तें शोभा पावत नाहीं. ब्रह्मज्ञान व निष्कामकर्मयोग याला भक्तीची जोड असेल तरच त्यांस

शोभा आहे, एरवीं नाहीं ! भक्तीवांचून अपरोक्ष साक्षात्कार नाहीं हा भाव, तर मग जें कर्म अभद्र आहे ह्म० देहबुद्धीनें व स्वार्थानें केलेलें असेल किंवा स्वार्थमूलक नसलें तरी भगवदर्पण बुद्धीनें केलेलें नाहीं, तें शोभा पावत नाहीं हें काय सांगायला पाहिजे ?

५-६

नैकात्मतां मे स्पृहयन्ति केचित् मत्पादसेवाभिरता मदीहाः ।
येऽन्योन्यतो भागवताः प्रसज्ज सभाजयन्ते मम पौरुषाणि ॥ ५ ॥
पश्यंति ते मे रुचिरावतंसप्रसन्नवक्त्रारुणलोचनानि ।
रूपाणि दिव्यानि वरप्रदानि साकं वाचं स्पृहणीयां वदन्ति ॥ ६ ॥

—स्कंध ३-२९

कपिलदेव आपल्या मातेस भक्तिरहस्य सांगतांना म्हणतातः—मदीहाः ह्म० मदर्थ—माझ्यासाठीं ज्याच्या सर्व ईहा ह्म० चेष्टा—व्यापार चाललेले असतात असे कित्येक पुरुष माझ्या चरणसेवेंत रंगल्यामुळें एकात्मता म्ह० सायुज्यता किंवा मोक्ष याची इच्छा करीतच नाहींत. असे माझे भक्तभागवत मेळ्यामेळ्यांनीं एकत्र जमून माझ्या गुणानुवादांतच दंग होतात. माझीं पौरुषें म्ह० गुण पराक्रम गाण्यापासून भक्तांना लाभ काय होतो म्हणून विचारशील तर सांगतों कीं भगवद्दर्शनानंद मुक्तींतही नाहीं. तें माझें दिव्य परम सुंदररूप, माझें प्रसन्न मुखकमल व माझें कमलनेत्र पाहून आनंदभरित होतात व मुखानें जे शब्द बोलतात ते मला सुख देतात.

निर्गुणबोधापेक्षांही सगुण प्रेमांतच दंग होतात.

मोक्ष तुमचा देवा । दुर्लभ तो तुम्ही ठेवा ॥ १ ॥
मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ २ ॥

—तुकोबाराय.

७

तत्कर्म हरितोषं यत्साविद्या तन्मतिर्यया ।
हरिर्देहभृतामात्मा स्वयं प्रकृतिरीश्वरः ॥ ७ ॥

—स्कंध ४-२९

**भावार्थः**—तेंच कर्म कीं जें नारायणाला संतोष देतें, तीच विद्या कीं जी मति हरीकडे वळवितें. कारण कीं, हरि हा सर्व देहवंतांचा आत्मा आहे. सर्वांचा तो ईश्वर म्हणजे नियंता आहे व तो स्वतंत्र आहे म्हणजे सर्वांचें कारण असून त्याचें कारण कोणी नाहीं.

८

हरिर्हि साक्षाद्भगवान् शरीरिणामात्मा झषाणामिव तोयमीप्सितम्
हित्वा महांस्तं यदि सज्जते गृहे तदा महत्वं वयसा दंपतीनाम् ॥ ८ ॥

**भावार्थः**—झष म्हणजे मत्स्य. माशांना जसें सर्वोपरी जल प्रिय तसा सर्व भूतांतरात्मा हरि भक्तांना परमप्रिय असतो. अशा हरीला विसरणारा मनुष्य लौकिकांत केवढाही मोठा ( महान् ) म्हणजे नानागुणप्रसिद्ध असला तरी संसारांतच गुरफटून राहील तर त्याला महत्व केवळ वयामुळेंच प्राप्त होईल, ज्ञानामुळें नाहीं.

९–१०

नारायणपराः सर्वे न कुतश्चन बिभ्यति ।
स्वर्गापवर्गनरकेष्वपि तुल्यार्थदर्शिनः ॥ ९ ॥
वासुदेवे भगवति भक्तिमुद्वहतां नृणाम् ।
ज्ञानवैराग्यवीर्याणां नेह कश्चिद्व्यपाश्रयः ॥ १० ॥

—स्कंध ६–१७

**भावार्थः**—नारायणाचे भक्त कशाला व कोणालाही भीत नाहींत. ते निर्भय असतात. स्वर्ग, नरक व मोक्ष यांकडे ते सारख्याच दृष्टीनें पाहतात. म्हणजे ते यांविषयीं उदासीन असतात. भगवान् वासुदेवाचे भक्त ज्ञानवैराग्य-बलावर इतर कोणताच आश्रय मानीत नाहींत. इतके ते निरिच्छ व निस्पृह असतात.

११

कौमारे आचरेत्प्राज्ञो धर्मान् भागवतानिह ।
दुर्लभं मानुषं जन्म तदप्यध्रुवमर्थदम् ॥ ११ ॥

—स्कंध ७–६

प्रल्हाद दैत्यकुमारांना बोध करितांना म्हणतातः—कुमारहो ! सुज्ञ माणसानें बाळपणींच या भागवतधर्माचें आचरण केलें पाहिजे. कां कीं, मनुष्यजन्म दुर्लभ आहे व तोही नश्वर पण उत्तम फल देणारा आहे.

१२

रायः कलत्रं पशवः सुतादयो गृहा मही कुंजरकोशभूमयः ।
सर्वेऽर्थकामाः क्षणभंगुरायुषः कुर्वन्ति मर्त्यस्य कियत् प्रियं चलाः ॥१२॥

—स्कंध ७–७

**भावार्थः**—द्रव्य, स्त्री, पशु, पुत्रादि, गृह, शेतवाडी, गजादि धनकोश इ० सर्व अर्थ आणि काम क्षणभंगुर आहेत, व हे बलवान् असले तरी मनुष्याचें काय प्रिय करूं शकणार आहेत ? तात्पर्य, विषयार्जनाच्या नादीं लागून हरीला विसरणें निष्फल व अनर्थावह होय.

१३–१४

नालं द्विजत्वं देवत्वमृषित्वं वा सुरात्मजाः
प्रीणनार्थं मुकुन्दस्य न वित्तं वा बहुज्ञता ॥ १३ ॥

न दानं न तपो नेज्या न शौचं न व्रतानि च ।
प्रीयतेऽमलया भक्त्या हरिरन्यद्विडंबनम् ॥ १४ ॥

—स्कंध ७–७

**भावार्थः**—हे असुरपुत्र हो ! द्विजत्व, देवत्व किंवा ऋषित्व हें हरीच्या प्रेमसंपादनाला पुरेसें होत नाहीं. वित्त, सर्वज्ञता, दान, तप, यज्ञ, शुचिता किंवा नाना व्रतें यांच्याही योगानें देव जोडत नाहीं; हरी फक्त निर्मल ( निष्काम ) भक्तीला वश होतो, भक्तीवांचून इतर साधनें व्यर्थ होत.

ही प्रऱ्हादाची दानवपुत्रांना शिकवणूक आहे.

१५

मन्ये धनाभिजनरूपतपः श्रुतौजः
तेजःप्रभावबलपौरुषबुद्धियोगाः ।
नाराधनाय हि भवन्ति परस्य पुंसो
भक्त्या तुतोष भगवान्गजयूथपाय ॥ १५ ॥

—स्कंध ७–९

**भावार्थः**—माझें मत असें आहे कीं, धन, सत्कुलजता, रूप, तप, पांडित्य ( श्रुत ), इंद्रियपाटव ( ओज ), तेज, प्रताप, बल, उद्यमपरता (पौरुष), बुद्धि व अष्टांगयोग यांनीं पुरुषोत्तम प्रसन्न होत नाहीं. वरील धर्म नसलेल्या गजेंद्रावरही देव त्याच्या भक्तीमुळें प्रसन्न झाले म्हणून भक्तीनें देवाला भजा.

१६

आसामहो चरणरेणुजुषामहं स्यां ।
वृंदावने किमपि गुल्मलतौषधीनाम् ॥
या दुस्त्यजं स्वजनमार्यपथं च हित्वा ।
भेजुर्मुकुंदपदवीं श्रुतिभिर्विमृग्याम् ॥ १६ ॥

—स्कंध १०–४७

**भावार्थः**—गोपींच्या निर्मल कृष्णभक्तीला मोहित झालेला उद्धव म्हणतो:—अहो ! ज्या गोपी-सामान्य माणसांना त्याग करण्यास कठिण अशा स्वकीयजनांचा व क्षुण्ण आर्यमार्गांचा त्याग करून श्रुतिशोधित अशा श्रीकृष्णपदाला शरण गेल्या—त्या ह्या गोपींचे चरणरज सेवन करीत वृंदावनांत ह्या गुल्मलतांच्या मध्यें मी कोणीतरी व कांहींतरी ( यत्किंचित् ) होऊन राहीन काय ? निस्सीम कृष्णभक्त अशा गोपींच्या चरणरजसेवनानें धन्य होण्याइतकें माझें भाग्य उजळेल काय ?

१७

दानव्रततपोहोमजपस्वाध्यायसंयमैः ।

श्रेयोभिर्विविधैश्चान्यैः कृष्णे भक्तिर्हि साध्यते ॥१७॥

—स्कंध १०-४७

**भावार्थः**—उद्धव म्हणतोः—दान, व्रत, तप, होम, जप, स्वाध्याय ( वेदाध्ययन ), इंद्रियजय व इतर नानाविध श्रेयस्कर साधनांच्या योगें श्रीकृष्ण परमात्म्याची भक्तीच साधावयाची आहे. भक्ति हें साध्य आहे व हीं साधनें आहेत.

१८

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा
बुद्ध्यात्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै
नारायणायेति समर्पयेत्तत् ॥१८॥

—स्कंध ११-२

**भावार्थः**—सर्व कर्मे ईश्वरार्पण करणें हा मुख्य भागवतधर्म होय. कायेनें, वाचेनें, मनानें, इंद्रियांनीं, बुद्धीनें, चित्तानें किंवा स्वभावविशेषानें जें जें कर्म घडेल तें तें नारायणाला समर्पण करावें.

१९

इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ।
दारान्गृहान्सुतान्प्राणान्यत्परस्मै निवेदनम् ॥१९॥

—स्कंध ११-३.

भावार्थः—आपलें सर्व इष्ट, दान, तप, जप, आचरित, प्रिय, स्त्री, गृह, सुत व प्राण—सर्व परमेश्वराला निवेदन करावेत. ही आत्मनिवेदनभक्ति होय.

२०

भक्त्याहमेकया ग्राह्यः श्रद्धयात्मा प्रियः सताम् ।
भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि संभवात् ॥२०॥

—स्कंध ११-१४

**भावार्थः**—सर्वांतर्यामी, सत्प्रिय असा मी भगवान् केवळ विमलभक्तीनें वश होणारा आहे. माझ्या ठिकाणीं भक्ति असेल तर ती चांडालांनाही त्यांच्या जातिदोषांपासून मुक्त करून पावन करिते.

२१-२२

कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना ।
विनानंदाश्रुकलया शुद्ध्येद्भक्त्याविनाऽऽशयः ॥ २१ ॥
वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं
हसत्यभीक्ष्णं रुदति क्वचिच्च ।

विलज्ज उद्गायति नृत्यते च
मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥ २१ ॥

स्कंध ११-१४

शरीरावर हर्षरोमांचादि सात्विक अष्टभाव उभे राहिले नाहींत, चित्त द्रवलें नाहीं, भक्तिसुखानें आनंदाश्रुप्रवाह वाहात नाहींत, अशा भक्तीवांचून आशय म्हणजे अंतरात्मा शुद्ध तरी होणार कसा ?

माझ्या ( हरीच्या ) भक्तिसुखानें अंतःकरणाला पाझर फुटून ज्यांचा कंठ सद्गदित झाला आहे व त्यामुळें जो कधीं हांसतो, कधीं रडतो, कधीं निर्लज्ज होऊन नाचतो व गातो असा भक्त त्रैलोक्याला पावन करितो.

२३

न मय्येकांतभक्तानां गुणदोषोद्भवा गुणाः ।
साधूनां समचित्तानां बुद्धेः परमुपेयुषाम् ॥ २३ ॥

--स्कंध ११-२०

जे एकनिष्ठ भक्त, साधुशील, समचित्त व बुध्दीपलीकडील परमात्म्याशीं समरस झालेले असतात त्या माझ्या भक्तांना कर्माकर्मामुळें उत्पन्न होणारीं पापपुण्यादि बंधनें नाहींत.

२४

केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगाः ।
येऽन्ये मूढधियो नागाः सिध्दा मामीयुरंजसा ॥ २४ ॥

—स्कंध ११-२१

केवळ भक्तिभावाच्या योगानें गोपी, गाई, वृक्ष, पशु, नाग ( कालियादि सर्प ) व इतर मूढबुध्दि प्राणि सिध्दावस्थेस पोंचले व तात्काळ ( अंजसा ) माझ्या स्वरूपीं मिळाले आहेत.

---

# २३ समाधानाची गोष्ट.

**जें कांहीं करीसी तें माझें स्वहित ।**

—श्रीतुकाराम.

१. जीवनराव नांवाचा एक सच्छील गृहस्थाश्रमी मनुष्य होता. त्यानें सारा जन्म भगवदाराधनेंत, पुण्यकर्मांत व परोपकारांत घातला होता. घरदार, शेतवाडी, उदीमधंदा पूर्वापार चालत आल्याप्रमाणें मुनीम व इतर सेवकजन चालवीत होते. तात्पर्य पुरून उरण्याइतकी घरीं संपत्ति होती पैशाची थोडीही चिंता करण्याचें कारण नव्हतें. जीवनरावाला बाळपणीं आजोबांचा लळा फार असल्यामुळें व आजोबा नामांकित शिवभक्त होऊन गेलेले असल्यामुळें शिवभक्तीचें बाळकडू लहानपणींच मिळालें होतें. जीवनरावाला संगतीही चांगली लागली होती. यामुळें पानसुपारी, तंबाखू, अफू कोणतेंही लहानमोठें व्यसन जन्मांत लागलें नव्हतें. त्याला पाणी किंवा गोरस यांशिवाय तिसरें पेय माहीत नव्हतें. खारट, आंबट, तेलकट, तिखट इत्यादि पदार्थांचा त्याला मनापासून तिटकारा होता. सौम्य आहार, सौम्य विहार, सौम्य भाषण, सौम्य विचार यामुळें त्याचें मन नवनीतासारखें मृदु झालें असून शक्य तितका परोपकार करण्याचें त्याला वळणच लागून गेलें होतें. 'नकार' त्याला माहीत नव्हता. गाजावाजा न होतां भूतदयेचीं इतकीं कृत्यें त्याच्या हातून घडलीं होतीं कीं तीं एक शंकरालाच माहीत. 'प्रदानं प्रच्छन्नं' हें त्याचें व्रत. त्याची शरीरयष्टि निरोगी, निकोप, सुदृढ होती. सारा जन्म शिवभक्तींतच त्यानें घालविला होता. त्याची पार्थिवपूजेसमयीं वृत्ति परकाष्ठेची तन्मय होत असे व तोच आनंद २४ तास त्याच्या अंतःकरणांत भरून राही. साऱ्या जन्मांत एकही कृत्य त्यानें काळोखांत केलें नाहीं. स्वप्नांतही मनाला टोंचेल असें कांहीं त्याच्या हातून घडलें नाहीं. गंगेसारखें निर्मळ मन. याप्रमाणें या परम थोर शिवभक्ताचें आयुष्य ६० वर्षें गेलें. सर्व कांहीं घरीं अनुकूल. आरोग्य, धन, यश, सुख—कशांतही रेसभर कमी नव्हतें,—पण !

२. श्रीसमर्थांनीं 'जगीं सर्वसूखी असा कोण आहे ?' असा प्रश्न विचारला आहे. त्याला 'सर्वसुखी कोणी नाहीं' असेंच नकारार्थी उत्तर द्यावें लागतें. 'कोठें कांहीं कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं' असा हा संसार आहे. जीवनरावाला संतान नव्हतें ! एवढा शिवभक्त उदार पण अपत्याभावाचा विचार त्याच्या मनाला टोंचीत होता. त्याला लहानपणापासून मुलांचें अत्यंत वेड होतें, पण सर्वदा मुलें दुसऱ्यांचीं खेळवायचीं, स्वतःला कांहीं नाहीं. या विचारामुळें त्याला उदास वाटे. एवढी घरदारसंपत्ति, हा लौकिक, हें शिवोपासनेचें व्रत–याचें आपल्यामागें काय होणार असा विचार येऊं नये, पण येत होता खरा. शेवटीं दोन वर्षें त्यानें पूजोत्तरकालीं 'मला एक पुत्र दे' अशी शंकराची मनोभावें प्रार्थना करायचा क्रम सुरू ठेवला. त्या दयाघनानें

त्याची प्रार्थना ऐकली. ६० व्या वर्षीं त्याला सुलक्षणी मुलगा झाला !

३. मुलाचें कौतुक काय विचारायचें आहे? घरांत कांहीं कमी नव्हतें. खाणें-पिणें, कपडेलत्ते, दागदागिने सर्व तयार होते. मुलाच्या तोंडून शब्द निघायचा अवकाश, कीं वस्तु तयार. मुलगा बापाच्या भोंवतीभोंवतीं खेळायचा. अंगाखांद्यावर, मांडीवर, माडीवर, गाडीवर, मुलाची प्रत्येक हौस यानें पुरवावी. मुलगा मोठा होत चालला. मुंज मोठी कडाक्यानें केली. दानधर्म केला. मुलाचे खेळ, त्याच्या खेळाच्या जिनसा, त्याचे खेळगडी या सर्वांची जोड मिळाली. हौस व साधनांची अनुकूलता असल्यावर सुखास काय कमी ! जीवनरावाचें घर सुखानें नाचूं लागलें.

अचळश्री अरोग काया । सगुण पुत्र पवित्र जाया ।
बहुजन्म हरिहरांच्या पाया । भजतां हें फळ पाविजे ॥

ह्या मुक्तेश्वराच्या वचनाप्रमाणें श्रीशंकरप्रसादानें अढळ संपत्ति, रोगरहित सुदृढ शरीर, गुणवंत पुत्र व सदाचरणी भार्या, या चार गोष्टी दीर्घकालीन पुण्यबळानें त्याला प्राप्त झाल्या. त्याचा अंतरात्मा सुखसागराच्या लहरींशीं खेळत होता. बाळासाहेबांचें कौतुक स्वतः करणें, व दुसऱ्याकडून तें झालेलें ऐकणें, यापरता त्याला दुसरा कोणताही उद्योगच राहिला नाहीं. बाळासाहेबास १८ वें वर्ष लागलें. लग्नाच्या वाटाघाटी चालल्या. थोरामोठयांच्या मुली सांगून येऊं लागल्या. घरांत लग्नाची तयारी जारी चालू राहिली. डाळी निसणें, तांदुळ कांडणें, पापडपाडच्या कुरवड्या इत्यादि कामें होऊन राहिलीं. मोतीवाले, सोनार, कापडवाले यांच्या येरझारा सुरू होऊन खरेदी एकसारखी चालू झाली. जीवनरावाचा वाडा माणसांनीं फुलला. वाडा दिवसरात्र बोलूं लागला. जीवनरावाचा संसार सुखाच्या शिखरावर गेला !

४. श्रीसमर्थांनीं ' सुख सुख म्हणतां तें दुःख ठाकोनि आलें ' असें म्हटलें आहे. अगदीं तसेंच झालें. लग्नाला पंधरा दिवस राहिले आहेत तों बाळासाहेब एकाएकीं सर्पदंश होऊन मृत्युमुखीं पडला ! झालें. सारा कारभार आटोपला. सारा वाडा, सारा गांव शोकांत बुडून गेला. जिकडे तिकडे हाहाकार झाला. जीवनरावाला जग शून्य झालें. वैराग्य आणि भक्ति त्याच्या अंगीं मूळचीच होती व त्यांची त्यानें जोपासनाही उत्तम प्रकारें केली होती. वैराग्याच्या अग्नीवर मध्यें १८ वर्षें पुत्रप्रेमाची रक्षा गोळा झाली होती, ती आपत्तीच्या फुंकणीनें फुंकून टाकतांच पुन्हा तो दसपट तेजानें प्रज्वलित झाला. पुत्रशोकाचा धक्का खाऊन जीवनरावाची बायकोही चवथ्या दिवशीं त्याला टाकून गेली. जीवनरावाच्या अंतःकरणाचा शेवटचा प्रेमबंधही तुटून गेला. त्यानें तिचीही क्रिया केली व १३ व्या दिवशीं साऱ्या इस्टेटीवर तुळशीपत्र ठेवून ती दान करून देऊन टाकली व साध्या लंगोटीनिशीं बाहेर पडला, तों पुन्हां त्याचें तोंड जगानें पाहिलें नाहीं !

५. जीवनरावानें आत्महत्या केली नाहीं, तो अविचार त्यांच्या हातून घडला नाहीं, त्यानें तडक हिमालयाची वाट धरली. तो ८० वर्षांच्या घरांत आला असूनही त्याची प्रकृति निरोगीच काय पण सशक्त होती. सदाचार व सुविचार हे फार मोठें टॉनिक आहे! पवित्र विचारांचा ज्याला नित्य खुराक मिळतो त्याची शरीरयष्टीही सामान्यतः सदृढ असते. जीवनरावानें गंगाबाईचा शेजार पाहून एकांतस्थानीं वस्तिं केली व शंकराची आराधना १८ महिने केली. त्याची कडकडीत तपश्चर्या पाहून भगवान् श्रीशंकर प्रसन्न झाले व मूर्त होऊन त्याच्यापुढें प्रगट झाले आणि त्यानीं त्याच्या मस्तकावर आपला पद्मकर ठेविला. श्रीशंकराच्या दर्शनाचा एरव्हीं त्याला महदानंद झाला असता, पण त्यानें विशेष कामनेनें हें अनुष्ठान केलें असल्यामुळें शंकराची दयाकर मूर्ति पाहतांच त्याच्यांतल्या क्रोधवृत्तीनें उसळी मारली व शंकरास वंदनही न करितां तो स्थिर पण सकोप मुद्रेनें शंकराकडे पाहत राहिला! शंकर सर्वज्ञच हें काय सांगायला पाहिजे! त्यांनीं सर्व जाणलेंच होतें. भक्ताच्या भेटीची त्यांनाही आर्त होतीच. तेही दयामय दृष्टीनें भक्ताकडे पाहत राहिले. त्यांच्या हृदयांत आनंद भरला होता. ते आनंदरूप होते. कांहीं काळ सर्व स्तब्धता. मग उभयतांचा संवाद झाला.

**शंकरः**-- जीवनराव! तुला कांहीं बोलायचें आहे? बोल एकदां.

**जीवनरावः**--देवा! मीं आज दोन वर्षें या वयांत जी ही खडतर तपश्चर्या केली तिचा हेतु एकच आहे आणि तो हाच कीं 'एवढा तूं दयासागर व भक्तवत्सल असतांना तुझ्यांत ही निर्घृणता कां? असा कठोरपणा तुझ्या दयामय अंतःकरणांत कसा राहतो?' हें तुला स्पष्ट विचारावें! असा मला आज बरा सांपडलास. बोल, बोल, तूं असा निष्ठुर कसा? मी साऱ्या जन्मांत पाप केलें नाहीं, मग माझ्यावर आपत्तींची ही घोरपड कां टाकलीस? तुझ्या जीवांवर मी दयेचा वर्षाव करीत असतांना तूं माझ्यावर दुःखाचा अशनि कां टाकलास? बोल ऐकूं दे!

**शंकरः**--वत्सा! तुम्हीं मानव अल्पज्ञ, अल्प समजुतीचे आहांत. तुम्हांला दूरदृष्टि नाहीं. तुमच्यांतले विवेकी पुरुष सुद्धां अल्पज्ञ आहेत. अरे! तूं माझा भक्त, निष्पाप, परोपकारी आहेस हें काय मी जाणत नाहीं? तुझें कायेचें, वाचेचें, मनाचें प्रत्येक कृत्य तुझ्या आधीं मला कळत असतें. कोणताही विचार तुमच्या मनांत उद्भवण्यापूर्वीं तो मला आधीं कळतो; कां कीं मी मनाचें मन आहे, मनाला प्रेरणा करणारा मीच आहे. माझ्यापासून जीवाला काय लपवितां येईल? तेव्हां मी तुला पुरें जाणतों. माझें तुझ्यावर पहिल्यापासून लक्ष आहेच. मला तूं अत्यंत प्रिय आहेस व म्हणूनच मी तुझ्या कल्याणाचा मार्ग तुला दाखवीत आलों, तुझें हितच करीत आलों.

**जीवनराव**:—मोठयांनीं असें म्हणावें व गरीबांनीं तें निमूटपणें ऐकावें, असा जगाचा क्रमच आहे ! काय मला ६० वर्षांचें वय होईपर्यंत पुत्र दिला नाहींस ही माझ्या कल्याणाची गोष्ट ? सर्वलक्षणलक्षित सुंदर गुणी.पुत्र ८० वर्षांच्या वयांत हिरावून नेलास ही काय माझ्या कल्याणाची गोष्ट ?

**शंकर**:--हो ! तुझ्या कल्याणासाठींच दोन्ही गोष्टी मला कराव्या लागल्या. कशा त्या ऐक–वयाचीं साठ वर्षे तूं माझें निष्काम भजन केलेंस म्हणून तुझा उद्धार करावा असें मीं योजिलें होतें. पण दोन वर्षे 'मला पुत्र दे, मला पुत्र दे' म्हणून तूं जेव्हां धरणें धरून बसलास तेव्हां तुझ्या प्रार्थनेकडे लक्ष देऊन मीं तुला पुत्र दिला. पुत्र दिला तुझ्या हितार्थ व नेलाही तुझ्या हितार्थ !

**जीवनराव**:--वा ! तें कसें काय ? माझें हित कसें ?

**शंकर**:–हें तर अज्ञानास्तव तुम्हांला कळत नाहीं. प्रथम तुला पुत्र दिला नाहीं हें तुझ्या हितार्थच,नंतर दिला व नेला हें सारें तुझ्या हितार्थच होय.माझ्या उपासनेंत तूं गुंग झालास, तेव्हां तुझ्यामागें मोहपाश नसावा म्हणून मुलगा दिला नाहीं. तूं साठींत शिरलास व पुत्रकामनेनें तुझें अंतःकरण घेरलेलें पाहिलें, तेव्हां तुला मुलगा दिला. पण पुत्रमुख पाहिल्यापासून तुझा मोह एवढा अनावर झाला कीं दिवसारात्रीं, घरींदारीं, जागृतिस्वप्नांत, तूं पूर्वीं जें माझें अखंड ध्यानस्मरणभजन करीत होतास तें पार विसरून गेलास व पुत्राचेंच चिंतन करूं लागलास. तेव्हां हा मोहपाश तोडल्याशिवाय तूं पुन्हां सावध होणार नाहींस, म्हणूनच मला तुझा मुलगा न्यावा लागला. मुलगा असतांना कार्याकारण संसार वानप्रस्थाप्रमाणें करीत राहून तूं अंतर्यामीं सावध व मोकळा राहिला असतास तर तुझा मुलगा नेण्याचें कारण नव्हतें. 'यस्यानुग्रहमिच्छामि तस्य सर्वं हराम्यहम्' हें तर माझें ब्रीद आहे. तूं अखंड मद्ध्यानपर राहतास तर मुलगा पाहिजे, मुलगा आला, मुलगा गेला या तीनही मनोवृत्तींच्या पाशांत न सांपडतास. झालें, ह्या सर्वांचें बीज तुझ्या वासनेंत आहे चित्त निर्वासन झाल्याशिवाय माझी प्राप्ति, माझा आनंद, माझें दर्शन–नाहीं. निःशेष कामनारहित व्हावें, तेव्हां भक्त होण्याची योग्यता येते. पुत्राचा मृत्यु झाल्याबरोबर तुझें अंतःकरण मोहनिर्मुक्त झालें. वैराग्यानें भूमि तप्त झाली. उरलेली खळबळ या तपाचरणानें नष्ट झाली व अंतः करण सकलमोहांपासून मुक्त होऊन तुला माझें आज प्रत्यक्ष दर्शन झालें.

**जीवनराव** ( परमानंदभरित होऊन ):—भगवन् ! आतां समजलें. वासना हें संसाराचें बीज आहे व वासनाक्षय हें मोक्षाचें मूळ आहे. 'जें कांहीं करीसी तें माझें स्वहित' हें कळलें. आपल्या प्रसादानें चित्त आतां उपशम पावलें आहे. आपली ही मूर्ति अखंड माझ्या ध्यानांत व आपलें नाम मुखांत राहो.

**शंकर**:—तथास्तु.

---

# २४ संत माताजींची गोष्ट.



१. गुलाबचंद नांवाचा एक कोटयाधीश व्यापारी मुंबईस महालक्ष्मीकडे राहत असे. आरोग्य, संपत्ति, संतति, लौकिक, सर्व बाबतींत गुलाबचंदाचें घर म्हणजे संसारी लोकांस एक उत्तम नमुनाच होता. त्याची बायको मोठी दयाधर्मशील सती होती. नवराबायकोचें अन्योन्य प्रेमही वाखाणण्यासारखें होतें. बायकोचें लक्ष जितकें देवाधर्माकडे व साधुसंतांकडे होतें तितकें नवऱ्याचें दुर्लक्ष होतें. मात्र तो नास्तिक नव्हता. त्याला सत्संग कधीं घडलाच नव्हता. सत्संगावांचून भगवत्प्रेम कधींही उत्पन्न होत नाहीं. भगवद्भक्त भेटल्याशिवाय जनांचीं हृदयें हरिप्रेमरसाची गोडी चाखायला पात्र होत नाहींत. लक्ष्मीबाई ( हें गुलाबचंदाच्या बायकोचें नांव होतें ) हिचा काळ हरिसेवेंत व परोपकारांत जात असल्यामुळें तिच्या चित्ताला समाधान होतें, पण हें समाधान आपल्या पतीच्या चित्ताला कधीं मिळेल एवढीच तिला तळमळ होती. गुलाबचंदाच्या चित्तांत द्रव्याशिवाय कसलाच विचार स्वप्नांतही येत नसे. बँका, शेअरबाझार, एक्सचेंज, सोन्याचांदीचे व हरएक जिनसांचे भाव, खरेदीविक्री, खर्च व शिल्लक यांशिवाय त्याच्या डोक्यांत कांहींच नसे. झोंपेंतसुद्धां तो हाच व्यवहार बरळत असे !

२. गुलाबचंदाचा वाडा राजवाडयासारखा शृंगारलेला असे. तेथें प्रत्यक्ष लक्ष्मीच नांदत असल्यामुळें ऐहिक वैभवाला कांहींच कमतरता नव्हती. फ्रान्स व जर्मनी येथून उत्तम फर्निचर आणून सारा वाडा सजवलेला होता. वाडयाच्या भोंवतीं उत्तम व प्रशस्त बाग असून तींत नाना प्रकारचीं फुलझाडें व फळझाडें लावलेलीं असत. एके दिवशीं रात्रीं पिठासारखें स्वच्छ चांदणें पडलें असतांना व चोहोंकडे शांततेचें साम्राज्य पसरलेलें असतांना गुलाबचंद व लक्ष्मीबाई यांच्यांत खालीं दिल्याप्रमाणें संवाद झाला. गुलाबचंद लक्ष्मीबाईस म्हणालाः—

" आज महिनाभर मी आपल्या मुनीमाच्या साह्यानें आपल्या एकंदर जिंदगीची मोजदाद करण्यांत गुंतलों होतों. त्याचा हिसाब आज पुरा झाला. "

" मग शेवटीं काय ठरलें ? "

" आपली एकंदर इस्टेट आज आठ कोटींची आहे. हा हिसाब पाहिल्यापासून माझ्या मनांत एक विचार घोळत आहे तो हा कीं, दरएक पिढीस दोन कोटी याप्रमाणें चार पिढयांची आपणांस काळजी नाहीं, इतकी संपत्ति आज

आपल्यापाशीं आहे. पण पांचव्या पिढीचें कसें चालेल याची मला मोठी काळजी लागून राहिली आहे."

३. लक्ष्मीबाईला पतीच्या मोहवशतेचें नवल वाटलें व मनांतून पतीची तिला कींवही आली. आपल्या पतीचें देवधर्म—साधुसंताकडे लक्ष कसें लागेल याचा विचार तिच्या मनांत नेहमींच घोळत असे. ह्या प्रसंगीं त्या विचारानें उसळी मारली. ती नम्रतेनें विषय बदलण्याच्या हेतूनें म्हणाली:—

" आपल्या समोर माताजी राहातात त्यांना आपण पाहिलें आहे काय ?"

" ओझरतां चार दोन वेळ पाहिलें आहे. येथील बरीच चांगली चांगली मंडळी त्यांजकडे जात असतात. त्या कोण आहेत ? तूं त्यांच्याकडे कधीं जातेस काय ? "

" होय; कधीं कधीं जात असतें. माताजी एक थोर बाई आहे. त्यांचें वैराग्य, भक्ति व ज्ञान सर्वच कांहीं अपूर्व आहे. त्यांना मुलेंबाळें, नातवंडें वगैरे सर्व आहेत. त्यांचा पति वारून पंधरा वर्षें होऊन गेलीं. पति ज्ञानी होता, तोच त्यांचा गुरु होय. त्याजपाशींच त्या उपनिषदें व भागवत शिकल्या. माताजींचा पति वारला तेव्हां पतीला एक लाख रुपये कर्ज होतें, तेवढीच त्याची इस्टेटही होती. पतीला सावकाराच्या ऋणांत ठेवावयाचें नाहीं म्हणून माताजींनीं सर्व ईस्टेटीची विल्हेवाट लावली, व ' योगक्षेमं वहाम्यहम् ' ह्या भगवंताच्या वचनावर विश्वास ठेवून राहिल्या. माताजी फार प्रेमळ भक्त आहेत. देवावर त्यांची निर्मळ निष्ठा आहे. कर्ता, हर्ता, भर्ता देवच आहे. देवावांचून कांहींच नाहीं असें त्या नेहमीं बोलत असतात, व देवानें त्यांच्या संसाराचें ओझें वाहिलें आहे. त्यांच्या घरीं समृद्धि व शांति दोन्ही नांदत आहेत. कांहीं कमी नाहीं. चिंता त्यांना शिवत नाहीं. देवाचें नांव घेत त्या आनंदांत असतात. त्या खचित थोर भक्त आहेत. "

" हें सगळें खरें पण चरितार्थ कसा चालतो ? "

" हीच तर मौज आहे. त्या उद्यांची काळजी करीत नाहींत व आजचीही करीत नाहींत. कोठून तरी सामानसुमान येतें, शिधा येतो, कोणी कांहीं आणून देतें. दर्शनेच्छु पाहुण्यांची ही गर्दी असते. तरी कमतरता कधींच नसते. "

" तर मग उद्यां तूंच २० माणसांचा शिधा त्यांजकडे नेऊन दे. "

" नाहीं. तें काम आपणच करा. "

४. अशी समाधानी बाई आपण स्वतःच पहावी, चार शब्द तिच्याशीं बोलावेत, अशी गुलाबचंदांना इच्छा झाली. त्याप्रमाणें ते दुसरे दिवशीं सकाळीं ८ वाजतां मोठा शिधा नोकरांच्या डोक्यावर देऊन माताजीकडे गेले. माताजी शांतपणें गादीवर बसून गोष्टी करीत होत्या. घरांत शांतिसुख नांदत होतें. त्याचा स्पर्श शेटजींच्या नित्य तळमळणाऱ्या चित्ताला होऊन त्यांना नवल वाटलें.'दर्शना-

देव साधवः ' शेटजींना अलोट संपत्तींत लोळत असतांना जें परम शांतिसुख जन्मांत कधींच भेटलें नव्हतें तें माताजींच्या घरांत अणुरेणूंत भरलेलें दिसून परमाल्हाद झाला. 'हेंचि देवाचें दर्शन । जेथें राहें समाधान ' ह्या साधुवचनाचा त्यांना साक्षात्कार झाला. एकदम उपशमसुखांत त्यांचें चित्त निमग्न झालें व त्यांनीं पूज्यबुद्धीनें माताजींच्या पायांवर मस्तक ठेवलें. माताजींचे त्यांचे कुशल-प्रश्न झाले. शेवटीं शिधा आणल्याचें सांगून तो स्वीकारण्याची शेटजींनीं नम्र विनंति केली. तेव्हां माताजी म्हणाल्या:—

" आजची तरतूद नारायणानें केली आहे. तेव्हां आज कांहीं शिध्याची गरज नाहीं. आणला तसा घेऊन जा, कोणी गरजू असतील त्याना द्या. "

" पण उद्यांला तरी लागेलच ना ? उद्यांचा म्हणून ठेवून घ्या. "

" काय ? उद्यांचा विचार आज करूं ? छे ! छे ! उद्यांचा विचार उद्यां. ज्यानें आजची तजवीज केली तो काय उद्यांची करणार नाहीं ? उद्यांची उद्यां. या क्षणाचा भरंवसा नाहीं तर उद्यांचा संग्रह व काळजी आज कां म्हणून करायची ? नारायण दयाळु आहे. सर्व त्याचीं लेकरें आहेत. तो सर्वांचा सर्वत्र सांभाळ करितो. ' स रक्षिता रक्षति योहि गर्भे. '

शेटजींचें मस्तक पुरें लवलें. पांचव्या पिढीची काळजी करणाऱ्या शेटजींचे डोळे उघडले. माताजींनीं त्यांस बोध केला. त्यांनीं त्याजपासून भागवतधर्माची दीक्षा घेतली व उदारहस्तानें द्रव्याचा परोपकारांत वेंच करण्यांत व भगवच्चिंतनांत त्यांचा काळ जाऊं लागला.

# २५ ' ब्राम्हण्य रक्षावें आदरें । '



( दासबोध )

१. मानवी—जीवितांचें खरें साफल्य म्हणजे त्यानें आपलें मूळचें शुद्ध दिव्य, अविनाशी व निर्भय असें आपलें स्वरूप ओळखून तद्रूप व्हावें—' नराचें नारायण ' होऊन पूर्णत्वाचा उपभोग घ्यावा, हेंच होय. सुखासाठीं सर्वांची सर्व धडपड असते. परंतु हें सुख नश्वर अशा विषयांपासून केव्हांही मिळणार नाहीं. ह्याला शाश्वत अशाच वस्तूची जोड झाली पाहिजे; आणि ती शाश्वत वस्तु म्हणजे या अखिल विश्वांत एकटा ' परमात्माच ' होय, असा वैदिक धर्मशास्त्राचा सिद्धान्त आहे. मानवी जीवितांचें साफल्य अथवा त्याची उन्नति ती

हीच. ही उन्नति सर्व जीवांची व्हावी आणि सर्वांना परिणामीं शाश्वत सुखाचा अनुभव घेतां यावा म्हणून भारतीय—आर्यांनीं वैदिकधर्माचा सांप्रदाय स्थापन केलेला आहे. हा सांप्रदाय फार पुरातन आहे. इतर अनेक सांप्रदाय त्याचे मागून अस्तित्वांत आले पण ते पुढें सत्याच्या अभावीं टिकूं शकले नाहींत. वैदिक सांप्रदाय अबाधित सत्याच्या पायावर उभारलेला असल्यामुळें, हजारों शतकें त्याचें अस्तित्व अजून कायम आहे. आणि जोंपर्यंत जीवाला पूर्णत्वाची स्वाभाविक अपेक्षा राहणार तोंपर्यंत तो कायम राहणार, हेंही निर्विवाद आहे !

२. या आर्य-सांप्रदायाची उपयुक्तता जाणून व तो कायम टिकावा म्हणून आर्यऋषींनीं भारतीय समाजाची घटना चातुर्वर्ण्यव्यवस्थेवर स्थापन केली; आणि या व्यवस्थेंत ‘ ब्राह्मण ’ हा मूळ वर्ण म्हटला आहे. विराट् पुरुषाच्या मुखापासून प्रथम ब्राम्हण, नंतर बाहूंपासून क्षत्रिय, ऊरूंपासून वैश्य व पायांपासून शूद्र अशी उत्पत्तिपरंपरा वैदिक ग्रंथांतून सांगितलेली आहे. अर्थात् ब्राह्मण हा आद्यवर्ण असल्यामुळें, त्याजवर या सांप्रदायाच्या संरक्षणाची जबाबदारी निसर्गतःच अधिक येऊन पडली. ‘ धर्मस्य ब्राह्मणो मूलम् ’—अशा प्रकारचा मन्वादिस्मृतिशास्त्रांत उल्लेख असून, ‘ ब्राह्मणांच्या इष्टानिष्ट कर्मांवर प्रजेचें इष्टानिष्ट अवलंबून असतें ’—असेंही ह्या धर्मशास्त्रांतून म्हटलें आहे. वृक्षाचें मूळ जोंपर्यंत निर्दुष्ट व दृढ राहील तोंपर्यंतच ह्या वृक्षाचा वरील भागही निर्दोष व दृढ राहूं शकेल. आर्यधर्मसंप्रदायाची इमारत कायम टिकावयाची असल्यास, अर्थात् मूळ पाया जो ‘ ब्राह्मणधर्म ’ तो प्रथम सुदृढ असला पाहिजे. पाया मजबूत असल्याशिवाय वरील इमारत टिकणार नाहीं !

३. परंतु आज ह्या बाबतींत भारतवर्षाची काय स्थिति आपणाला दिसून येते ?—‘ ब्राह्मण बुद्धिपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडोनि झाले । शिष्य शिष्यांचे ॥ हें तों ब्राह्मणांसी कळेना । त्यांची वृत्तीच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ’—अशी या ब्राह्मणवर्णाची अवनति गेल्या सोळाव्या शतकांत राजधर्मगुरु श्रीसमर्थांनीं आपल्या ग्रंथांतून वर्णन केलेली आहे. आणि तिचाच तंतोतंत—किंबहुना अधिक,-आजही आपणांस प्रत्यय येतो. ब्राह्मणधर्माची अवनति झाल्यावर त्याच्या आधारावर उभारलेल्या इतर वर्णांच्या आश्रमधर्माची अवनति दिसून यावी यांत नवल काय ? ब्राह्मणांचा धर्म म्हटला म्हणजे त्यांनीं आचारशुद्धीचे स्वतः नियम पाळून इतरांना अनुकरणीय झालें पाहिजे. आपलें तपःसामर्थ्य वाढवून उन्मत्तांना सन्मार्गगामी केलें पाहिजे. शांति—क्षमा—दया—तितिक्षादि गुणांच्या जोरावर समाजाचें स्वास्थ्य कायम ठेविलें पाहिजे; ‘ विहित कर्मे करणारा अन्यायीजनांचा निर्भीड शास्ता. प्रायश्चित्तादि धर्मांचा वक्ता व सर्वभूतांशीं मैत्री ठेवणारा तोच खरा

ब्राह्मण होय.'—( मनुस्मृति–अ० ११. ) ब्राह्मणधर्माविषयीं याप्रमाणें धर्मशास्त्रांत सांगितलेलें आहे. परंतु, आज भारतीयसमाजाची अत्यंत विस्कळित स्थिति दिसत असून, सदाचारी व तपःसामर्थ्यसंपन्न असा ब्राह्मण हल्लीं समाजांत सहसा आढळून येत नाहीं. ब्राह्मणांचें हल्लींचें सामान्य कर्म म्हटलें म्हणजे 'नोकरी'–सेवा–श्ववृत्ति ! ब्राह्मणांनीं आपद्धर्म म्हणून प्रसंगीं इतर खालच्या वर्णांचीं कर्में करून आपलें जीवित संरक्षण करावें, पण सेवावृत्ति त्यानें केव्हांही पतकरूं नये, अशी त्यांच्या धर्मशास्त्राची निक्षून आज्ञा आहे. परंतु ही आज्ञा आज बाजूला पडली. सेवाधर्मांत स्वबुद्धि कायम राहत नाहीं. निःस्पृहतेचा लोप होतो, स्वतेज नष्ट होतें, शेवटीं आत्मनाश होतो, असा शास्त्राचा नियम आहे. आणि ब्राम्हणधर्माचा हेतु समाजाचें संरक्षण—स्वास्थ्य—हा मुख्यतः असल्यामुळें, ब्राम्हणधर्माचा नाश हा समाजाच्या नाशालाच परिणामीं कारण होणार हें निश्चित आहे. हल्लींच्या आपल्या सामाजिक अथवा राष्ट्रीय अधःपतनाचें मूळ शोधूं गेल्यास, आपणाला तें विशेषतः यांतच सांपडूं शकेल !

४. अर्थात्, ही स्थिति—ही आमची धर्मावनति—पालटल्याशिवाय, आमचा राष्ट्रीय—उद्धार होणार नाहीं; आणि राष्ट्रीय उद्धार प्रथम झाल्यावांचून भारतीयधर्मसंप्रदायाचें कार्य तडीस जाणार नाहीं ! गेल्या १६।१७ व्या शतकांत आत्मोद्धाराच्या बाबतींत हाच प्रश्न समाजापुढें आलेला होता; व आजच्या सारखीच समाजाची तेव्हांही दुर्दशा दृष्टीस पडत होती. राष्ट्रानें तेव्हांही आत्मोद्धाराच्या अनेक चळवळी केल्या परंतु मुळांत जोंवर सुधारणा झाली नव्हती, तोंपर्यंत या प्रयत्नांना यश येऊं शकलें नाहीं. हा यशाचा वांटा पुढें श्रीसमर्थांनीं उचलला. आणि आपल्या तपःसामर्थ्याच्या जोरावर ब्राह्मणधर्माचें पुनरुज्जीवन करून, क्षात्रधर्माच्या साहाय्यानें महाराष्ट्रसमाजाला त्या अवनतीच्या गर्तेंतून मुक्त केलें. रामदासीसंप्रदाय व तेव्हांच्या त्या बिकट परिस्थितींतही त्यांनीं जागोजाग महाराष्ट्रांत स्थापन केलेले शेंकडों रामदासी—मठ हे या गोष्टीची आज साक्ष देतात ! पाशवीशक्तीचें जेव्हां प्राबल्य होतें व त्या शक्तींच्या स्वाभाविक अत्याचारांनीं जेव्हां प्रजा जर्जर होते, तेव्हां ब्राह्मणधर्मच त्या संकटांतून प्रजेला तारण्यास समर्थ असतो, असा इतिहासाचा अनुभव आहे. ब्राह्मण्याच्या तेजापुढें इतर कोणतेंही तेज टिकूं शकत नाहीं.—( महाभारत शां. प. अ. ७८; मनु. ९–३२१ इ०. ) आजवर जेव्हां जेव्हां भारतीयसमाज संकटांत सांपडला तेव्हां तेव्हां ब्राह्मणधर्मानेंच त्याचें रक्षण केलेलें आहे. क्षात्रधर्म आणि ब्राह्मणधर्म ज्यावेळीं एकत्र होऊन कार्य करितात तेव्हांच प्रजेचें रक्षण होतें.–( मनु. अ. ९ ) एकटा क्षात्रधर्म हा बहुधा अत्याचारी असतो. पाशवीशक्ती हाच त्याचा मुख्य आधार. पण त्याला भूतदयाशाली ब्राह्मणधर्माची जोड मिळाली, म्हणजे त्यापासून प्रजासंरक्षणाचें कार्य निष्पन्न

होतें ! क्षत्रियांनीं आपल्या पाशवीशक्तीच्या उन्मादांत प्रजेवर वारंवार जुलूम केल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत, आणि अशा वेळीं ब्राह्मण-धर्मालाच पुढें येऊन त्यांचें निवारण करावें लागलें आहे. म्हणूनच,—' ब्राह्मणांच्या संरक्षणासाठीं सर्वांनीं प्रसंगीं हत्यार घेऊन त्यांचें अर्थात् ब्राह्मणधर्माचें रक्षण करावें ' –असें धर्मशास्त्राचें सांगणें आहे ! ( शां. प. अ. ७८; मनु; बृहदारण्यक; इ० ) निरपेक्षपणें प्रजेची सेवा करणारा–प्रजेचें कल्याण करणारा–प्रजेला सन्मार्ग दाखविणारा–असा कोणी तरी पुरुष अथवा संस्था प्रजारक्षणाकरितां अवश्य असावी लागते. भारतीय आर्यांनीं समाजधर्माचें हें रहस्य ओळखून ब्राह्मणांची संस्था स्थापिलेली आहे. ' सदा शुचिर्भूत, सदाचरण व कोणत्याही प्राण्याविषयीं सदयता हें ब्राम्हणधर्माचें लक्षण होय. '–' ब्राह्मणांनीं हिंसावृत्तीचा त्याग केला पाहिजे, सर्व प्राण्यांशीं मैत्री केली पाहिजे, बंधनकारक अशा गोष्टींविषयीं त्यागी असलें पाहिजे, आणि ज्याचे योगानें इहपरलोकीं भीति उरत नाहीं अशा शोकसंपर्कशून्य ब्रह्मपद–प्राप्तीविषयीं तत्पर असलें पाहिजे '–असें महाभारतादि धर्मग्रंथांतून ब्राह्मणधर्माविषयीं सांगितलेलें आहे. प्राचीन ब्राह्मणांनीं हें कार्य केलें व म्हणूनच–' ब्राह्मणो जायमानो हि पृथिव्यामधिजायते । ईश्वरः सर्वभूतानां धर्मकोशस्य गुप्तये ' ॥ ॥ (मनु. १–९९.) —अशा तऱ्हेचा लौकिक त्यांना समाजाकडून मिळाला. फुकटचा लौकिक कधींही कोणाला मिळत नसतो. त्याला विशिष्ट प्रकारची झीजच सोसावी लागते. ' श्रेष्ठ कार्य करी तो श्रेष्ठ । कनिष्ठ करी तो कनिष्ठ । कर्मानुसार प्राणी नष्ट । अथवा भले ॥–'हा व्यवहाराचा नियम आहे; आणि या नियमानेंच ब्राह्मणांना आजपर्यंत समाजांत मोठेपणा प्राप्त झालेला आहे. हा मोठेपणा त्यांनीं इतःपर कायम ठेवावयाचा किंवा नाहीं, आर्यधर्मसंप्रदायाचें आपलें राष्ट्रीयकार्य त्यांनीं तडीस न्यावयाचें किंवा नाहीं, आणि राष्ट्राची परंपरा व आपलें स्वत्व यापुढें त्यांनीं टिकवावयाचें किंवा नाहीं, याचा विचार ब्राह्मण-बांधवांनीं अवश्य करावा ! ब्राह्मणांची परंपरा अत्यंत उज्ज्वल आहे, त्यांचें धर्मकार्य अत्यंत श्रेष्ठ आहे, आणि हिंदुराष्ट्राच्या व हिंदुसंस्कृतीच्या रक्षणाला त्यांच्या कार्यक्षमतेची केव्हांही अत्यंत गरजही आहे. ही गरज त्यांना भागवावयाची असल्यास व आपल्या राष्ट्रीय–वर्णाश्रमविशिष्ट–धर्मसंस्थेचें स्वाभिमानपूर्वक त्यांना रक्षण करावयाचें असल्यास, इतःपर स्वधर्मरक्षणाकडे त्यांनीं प्रथम अगत्य लक्ष्य दिलें पाहिजे; आणि या कामीं कालमानानुसार पडेल ती झीज सोसून, स्वधर्माचा त्यांनीं उद्धार केला पाहिजे !

---

# २६ श्रीशारदास्तोत्र.

रचयिताः— **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर**

## लावणी.

पाव शारदे ! मला दयाळे ! स्थिर राहे अंतरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ ध्रु० ॥
त्वत्पदपंकजभृंग जाहलों गुंजारव करित मी ।
भ्रमलों श्रमलों मायातमीं ॥
सेवेसी सप्रेम लाविली तन धन वाचा मती !
तुजविण नेणे अन्या गती ॥
संतमुखें गुणकीर्ति ऐकुनी दर्शनास घाबरा ।
झालों न दिसे मुळिंचा झरा ॥
दर्शन नाहीं, प्रसादचिन्ह स्पष्ट दिसेना कुठें ।
तरि मग सेवकजनमन तुटे ॥
नानामतपाखंड बंड ऊदंड माजलें जनीं ।
पडेना ज्ञानांजन लोचनीं ॥
त्रिखंड धुंडित मनें हिंडलों बहु ब्रह्मांडोदरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ १ ॥

२

सत्संगीं मज माये ! पडली तुझी ओळखी नवी ।
क्षणक्षण चित्तीं तुज आठवी ॥
चार सहा अठराहि लागती माये ! तुझिया पदा ।
भोगिती अखंड सुखसंपदा ॥
संत कवीश्वर शास्त्रकारहि प्रेमें वाखाणिती ।
गाती उल्हासें गुणतती ॥
सर्वज्ञ श्रुतिशास्त्रपुराणें काव्यनाटकें कथा ।
गर्जती वाग्ब्रह्मेति प्रथा ॥
रूप तुझें हरिहरां न वदवे बाळक मी तों किती ।
शब्दीं वर्णूं कैशा रितीं ? ॥
स्फूर्तिरूप तूं स्फुरसि भगवति ! प्रेमें मम अंतरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ २ ॥

३

निर्गुण निश्चळ परब्रह्म त्या ' बहू व्हावें म्यां ' अशी ।
स्फुरली मति त्या नेणों कशी ! ॥
ब्रह्मीं आदिस्फूर्ति जाहली तेंचि तुझें निश्चिती ।
चंचळे ! रूप विमळ तें अती ॥
जाणिववायुस्वरूप ऐसी सूक्ष्मस्फूर्ती नवी ।
पुरुषप्रकृति वदति सत्कवी ॥
गणाधीशशारदादि नांवें दिधलीं तुजला भलीं ।
नांदसी एकाचि तूं एकली ॥
शिवशक्तिहि तूं मूळपुरुष तूं एकत्व न मोडितां ।
दाविसी दोनीं रूपें स्वता ॥
तुजपासुनि ही सृष्टि चराचर झाली जगदीश्वरी ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ३ ॥

४

जगदीश्वर जगदात्मा ईश्वर जगज्ज्योति तूं भली ।
प्रवाहरूपें सृष्टि चालली ॥
गुणक्षोभिणी गुणमाया तूं होसी त्रिगुणात्मिका ।
प्रसवसी हरिहरब्रह्मादिकां ॥
भूतभौतिक सृष्टी सारी उभविसि लीलालसें ।
अन्वयें रूप तुझें तें दिसे ॥
पिंडीं जीव ब्रह्मांडीं शिव दोनीं बाळें तुला ।
सारिखीं सकळलोकहेतुला ॥
त्रिगुण पंचभूतांचा कर्दम त्यांमध्यें राहुनी ।
असती अलिप्त सर्वांहुनी ॥
देहेंद्रियमनबुद्धिप्राणाहंकृतिपर ईश्वरी ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ४ ॥

५

सघन सच्चिदानंद परात्मा भवसागरपारदा ।
प्रज्ञानब्रह्म शारदा ॥
यापरि आळवित श्रुति उगली ठेली, मी तों किती ? ॥
करितों विनम्र शरणागति ॥
ज्ञानकला सर्वांतर्यामीं जाणुनि भजती तुला ।
ज्ञानी भक्त सत्यसे तुला ॥
आकाशीं तो शब्द स्फुरला प्रसिद्ध ओंकार हा ।

तेथुनी शब्दसृष्टि ही महा ॥
परादि वाचा प्रेरिसि तेणें लोकव्यापार हा ।
चालतो अखंड कैसा पहा ॥
परादिवाचापर निःशब्दीं राहसि सर्वेश्वरी ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ५ ॥

६

वाचातीत स्वयें राहुनी वाङ्मय करिसी उभें ।
नर हे तरती तेणें शुभे ! ॥
परब्रह्मपद पाववि तीतें विद्या म्हणती परा ।
भवार्णवीं जी तारक नरा ।
क्षराक्षरांसी अतीत निर्गुणपद देत्ये ती परा ।
ग्रंथ तो उगमीं घाली नरा ॥
आत्मज्ञानपरा सद्विद्या निर्विकल्पसुखकरी ।
पावसि मोक्षाते लौकरी ॥
दृश्यप्रपंच सत्यार्थानें दाविति जी कां दुजी ।
अपरा विद्या ती तों खुजी ॥
परापराविद्यांची मूलस्फूर्ती जगदीश्वरी ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ६ ॥

७

अपरा केवळ लौकिक विद्या परा अलौकिक खरी ।
वितरी अमृतसौख्य साजिरी ॥
अपरेमाजी सात्विक, राजस तामस दिसती परी ।
पूर्वपूर्वा श्रेयस्करी ॥
परतत्त्वस्पर्शानें सात्विक नेत्ये उगमाकडे ।
विलंबे मोक्षानिधी सांपडे ॥
राजस अपरा केवळ लोकव्यवहारीं वावरे ।
प्रपंच सारा दृष्टी भरे ॥
शोकमोह तो न उडे तेणें जन्ममृत्यु ना टळे ।
तामसें अधोगतीला मिळे ॥
गढूळ खालीं, मध्यम वरती, स्वच्छ मूळ निर्झरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ ॥ पाव० ॥ ७ ॥

८

ऋग्वेदादिश्रुतिस्मृतिहि त्या उपनिषदांसह भल्या ।
मार्गे भव्यजनां लाभल्या ॥

षट्शास्त्रें तसि दर्शनेंहि तीं सूक्ष्मदर्शी सज्जन ।
करिती त्यांचें मतिरंजन ॥
श्रीरामायणभागवतादि ग्रंथ उपासनपरा ।
गमति श्रुतिसम भाविक नरां ॥
कथापुराणें काव्यनाटकें भारत इतिहासही ।
यांहीं मोहिलि अखिला मही ॥
कालिदासभवभूत्यादिक कवि बाण जगन्नाथ ते ।
रसिका बोधामृत तर्पिते ॥
वाङ्मय सारें जगदाधारे ! स्फुरतें तव अंतरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ८ ॥

९

श्रीज्ञानेश्वर नाथ तुकोबा समर्थ मुक्तेश्वर ।
मयूर वामन आणि श्रीधर ॥
कबीर तुळशी सूरदास हे भूखन नरसी मिरा ।
घालिती कळिकाळाला चिरा ॥
नाना भाषा ग्रंथहि नाना शास्त्रें नानापरि ।
स्रवते सतत शब्द वैखरी ॥
ओंकाराच्या भुवनीं चक्की मनपवनाची फिरे ।
तेणें स्वरूपभानहि नुरे ॥
शब्दसृष्टिची टांकसाळ ही झडते रात्रंदिनीं ।
नाणीं अमित पडति त्यांतुनी ॥
शब्दब्रह्मीं खेळुनि राहसी निःशब्दाच्या घरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ९ ॥

१०

प्रपंच-परमार्था या जे जे विचार स्फुरती अये ।
निर्मळ ! सर्व तुझ्या आश्रयें ॥
प्राणिमात्र वश होय शारदे ! आम्हां तुझिया बळें ।
मनासि मन हें सहजीं मिळे ॥
भेदपिशाचें पळती, टळती विघ्नें, तम वोसरे ।
ज्योतिष्मति ! तूं ! असती खरें ॥
प्रसाद होता उचंबळे हें हृदय प्रेमामृतें ।
लोचनीं न धरत तें लोटतें ॥

प्रेमें प्रतिमाझरा पाझरे स्वात्मसुखीं मन निवे ।
निरंतर कृपा असों दे शिवे ! ॥
प्रेमप्रसादभिक्षा घाली माता विश्वंभरी ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥१०॥

११

संतसद्गुरुप्रसाद होतां रूप तुझें आकळे ।
शारदे ! शोक मोह तें गळे ॥
विश्वप्रपंच आटे दाटे ब्रह्म सघन केवळ ।
संपलें जड चंचळ निश्चळ ॥
रूपीं तुझिया अरूपरूपे ! थारा मिळतांक्षणीं ।
झाली जीवत्वा आटणी ॥
परब्रह्मभांडार खुलें हें झालें परमामृतीं ।
सुखाची लूट लागली हातीं ॥
देहस्मृति ही असो नसो तूं राहे मत्संगती ।
आहे अनन्य शरणागती ॥
माय शारदे ! पाय **लक्ष्मणें** दृढ धरिले अंतरीं ।
स्वरूपीं ठाव मला दे तरी ॥ पाव० ॥ ११ ॥



# २७ शारदेचें स्वरूप.



( श्रीगणपत्युत्सव महाराष्ट्रांत जसा अनेक वर्षांपासून सार्वजनिकरीत्या साजरा करण्यांत येतो, त्याप्रमाणें गोवें प्रांतांत श्रीसरस्वत्युत्सव मोठया थाटानें साजरा करण्यांत येत असतो. गोवेंप्रांतीं हा उत्सव ठिकठिकाणीं होतो. नवीन जागृतीचें केंद्र अशा मडगांवीं हा उत्सव तर ५०।६० वर्षे होत आहे, व थोडया नवीन वळणावरही ४।५ वर्षे होत आहे. यंदां ( १९२१ ) मडगांव येथील उत्सवासाठीं रा. पांगारकर यांस बोलावण्यांत आलें व आमंत्रण स्वीकारून ते तेथें गेले. पांगारकर शहापूरबेळगांवचीं १०।१२ माणसें बरोबर घेऊन मडगांवाकडे जाण्यास निघाले. वाटेनें दुधसागराचा रम्य प्रपात व वृक्षराजींची शोभा पहात सर्व मंडळी गोवें प्रांतांत शिरली व दसऱ्याचे दिवशीं सायंकाळीं ५ वाजतां मडगांवस्टेशनवर उतरली. तेथें स्वागतार्थ अनेक लोक जमले होते. गाड्यांची रांग गांवांतून चालली तशी वाटेंत जागोजाग दारू उडविण्यांत आली. सगळी मंडळी श्रीदामोदरभुवनाजवळ आली, तेव्हां पाहुण्यांच्या सत्कारार्थ चौघडा व वाद्यें झडूं लागलीं. रात्रीं त्यांनीं नुकत्याच रचलेल्या शारदास्तोत्रावर व्याख्यान केलें. त्याचा गोषवारा पुढें दिला आहे. )

त्यांनीं ' ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः'च ' ॐ सहनाववतु ' या श्रुतिवाक्यानीं मंगलाचरण केलें. श्रीसमर्थांच्या शब्दांनीं:—

ॐ नमोजी गणनायका । सर्वसिद्धिफळदायका ।
अज्ञानभ्रांतिछेदका । बोधरूपा ॥ १ ॥
आतां वंदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता ।
शब्दमूळ वाग्देवता । माहामाया ॥ २ ॥

" श्रीसरस्वतीची सेवा करण्यासाठीं आपण पुण्याहून मुद्दाम निमंत्रून मला येथें आणलें याबद्दल मी आपले आभार मानतों. व्यवहारासाठीं कोणीतरी अध्यक्ष नेमावा लागतो, पण या उत्सवाचाच काय पण अनंत ब्रह्मांडांचा कायमचा ' अध्यक्ष ' परमात्मा आहे त्याचें स्मरण करून मी हें पद स्वीकारतों. श्रुतिमाउलीनेंच ' यो अस्याध्यक्षः परमे व्योमन् ' या मंत्रांत त्याला अध्यक्ष म्हटलें आहे. ' मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ' याप्रमाणें देवांनींही अध्यक्षपद स्वीकारलें आहे. विष्णुसहस्रनामांत'लोकाध्यक्षः सुराध्यक्षः कर्माध्यक्षः' असें देवाला म्हटलें आहे. ज्याची सर्वांवर व सर्वांच्या सर्वकर्मांवर नित्य नजर असते तो परमात्माच खरा ' अध्यक्ष ' आहे. आपण माणसें आपल्या व्यवहारांत अनेक सोंगें आणतों पण आपले सारे व्यवहार भातुकलीच्या खेळांसारखे

असून त्या सर्वांवर परमात्म्याची अखंड दृष्टि आहे. तो 'साक्षी चेता केवलो निर्गुणश्च' असा आहे. अध्यक्ष, वक्ते व सभासद—आपला सर्वांचा अध्यक्ष तो आहे. त्याचें अनुसंधान ठेवून आपण लोकव्यवहारांतील आपापलीं कामें करूं. या श्रीसरस्वतीच्या महोत्सवप्रसंगीं तुम्ही आम्ही त्या विश्वमाउलीच्याच स्वरूपाचें चिंतन करूं. वेदमाता, ब्रह्मसुता, मूळमाया अशी श्रीशारदादेवी सकल चराचर सृष्टीची आदिजननी आहे. विश्वाचें मूलस्थान, मूळपुरुष ती. आपण तिला शारदा, सरस्वती, मूळमाया, ब्रह्मविद्या, परमात्मा, परमेश्वर अशीं नांवें देतों. ग्रीक तत्त्ववेत्ते तिला Logos या नांवानें आळवीत. खिस्ती धर्मग्रंथ बायबल यांत तिला Word म्हटलें आहे. जो तो आपल्या कल्पनेप्रमाणें तिला ओळखतो व नांवें देतो, पण ती अतिसूक्ष्म, निर्विकल्प, स्फूर्तिरूप आहे. ती शब्दातीत आहे, पण शब्दांची प्रेरकही तीच आहे. ब्रह्मनिष्ठ संत तिच्या स्वरूपीं समाधिसुख भोगतात. निर्गुण निराकार परब्रह्माच्या ठिकाणीं 'एकाकी न रमते एकोहं बहु स्याम्' अशी जी आदिस्फूर्ति झाली तेंच शारदेचें मूलस्वरूप आहे. ह्या मूलस्फूर्तीच्या ठायीं जाणीव व वायु अशीं अतिसूक्ष्म दोन रूपें झालीं. त्यांनाच पुरुषप्रकृति, शिवशक्ति, गणेशशारदा अशीं नांवें आहेत. एकत्व न फुटूं देतां हीं दोन रूपें झालीं. याचें सुंदर वर्णन श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या अमृतानुभवांत पहिल्याच प्रकरणांत केलेलें आहे.

ऐसीं इयें निरुपाधिकें । जगाचीं जियें जनकें ।
तियें वंदिलीं मियां मूळिकें । देवोदेवी ॥ १ ॥

मूळमायेपासून गुणमाया झाली. सत्व, रज व तम हे तीन गुण व या गुणांच्या देवता विष्णु, ब्रह्मदेव व रुद्र गुणमायेपासून झाले. पुढें आकाशादि पंच महाभूतें व त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृति आधीं सूक्ष्मांत व मग स्थूळांत आली व पिंड व ब्रह्मांडरचना झाली. ह्या सृष्टिरचनेचें बीज मूळमाया होय. हेंच शारदेचें शुद्ध स्वरूप होय. वस्तुतः 'अरे जें जालेंचि नाहीं, तयाची वार्ता पुससी काइ' ही खरी गोष्ट, पण सृष्टि झाली असें कल्पिल्यास ती कशी झाली याची कथा श्रुतिमाउलीनें याप्रमाणें सांगितली आहे. असो. परब्रह्माच्या ठिकाणीं 'मीं बहु व्हावें' अशी जी आदिस्फूर्ति झाली तें सरस्वतीचें शुद्ध स्वरूप होय. याहून येथें अधिक विस्तार करीत नाहीं. मूळमायेपासून भूतभौतिक सृष्टि झाली तरी अंतरात्म्याच्या स्वरूपानें ती अन्वयरूपानें सर्वव्यापी झाली आहे. जगदंबा ही या अर्थानें विश्वजननी व विश्वरूपिणी आहे व नाथांनीं म्हटल्याप्रमाणें 'चेतनारूपें इंद्रियवृत्ति । ते चाळिती सर्वदा' अशी ही शारदा प्राणिमात्रांच्या अंतर्यामीं अखंड वसत असून सर्व कार्याला तिची स्फूर्ति आहे. ती स्वतः स्फूर्तिरूप आहे. आकाशाच्या पोटीं ( शब्दगुणमाकाशम् ) शब्द निर्माण झाला, तो मूलध्वनि प्रणव होय. त्यापासून स्वरव्यंजनादि होऊन शब्दसृष्टि झाली. असो, परादि चार

वाचांची प्रेरक पण वाचातीत, शब्दसृष्टीची मूळनिर्झरी पण शब्दातीत, अशी श्रीमूळमायारूपी शारदा–तिला तन्मयतेनें आमचे अनंत प्रणिपात असोत.

बृहदारण्यांत ' वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म ' असें म्हटलें असून वाचेच्याच योगानें चार वेद, सहा शास्त्रें हीं आकळलीं जातात, इहलोक व परलोक यांचे सर्व व्यवहार वाणीच्या योगानें होतात, मनुष्यप्राणी वाणीच्या योगानें वश होतात, वाणीच्याच सामर्थ्यानें मनुष्य देव होऊन जातो असें सांगितलें आहे. शारदेचें इतकें मनोरम वर्णन अन्यत्र क्वचित्‌च आढळतें. मुंडकोपनिषदांत विद्या दोन प्रकारची असून चार वेद व सहा शास्त्रें यांना अपरा विद्या व ' यया तदक्षरमधिगम्यते ' म्हणजे जेणेंकरून अक्षरब्रह्माची प्राप्ति होते ती परा विद्या असे विद्येचे परा व अपरा असे दोन प्रकार सांगितले आहेत. सायुज्य मोक्ष देणारी ती परा विद्या व बाकीची अपरा विद्या. आचार्यांनीं प्रश्नोपनिषदावरील भाष्यांत ( ४ थ्या प्रश्नाच्या उपोद्घातांत ) ' अपराविद्यागोचरं संसारं व्याकृतविषयं साध्यसाधनलक्षणं अनित्यं ' आणि 'पराविद्यागम्यं असाध्यसाधनलक्षणं अप्राणमनोगोचरं अतींद्रिया विषयं शिवं शांतं अविकृतमक्षरं सत्यं पुरुषाख्यं ' याप्रमाणें परा व अपरा विद्यांचें स्वरूप स्पष्ट करून सांगितलें आहे. बहुतेक सारें वाङ्मय अपरा विद्येंत येतें. त्याचें आपल्याला आपल्या समजुतीसाठीं सात्विक, राजस व तामस असे भेद करितां येतील. सात्विक परा, राजस अपरा व तामस अपरा. पराविद्या 'याचि जन्मी येणेंचि काळें ' मुक्त करिते. बोध होताक्षणींच सायुज्यलाभ पराविद्येनें होतो. ज्या वाङ्मयाला परतत्त्वस्पर्श आहे, जें विलंबानें पण निश्चयानें मोक्षाकडे नेतें तें वाङ्मय सात्विक होय. लोकव्यवहार चालविणारें वाङ्मय राजस होय व अधोगतीला नेणारें तामस होय. विचारी मनुष्यानें कोणता ग्रंथ कोणत्या योग्यतेचा हें ठरवावें. उगमीं नेऊन घालणारा तो सद्ग्रंथ अशी उत्तम ग्रंथाची व्याख्या खुशाल करावी. चिदचिद्ग्रंथी सोडवील तो ग्रंथ, तो उत्तम म्हणजे पहिल्या वर्गांतला ग्रंथ. परा व अपरा विद्यांच्या वरील लक्षणांचेंच स्पष्टीकरण श्रीसमर्थांनीं दासबोधांत ५ व्या दशकांत केलें आहे. ' चौदा विद्या चौसष्ट कळा । याही वेगळ्या नानाकळा ' आहेत पण हें बहुधाज्ञान मोक्षदायक नव्हे. तात्काळ मोक्ष देणारें तें ज्ञान. ' पाहावें आपणासि आपण । या नांव ज्ञान. ' पराविद्या ' आपला आपणासि लाभ ' करून देते. ज्ञानेश्वर महाराजांनीं ज्ञानेश्वरींत अ० १३ मध्यें ज्ञानाज्ञानाचीं लक्षणें केलीं आहेत.

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।
तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥ ६१६ ॥
तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसा मनें । निश्चय केला ॥ ६१७ ॥

'आत्मा गोचर होय जेणें' तें ज्ञान. परा विद्येनें तात्काळ मोक्ष होतो म्हणून तिची बरोबरी अपरा विद्या करूं शकत नाहीं. तथापि सात्त्विक वाङ्मय हें अपरेंत येत असलें तरी तें मोक्षसाधक असल्यामुळें सुसेव्य आहे. राजस वाङ्मय लोकव्यापार चालविणारें आहे. सर्व आधिभौतिक शास्त्रें त्यांत येतात. इतिहास, राजकारण, अर्थशास्त्र हें प्रायः राजस वाङ्मय होय. लोकव्यापाराचें महत्त्व वाटतें तोंवर या वाङ्मयाचें महत्त्व वाटणार हें उघड आहे. तामस वाङ्मय सुतरां त्याज्य आहे, कारण ते खालीं खालीं नेतें. असो. मूळांत अभेद असून या भेदमयी सृष्टींत खालीं खालीं अधिक गढूळपणा वाढत जातो व वरवर अधिक निर्मळपणा दिसत असतो. मूळ उगमापाशीं गेल्यावर—'जिवा ऊगमीं जन्म नाहीं स्वभावें' याप्रमाणें स्वरूपप्राप्ति होते. उगम हा० मूळमाया–शारदा.

मूळ उगमापाशीं शोधल्यावरच 'विद्ययाऽमृतमश्नुते' (ईश) व 'विद्यया विन्दतेऽमृतम्' (केन) या उपनिषद्वाक्यांची यथार्थता कळते. उगमाला पोटीं बांधून जें वाङ्मय निर्माण होतें तेंच साऱ्या जगांत श्रेष्ठत्व पावतें. जीवांच्या उद्धारास तेंच कारण होतें. जेणें परमार्थ वाढे, जेणें अनुताप चढे, जेणें भक्तिसाधन आवडे, जेणें विषयवासना मोडे, जेणें धारिष्ट चढे, जेणें परोपकार घडे, 'या नांव ग्रंथ' अशी उत्कृष्ट ग्रंथांची समर्थांनीं व्याख्या केली आहे–'जेणें चुके अधोगती । या नांव ग्रंथ' (दास० द० ७ स० ९). अमुक ग्रंथ किंवा अमुक शास्त्र सात्त्विक किंवा राजस असें निःशेष म्हणतां येत नाहीं. ग्रंथाच्या धोरणावर, अंतःस्वरूपावर लक्ष्य देऊन तें ठरविलें पाहिजे. एखादा वेदांतावर किंवा तत्त्वज्ञानावर लिहिलेला ग्रंथही पांचट किंवा टाकाऊ असूं शकेल व एखादें नाटक किंवा कादंबरीही सात्त्विक असूं शकेल. अमेरिकन ग्रंथकर्त्री मिसेस बार्कले या बाईच्या ८ कादंबऱ्या वाचून माझ्या मनावर सात्त्विक धर्मशीलतेचे संस्कार झाले म्हणून त्या बाईच्या कादंबऱ्यांची मी सात्त्विक वाङ्मयांत गणना करितों. वाङ्मयाची शुद्धाशुद्धता त्याच्या बाह्यस्वरूपावर अवलंबून नाहीं. एखाद्या 'लावणी' नें परमार्थबुद्धि वाढेल, एखादा अभंगही नादान ठरेल! जी वाणी मूळस्फूर्तीला घेऊन उठेल ती प्रासादिक, सात्त्विक व श्रेष्ठ प्रतीची होय. स्फूर्तीशिवाय गाणें म्हणजे बरळणें होय. असो. वाणी मूळस्वरूपीं परमशुद्ध आहे, ज्या संगतीनें ती प्रगटते त्या संगदोषानें तिला उच्चत्व किंवा हीनत्व येतें. उदक मूळचें निर्मळ, पण तें उंसाच्या शेतांत गेलें म्हणजे गोड होतें, मिरचीच्या संगतींत तिखट लागतें, अमंगळ संगतीनें अशुद्ध होतें. हा दोष संगतीचा, उदकाचा नव्हे. त्याप्रमाणें वाणी मूळची, अंगची शुद्ध; पण सात्त्विक हृदयसंगतीनें प्रगटली म्हणजे तुकोबांच्या अभंगवाणीसारखी अमृतोपम वाटते; राजस मनुष्याच्या मुखानें प्रगटली तर राजस वाटते, व तामस मनुष्याच्या तोंडून लोटली तर दुःखदायक होते. ती जसजशी उगमाला जवळ, तसतशी शुद्ध व उगमापासून दूर तसतशी अशुद्ध होते!

शुद्धाशुद्धता संसर्गजन्य होय. हें जाणून वाणीच्या शुद्ध स्वरूपाकडे पाहावें म्हणजे ती परमपावन स्फूर्तिरूप आहे. ह्या शारदेच्या शुद्धस्वरूपाला वंदन असो.

"सत्पुरुषांच्या मुखानें प्रगटलेली वाणी स्वानंदसागरांतून उचंबळून येते. ती आनंदस्वरूप होय. 'आनंदाच्या डोहीं आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचें ' ह्या तुकोबारायांच्या उक्तीप्रमाणें तिचा उगम स्वानंदांतून, तिचा प्रवाह आनंदरूप, ती जगताच्या स्वानंदवृद्धीला कारण होते. तुळसीदास म्हणतातः--

भयउ हृदय आनंद उछाहू । उमगेऊ प्रेमप्रमोदप्रवाहू ॥
चली सुभग कविता सरितासी । राम विमलजसजलभरितासी ॥

माझ्या हृदयांत आनंदाचे व उत्साहाचे कल्लोळ उठले, प्रेम व प्रमोद यांचे प्रवाह उचंबळून वाहूं लागले. रामाच्या विमलयशोमृतानें भरलेली निर्मल कवितानदी माझ्या मुखांतून वाहूं लागली--तें हें माझें रामायण होय. श्रीज्ञानोबाराय म्हणतातः--

खेचराचियाही मना । आणूं सात्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ १३-११६० ॥

या माझ्या ज्ञानेश्वरीच्या श्रवणाबरोबर शुद्धचित्त पुरुषाला सुखसमाधि लागेलच, पण खेचर म्हणजे तामस प्रकृतीचे विषयी पुरुषही ही ऐकतांच तल्लीन होतील, त्यांच्या चित्ताला सत्वगुणाचा पान्हा फुटेल !

तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसी विश्व भरूं ।
आनंदाचा आवारू । मांडूं जगा ॥ ११६१ ॥
फिटो विवेकाची वाणी । हो कानामना जिणी ।
देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६२ ॥
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोधसुकाळा- । माजी विश्व ॥ ११६३ ॥

गीतार्थानें विश्व भरूं, आनंदाचें आवार मोठें करून त्यांत सगळें विश्व घेऊं, विवेकाची संपत्ति साऱ्या जगाला वांटूं, कानाला व मनाला धन्य धन्य म्हणायला लावूं. ही ब्रह्मविद्येची खाण उघडली आहे. हिच्यांतून वाटेल तितके स्वानंदधन लुटून वाटेल त्यानें धन्य व्हावें. सर्वांच्या डोळ्यांला परतत्त्व दिसेल, जग सुखाचा सोहळा भोगील, विश्व महाबोधसुकाळांत प्रविष्ट होईल.

तथास्तु ! श्रीशारदेचें गौरव याहून अधिक कोण करील ?

ह्या पृथ्वीवर अनेक भाषा, अनेक ग्रंथ व अनेक शास्त्रें निर्माण झालीं आहेत व होतील. हें सारें वाङ्मय होय. होमर, डॉंटी, शेक्सपीअर, शेख सादी इ. परदेशस्थ पंडितांचे ग्रंथ, अनेक धर्मांचे व पंथांचे अनेक ग्रंथ, ग्रंथांतरीं प्रगट झालेलें व न झालेलें ज्ञान, इ. सर्व सात्विक वाङ्मय होय. वाङ्मयाचें

मूळ, वाङ्मयाची प्रेरक शक्ति ही श्रीसरस्वतीची होय. तिच्या स्फूर्तीनें पवित्र हृदयांतून प्रगट होणारें वाङ्मय जगत्कल्याण करितें. आत्मशक्तीचा विकास करितें.

तद्दिव्यमव्ययं धाम सारस्वतमुपास्महे ।
यत्प्रसादात्प्रलीयन्ते मोहांधतमसश्छटाः ॥

याप्रमाणें अध्यक्ष रा. पांगारकर यांचें भाषण झाल्यावर त्यांनीं स्वरचित श्रीशारदास्तोत्र म्हणून दाखविलें.

---

# २८ सुधारकांनो ! सावध व्हा ! !

**अखंड सावधान रे । प्रसंग हा तुफान रे ॥**

—श्रीरामदास.

१. मालिनी पाणंदीकर या डॉ. भांडारकरांच्या नातीचा गुलाबखान नामक मुसलमान शिक्षकाशीं विवाह झाला ही गोष्ट आतां शिळी झाली. मालिनी खानाची बिबी झाली. झाली गोष्ट होऊन गेली, तिचा आतां गौरव आणि निषेध दोन्ही करण्यांत मतलब नाहीं. एक व्यक्ति हिंदुसमाजांतून कमी झाली यापेक्षां त्यांत महत्त्व नाहीं; पण ' म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं, —काळ सोकावतो ' याचें दुःख आहे. हा असा ओघ कां व कसा पडत चालला याच्या पूर्वकारणांची थोडी मीमांसा करणें धर्मतः प्राप्त झालें आहे.

२. केसरीनें ' व्यक्तिस्वातंत्र्य कीं समाजोन्नति ' ह्या मथळ्याखालीं एक विचार करण्यासारखा अग्रलेख लिहिला आहे. देशमुख, आगरकर, रानडे, भांडारकर यांच्या सुधारणेची दिशा लो. टिळकांना पसंत नव्हती व टिळक-परंपरेचे आजचे हिंदु-संघटनावादी हे सुधारकांहून निराळे आहेत असें त्यांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. शुद्धिसंघटनेच्या बुडाशीं धर्मभावना प्रधान आहे. संघटनेंत हिंदुधर्माच्या श्रेष्ठत्वाबद्दल निःसीम आदर व अभिमान आहे, टिळकांच्या चतुःसूत्रींत ( स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ) पांचवें सूत्र स्वधर्म ( म्ह० शुद्धिसंघटन ) हें घातल्यानें सांप्रतच्या चळवळींची पूर्णता होते, असें केसरीकारांचें मत आहे. ' अस्पृश्यतानिवारण व सहभोजन या गोष्टींच्या जोडीला हिंदुमुसलमानांचा मिश्रविवाह बसवणें ' त्यांना पसंत नाहीं. सुधारकांना आणि धर्माभिमानी म्हणविणाऱ्या शुद्धिसंघटनवाल्या

टिळकानुयायांना अस्पृश्यतानिवारण व सहभोजन पसंत आहे; मात्र स्वधर्मीयांच्या बाहेरचे मिश्रविवाह पसंत नाहींत. सनातन हिंदुधर्मीयांना अस्पृश्यतानिवारण व सहभोजन हींही मान्य नाहींत तथापि त्यांना शुद्धिसंघटनवाले आपले व जवळचे वाटतात, कां कीं हिंदु धर्माची आचारपध्दती जरी त्यांची सुटत असली तथापि धर्माचे तात्विक विचार तरी त्यांना मान्य आहेत. देशकालवर्तमानाकडे पाहून सर्व हिंदुसमाजाचें ऐक्य घडावें या हेतूनें हिंदुसमाजांत परस्पर बेटीरोटीव्यवहार होणें देशभक्तांना पसंत आहे, यामुळें हिंदूहिंदूंतल्या मिश्रविवाहांचा ते निषेध करीत नाहींत. सनातनधर्मीयांना हिंदु धर्मांतले विचार पाहिजेत व आचारही पाहिजेत. रानडे–भांडारकर स्कूलचे अनुयायी ज्ञानप्रकाशकर्ते, सुबोधपत्रिकाकर्ते, सर्व्हंटस् ऑफ इंडियाची मंडळी, खुद्द टिळकांचे तत्पक्षीय चिरंजीव, इत्यादिकांनीं ‘ विचारस्वातंत्र्या’च्या नांवावर मालिनी गुलाब-खानांच्या विवाहाचें अभिनंदन केलें आहे, व टिळकपक्षीयांनीं त्याचा तिरस्कार व निषेध केला आहे. तथापि हिंदूहिंदूंतल्या रोटीबेटीव्यवहाराबद्दल त्यांची संमति असल्यामुळें सनातनधर्मीयांना हे दोघेही सुधारकच वाटतात ! डॉ. मुंजे यांच्यासारखा मांसाहार उघड प्रतिपादन करणारा ब्राह्मण हिंदुसभेचा अध्यक्ष म्हणून खुशाल मिरवितो ! शुद्धिसंघटनवाल्यांचा मांसाहारावर कटाक्ष नाहीं तथापि त्याकडे कानाडोळा तरी करण्याची त्यांची तयारी दिसते ! तात्पर्य, हिंदुधर्माच्या आचारांविषयीं, संस्कारांविषयीं, रूढ चालीरीतींविषयीं सुधारकांचा उघड निषेध व तिरस्कार आहे, आणि शुद्धिसंघटनवाले समाजाचा कल पाहून चालढकल करण्यास व प्रसंगीं आदर किंवा अनादर करण्यास तयार आहेत. आज साठ वर्षें हिंदुसमाजाचें नेतृत्व या विद्यासंपन्न व धनमानसंपन्न अशा उभयपक्षी सुधारकांकडे आहे व म्हणूनच समाज आचारहीन होत होत गोष्टी या पल्ल्याला येत आहेत !

३ सोंवळेंओवळें, विटाळचांडाळ, स्नानसंध्यादि नित्यकर्में, श्राध्दपक्ष, पूजावैश्वदेवादि पंचमहायज्ञ, तीर्थयात्रा, देवधर्म–साधुसंत इत्यादि हिंदुधर्मांतल्या सर्व रूढ चालीरीतींविषयीं ‘सुधारक’ व ‘ शुद्धिसंघटनवाले ’ सारखेच उदासीन आहेत. जातिभेदनाशक गोष्टींत दोन्ही पक्षांचें ऐक्य आहे. उभयतांच्या हातीं समाज व विशेषतः नवीन पिढींतल्या तरुणतरुणी यांचें शिक्षण असल्यामुळें सारा समाज बहुशः धर्मशून्य झाला आहे. आचार व विचार हीं धर्माचीं दोन्हीं अंगें मजबूत असल्यावांचून धर्माची बळकटी नाहीं. नुसते विचार असून भागत नाहीं. आचारही पाहिजेत. किंबहुना बहुजनसमाजाचा धर्म आचारप्रधान असतो. ‘ आचारः प्रथमो धर्मः ’ हेंच खरें आहे. विचार किंवा तत्त्वज्ञानाचा भाग सर्व धर्मांत प्रायः सारखाच असतो किंवा त्यांत मतभेद असल्यास तो विचारवंतांत झटापटी करण्यापुरताच प्रबळ असतो. बहुजन-

समाजापर्यंत या गोष्टी प्रायः जातही नाहींत, व बहुजनसमाजाचा रूढ लोकांचारांतच धर्म असतो. हे लोकाचार खिळखिळे झाले, सुटले किंवा त्यांच्याविषयीं अनादर व हेटाळणी सुरू झाली कीं, बहुजनसमाज 'धर्म बुडाला असें म्हणतो.

४. सर्व पक्षीय पुढारी सनातनधर्मापासून बहुशा दूर गेले आहेत, धर्महीन झाले आहेत. सुशिक्षित समाज जवळजवळ सारा धर्मच्युत झाला आहे. 'यथा राजा तथा प्रजा.' राज्यकर्त्यांची धर्माविषयीं उदासीनता प्रजेंतही उतरली तर नवल नाहीं. राज्यकर्त्यांच्या चालीरीति, त्यांच्या क्रिया, त्यांचे विचार, त्यांच्या रूढ संस्था या सर्वांच्या नकला आमच्या राष्ट्रांत अहमहमिकेनें सुरू झाल्या. त्यांच्यापासूनच मद्यपानाचें, चहापानाचें व्यसन राष्ट्रांत घुसलें. चहाकॉफीचीं, फराळाचीं दुकानें; संमेलनांतील सहभोजनें; नाटकें, कादंबऱ्या व सिनेमाचे खेळ; प्रणयाचें माजत चाललेलें खूळ व तत्प्रतिपादक वर्तमानपत्रें, मासिकें व त्यांतील चटोरपणाच्या गोष्टी यांचा शाळा-कॉलेजांतील तरुणतरुणींच्या मनावर होणारा परिणाम; पुण्यासारख्या ठिकाणीं शाळा--कॉलेजांत मुलामुलींना मिळत असलेलें फाजील स्वातंत्र्य व एकत्र मिसळण्याचे प्रसंग, इ. अनेक गोष्टींचा परिपाक आधींच धर्मशून्य झालेला समाज विचारस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्याच्या गोंडस नांवाखालीं स्वेच्छाचारी बनविण्यांत झाला आहे !

५. दहापंधरा वर्षांपूर्वी आतांइतक्या मुली कॉलेजांत जात नव्हत्या. त्यांना माहेरीं आईबापांचा व १२।१३ वर्षांच्या वयापासून सासरचा मोठा हळुहळु लागत होता. आतां मुलींच्या लग्नाच्या वयाला माप राहिलें नाहीं. १८।२० २२।२५ व त्या पुढेंही मुली शिक्षणाच्या मिषानें अविवाहित व स्वतंत्र राहूं लागल्या. परधर्मीय शिक्षकशिक्षकिणींच्या हाताखालीं, त्यांच्या बोर्डिंगांत, त्यांच्या मताच्या छापेंत, राहिल्यामुळें हिंदुसंस्कृतीचे संस्कार त्यांच्या मनावर व्हावयाला मुळीं वावच राहिला नाहीं. धर्मशिक्षण आईबाप सुधारक असल्यास घरीं नाहीं व शिक्षणसंस्थांत तर नाहींच नाहीं. आजपर्यंत पुरुष धर्मच्युत झाले तरी बायका घरीं धर्माचें वळण कांहीं सांभाळीत असत. स्त्रीशिक्षणाच्या निमित्तानें स्त्रियाही धर्मशून्य बनत चालल्या तर धर्माचे व हिंदुसंस्कृतीचे संस्कार पार पुसून जातील. धर्म कांहीं त्यांनीं रक्षिला होता तो आतां त्यांनाही असलें शिक्षण मिळत गेल्यानें त्यांच्या वृत्ति मोकाट होऊं लागल्या. स्पर्शास्पर्श व धर्मसंस्कार शून्य झाल्यानें वाटेल त्या जातींतल्या व धर्मांतल्या वाटेल त्या तरुणांशीं विवाह करून संपत्तिसुखविलास भोगण्याची आतुरता वाढत चालली म्हणून गंगाजमनी विवाह होऊन ब्राह्मणाच्या मुली खुषीनें मुसलमानांच्याही घरांत जाऊं लागल्या ! कुळशीलाची भाषा संपली, विचारस्वातंत्र्य व संपत्तिभोगलालसा यावरच सारी भिस्त येऊन पडली !

## २ मडगांव.

दुसरे दिवशीं लोंढा, कॅसलरॉकवरून 'दुधसागर' ची शोभा पहात व घनदाट वनराजींचा प्रांत अवलोकीत आम्ही मडगांवला जाऊन पोचलों. स्टेशनवर २५ । ३० मंडळी मोटारी व गाडया घेऊन सत्कार करण्यास तयार होतीच. गोवें प्रांतांत अधिक लोकवस्तीचा, व्यापाराचा व चळवळीचा गांव हाच होय. पणजी ( पंजीम ) ही राजधानी असली तरी हिंदू संस्कृतीचे अधिक लोक मडगांवींच आहेत. गोवें प्रांतांत सारस्वत ब्राह्मणांची वस्ती पांढरपेशांत अधिक आहे. हे लोक सामान्यतः मत्स्याहारी आहेत तथापि त्यांतही थोडे लोक सोंवळे आहेत व दक्षिणी ब्राह्मणांचा सहवास वाढता झाल्यानें मत्स्याहाराची त्यांस खंतीही वाटते. सारस्वत ऊर्फ शेणवी हे ब्राह्मण असून षट्कर्मांचे अधिकारी आहेत. त्यांच्यांतही १३ प्रकार असून 'एकीबेकी'च्या परिषदा मागें भरून तो एकीचा प्रयत्न निर्फळ झाला आहे ! हे लोक प्रेमळ भाविक असून प्रायः वैश्यवृत्तीचे आहेत. त्यांच्यांत कांहीं कार्यकर्ते, साधु व कवि झाले आहेत. पेशवाईंत रामचंद्रबावा शेणवी व शिंद्यांचे दिवाण जिवबादादा बक्षी हे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. प्रसिद्ध योगी व सत्कवि सोहिरोबा आंबिये यांचे ग्रंथ व पदें वगैरे लोकमान्य आहेत. ' डोंगरी ' वर कृष्णंभट बांदकर हे थोर रामदासी नुकतेंच होऊन गेले व त्यांचे चिरंजीव ह. भ. प. मुकुंदराजबाबा हेही मोठे अधिकारी आहेत. माशेलचे ह. भ. प. दिगंबरदास उर्फ विठ्ठल कृष्ण कामत व त्यांचे वडील बंधू ' नामजपाचे ' पुरस्कर्ते रामचंद्र कृष्ण कामत या उभय सद्भक्त बंधूंचा परिचय मुमुक्षूच्या वाचकांस जुनाच आहे. सारस्वतांत कांहीं पट्टीचे विद्वान्ही होऊन गेले आहेत. पुर्तगाळ मठाचे अधिपति श्री. इंदिराकांतस्वामी यांची विद्वत्ता लोकविश्रुत आहे. मडगांवांत रा. गोविंद पै यांच्यासारखे प्रेमळ नामप्रेमीही पाहण्यांत आले. डॉ. सुब्राव नाईक ( सुब्रह्मण्यानंदतीर्थ स्वामी ) हे परोपकारी धर्मशील विद्वान् वैद्य २५ वर्षांमागें मडगांवास होऊन गेले. स्वामी विवेकानंद अमेरिकेला जाण्यापूर्वीं त्यांच्या भेटीसाठीं येथें येऊन त्यांच्या सहवासांत थोडे दिवस राहून गेले होते. असो. गोव्यांत पोर्तुगीज अंमल चारशें वर्षांपासूनचा असल्यामुळें जबरीनें बाटविलेल्या किरिस्ताव लोकांची बरीच वस्ती आहे. पण त्यांचें व हिंदूंचें बरेंच सख्य आहे. मडगांवीं आमचें राहणें आठ दिवस घडलें. रा. रामचंद्र केणी यांचे प्रशस्त वाडयांत व्यवस्था उत्तम राहिली. त्यांचे घरची व इतर ग्रामस्थ मंडळी फार अगत्यानें वागली. रोज रात्रीं प्रवचन होत असे. नवविधा भक्तीवर सातआठ प्रवचनें झालीं. बेळगांवची भजनी मंडळी तेथें आल्यामुळें दोन कीर्तनेंही झालीं.

## ३ देवस्थानें व सृष्टिसौंदर्य.

नंतर आम्ही गोवें प्रांतांतील देवस्थानें व सुंदर स्थळें दोन दिवसांत मोटारीनें पाहून आलों. बरोबर मंडळी होतीच. बहुतेक देवस्थानें मध्यवर्ती फोंडा महालांत आहेत. इकडील देवस्थानें फार रमणीय आहेत. रामनाथ, नागेश, महालक्ष्मी, कवळे येथील शांतादुर्गा, मंगेश, म्हारदोळ ( ह्माळसा, महालसा ), वेलिंग येथील श्रीलक्ष्मीनृसिंह अशीं आठ देवस्थानें पाहण्यांत आलीं. देवस्थानें फार रमणीय व प्रशस्त आहेत. प्रत्येक मंदिराच्या समोर प्रशस्त तलाव, दोनदोन वावेंत न मावणारे प्रशस्त स्तंभ, देवतेच्या मध्यगाभाऱ्यांत ३० ते ६० पर्यंत अहोरात्र जळणारे दीप, सभोंवारची अनुपम सृष्टिशोभा, घनदाट वृक्षवनराजींची अखंड छाया, नारळीपोफळींचीं व इतर कोंब्यवधि झाडें, पौषाच्या महिन्यांतही पाण्यानें भरलेलीं दुसऱ्या पिकाचीं भातखाचरें, मधूनमधून अनेक खाड्या व तऱ्या व त्यांतून चालणाऱ्या बोटी ह्या सर्व मनोरम दृश्यांनीं मन मोहून शांतिसुखाच्या लहरींवर लहरी येऊन काळ अत्यानंदांत गेला. गोव्यासारखी सृष्टिशोभा अन्यत्र पाहण्यास क्वचितच मिळेल. पुढील प्रवासांत कारवार, गोकर्ण वगैरेकडेही मोठमोठालीं जंगलें व दाट झाडी पाहिली, पण गोव्यांतील दाट वृक्षराजींवरील अखंड टवटवी कांहीं अनुपम आहे. मुक्तेश्वर कवीनें आपल्या भारतांत वर्णिलेली सृष्टिशोभा गोव्यांत मूर्तिमंत दिसते. कदाचित् मुक्तेश्वर गोवेप्रांत पाहूनही गेले असतील. इकडे पावसाची सरासरी १२५ इंच आहे. यावेळीं उष्माही नाहीं व थंडीही नाहीं अशी हवा फार सुखदायक आहे. देवस्थानांच्या टांपून ' पावला पावला उदकें ' व ' निर्झरोदकाचे सैरावैरा धांवणारे ' पाट पाहून जें समाधान वाटलें तें आमच्या इकडील महाराष्ट्रीयांनीं अवश्य जाऊन अनुभवावें. एका पूर्वरात्रीं आम्हीं मोठ्या खाडींतून बोटीबोटीनें जात होतों. खाडीच्या दोहीं बाजूंस दाट वृक्षांच्या नुमत्या रांगांवर रांगा लागून आसपासचे डोंगर वृक्षाच्छादित दिसत होते. कांठच्या वृक्षांच्या व लहानसहान टेकडयांच्या छाया खाडींत लांबवर पडल्या होत्या. मंद चंद्रप्रकाशानें खाडीवरच्या लाटा एकमेकांच्या अंगावर रेळत रेळत पुढें सरकत चाललेल्या दिसत होत्या. त्यावेळची आनंदोल्हासाची समाधानी कांहीं अपूर्व होती. आमचे अर्वाचीन कवि इकडे कांहीं काळ राहून व सृष्टिशोभा पाहून जातील तर त्यांच्या वर्णनाला साक्षात्काराचें तेज चढल्यावांचून राहणार नाहीं. गोवेंप्रांतभर जंगलांतून व वृक्षराजींतून इतस्ततः विखुरलेलीं अनेक खेडीं आहेत. त्यांतही कित्येक घरें अशीं मजबूत,सुंदर व प्रशस्त बांधलेलीं आढळलीं कीं तशीं आमच्याकडे शहरांतूनही क्वचितच सांपडतील. मात्र हीं घरें जितकीं स्वच्छ तितकींच त्यांतून राहणारीं माणसें स्वच्छ राहणीचीं असतीं तर बरें होतें असें वाटल्या-

वांचून राहिलें नाहीं. काशावली येथें अशाच एका घरीं आम्ही एक रात्र काढली. मात्र त्या घरांतील राहणीही स्वच्छ होती व घरधनीण एक वृद्ध बाई असून तिचा दासबोधाचा जन्माभ्यास पाहून फार समाधान झालें. आमच्या इकडे समर्थांच्या नांवाचा फुकट जयजयकार करणाऱ्या शेंकडों लोकांत त्या बाईइतके दासबोध जाणणारे लोक थोडेच सांपडतील ! मंगेश येथें आमच्या मोटारी तिनीसांजा पोंचल्या. तो दिवस अनायासें सोमवारचा होता व रात्रीं पालखीची मिरवणूक होती. लोकांच्या आग्रहावरून आम्हीं रात्रीं तेथें राहिलों. मंगेशासमोर प्रवचनाची थोडी सेवाही करावी लागली. देवस्थानें पाहून आम्हीं पुढें पणजीकडे गेलों. वाटेंत पोर्तुगीज अंमलाच्या प्रारंभीं बांधलेलीं जुन्या गोव्यांतील भव्य चर्चेंही पाहिलीं. पणजी शहर छोटेंच पण सुंदर टुमदार आहे. तेथून मोठ्या बोटींतून मार्मागोवा बंदरावर जावें लागतें. मार्मागोवा हें बंदर पाहण्यासारखें आहे. तेथून अथांग महासागरच पुढें पसरलेला आहे. तेथें धक्का फारच मोठा आहे. तेथून वास्कोदिगामा वगैरे स्टेशनसवरून रेल्वेनें मडगांवला आलों व तेथें एक दिवस विश्रांति घेऊन कारवारमार्गें गोकर्णाची वाट धरिली.

## ४ आमचे सोबती.

आमच्या या एकंदर यात्राप्रवासांत तिघांनीं आमची शेवटपर्यंत पाठ सोडली नाहीं. तिघेही व्यापारीपेशाचे, आपला धंदा सोडून संगतीच्या सुखासाठींच बरोबर आलेले. त्यांच्या संगतीमुळें आमचा प्रवास सुखकर झाला. एक शहापूरचे महादेवआप्पा कुदळे. हे बेळगांवापासून परत येईपर्यंत आह्मांबरोबर होते. हे श्री नारायणमहाराज केडगांवकरांच्या संगतींत भक्तिप्रेमानें भिजलेले, भजनी, नामप्रेमी व प्रेमळ गुरुभक्त आहेत. हे मोठे आनंदी, विनोदी व अत्यंत कळकळीचे सज्जन आहेत. दुसरे सावडर्याचे विठ्ठल कृष्ण गुडे. हे स्वतः चांगले वाचक, पाठांतर बहुत असलेले, बहुश्रुत असून उत्तम श्रोते आहेत. अखंड बोलण्याची स्फूर्ति देणारे हे आमचे विठोबा ! यांना श्रवणसुखाची गोडी फार. यांना मस्तकाच्या, पाठीच्या वगैरे शिरांची व चंपीची माहिती उत्तम असून बोलण्याचालण्याचे श्रम तात्काळ परिहार करण्याची यांची कला वर्णनीय आहे. घरचे सुखवस्तु असून केवळ प्रेमामुळें यांनीं वारंवार आमचे श्रमपरिहार फार केले आहेत. तिसरे सोबती दत्तात्रय पांडुरंग दलाल. हे मडगांवचे राहणारे असून तेथील सार्वजनिक चळवळींचे पुरस्कर्ते व नमुनेदार स्वयंसेवक आहेत. गाड्या मोटारी ठरविणें, बाजारहाट, बायकापोरांची सौम्यशब्दानीं मनधरणी करून गोडीनें प्रवासाची एकंदर व्यवस्था पाहणें हें सर्व काम अत्यंत निरलसपणें, निःस्वार्थपणें, स्वतःच्या पदराला खार लावून घेऊन निरहंकारपणानें करणें हे यांच्या अंगचे गुण खरोखर इतके बहुमोल आहेत कीं, मोठमोठ्या शहरांतूनही

असले गुणी स्वयंसेवक फार विरळ सांपडतील. हे सहकुटुंब सहपरिवार आमच्या बरोबर होते. उत्तम कार्याची सेवा कशी करावी हें त्यांच्यापासून शिकण्यासारखें आहे. यांची साध्वी स्त्री मनमोकळी, प्रेमळ व चतुर असून हें दांपत्य सुखी आहे. महादेव आप्पांचें प्रेमळ भजन व गोड गायन यांनीं साऱ्या प्रवासभर सर्वांचा उल्हास वाढता ठेवला. त्यांच्या तोंडून वारंवार ऐकलेलीं दोन पदें खालीं देतों.

## पद पहिलें.

शिकला बातबेत सारा । जुपला बैल संसारा ॥ ध्रु० ॥
सवड गुलामा नसे सलामा । सदोदीत जू खांदीं ।
हरिभजनाच्या वांटणीस ती । न ये घडी एखादी ॥ १ ॥
करि नित्याचा सणवाराचा । खर्च बाताबेतानें ।
झाडाझडती तेल मिठाची । पीठ मोजि हातानें ॥ २ ॥
पुण्यतिथीला घे पंक्तीला । व्याही आप्त जांवाई ।
अतिथी द्वारामधें पाहतां । चढे मस्तकीं वाई ॥ ३ ॥
शिरिं बेताची पगडी गाडी । घोडी माडी खिडकी ।
दे धर्माला खोटा पैसा । घोटि सुपारी किडकी ॥ ४ ॥
चिरेबंदी उंच हवेली । बांधीं बळकट पाया ।
रोकडवाढी दिली वाढवी । आपण आला आटपाया ॥ ५ ॥
स्नानसंध्या जपतीर्थाटन । पुराण कीर्तन वर्जी ।
धर्म वाढिना कदा मोडिना । बापकोचि मर्जी ॥ ६ ॥
जों जों थकला पिकला सुकला । तों तों संग्रह केला ।
विष्णुदास म्हणे अखेर एकला । रडत नागवा गेला ॥ ७ ॥

## पद दुसरें.

दुसरें पद श्रीकृष्णकथापर आहे. 'गोपाळकृष्ण राधाकृष्ण' हें भजन प्रथम सर्वांनीं करावयाचें असून पुढें दरवेळीं श्रोत्यांनीं 'राधाकृष्ण' म्हणायचें.

गोपाळ कृष्ण राधाकृष्ण ॥ ध्रु० ॥

कृष्णाप्रती गोपाळ । बोलती सकळ । अकळती नकळ ।
आतां ता ता ता । ता । गो० रा० ॥ १ ॥
कान्होबाची संगती । ब्रह्मादिक इच्छिती । धन्य आम्हां म्हणती ।
हा हा हा हा हा । हा । गो० रा० ॥ २ ॥
अजगर मारीला । वणवा गिळिला । गोवर्धन उचलीला ।
अ ब ब ब ब । ब । गो० रा० ॥ ३ ॥

केशीयाशी मारिलें । शकटासी चूर्ण केलें । दोन्ही वृक्ष उन्मळीले ।
अ रे रे रे रे । रे । गो० रा० ॥ ४ ॥
मामा मारूं गेलासी । आपटीले गजासी । मल्लयुद्ध खेळलासी ।
हु तूं तूं तूं तूं । तूं । गो० रा० ॥ ५ ॥
यमुनाडोहीं पोहतां । काळियासर्प तेथें होता । नाचलासी त्याचे माथा ।
थै थै थै थै थै । थै ॥ गो० रा० ॥ ६ ॥
सोळा सहस्र गोपींसीं । कृष्णनाथा भोगीसी । ब्रह्मचारी म्हणवीसी ।
अ रे रे रे रे । रे ॥ गो० रा० ॥ ७ ॥
ऐसे तुझे पवाडे । ब्रह्मादिक झाले वेडे । विष्णुदास नामा म्हणे ।
अय्यो यो यो यो । यो ॥ गो० रा० ॥ ८ ॥

## ५ गोकर्णमहाबळेश्वरच्या वाटेंत.

मडगांवहून काणकोणमार्गें पर्तगोळपर्यंत मोटारी ठरवून आम्हीं निघालों तों तिनीसांजा पर्तगोळपासून ३ मैलांवर अलीकडे आलों. नदी लागली. उतरण मोठी. मोटारीवाले आंखडले! खडकाळ उतरण ओलांडून पुढें जाण्याचें त्यांनीं साफ नाकारलें. बायकांमुलांसुद्धां १५।२० माणसें आम्हीं, १५।२० लहान मोठे बोजे! तासभर घोळ पडून हमालांच्या डोक्यांवरून बोजे व एक मनुष्य पुढें मठांत पाठविलें व आम्ही सर्व भजन करीत वाट चालूं लागलों. पाऊण मैल गेल्यावर नदी दुसऱ्यांदा आडवी आली गोटे फार, अंधार पडूं लागलेला, बायका चालेनात, मुलांनीं भुकेमुळें डोक्यावर घेतलें. एक बाई गरोदर, एक पायांनीं थोडी अधू, खालीं बसल्या त्या हलेनात. पाऊण मैलाची चढण पुढें, सभोंवार सर्वत्र भयाण जंगल! अंधार पडलेला. कठिण प्रसंग असें सर्वांस वाटलें. पण सर्व मजेंत होतों. शेवटीं आमच्या विठोबांनीं कोठूनशी एक रेड्याची गाडी धुंडून आणली. त्यांत त्या बाया व चार मुलें बसविलीं व मागें नामघोष करीत आम्ही सर्वजण वाट चालूं लागलों. जंगलचा मार्ग आणि खडबडीत रस्ता. साडेनवाला मठांत पोचलों. लगेच पिठलेंभात करून जेवलों व ११ वाजतां मठाधिपति श्रीइंदिराकांत स्वामींच्या दर्शनास गेलों. स्वामी विद्वान् आहेत हें ऐकून संवादसुख मिळेलसें वाटलें होतें. पण स्वामी माध्वसांप्रदायी असून द्वैतमताचा त्यांचा विलक्षण आग्रह व अद्वैताबद्दल करडी नजर व पूर्ण असहिष्णुता पहिल्या तीन वाक्यांतच प्रगट झाली! मंडळींनीं स्वामींस ओळख करून दिली. आम्ही शांकरमतानुयायी व महाराष्ट्रीय साधुसंतांचे भक्त आमची वादप्रवृत्ति नसल्यानें आम्हीं मौनच धरिलें. द्वैत व अद्वैत या अखेरच्या गोष्टी सोडून उभयतांना प्रिय अशा उपासनेच्या गोष्टीच प्रेमानें बोलूं असें आम्हीं सुचविलें, पण ' अद्वैताचें विष '—

नको तो विषयच सोडून देऊं:—' अद्वैतामृतवर्षिणी ' याबद्दल त्यांचा पाठ ' सद्वैतामृतवर्षिणी. ' हे माध्व प्रायः असहिष्णु फार दिसतात. श्रीशंकराचार्यांना व अद्वैत सिद्धांतांना ऐकायला कटु अशीं विशेषणें ते लावतात. असो. दुसरे दिवशीं भोजनोत्तर दुपारीं आम्ही बैलगाडया करून स्वामींचें दर्शन घेऊन निघालों तों पुन्हा काणकोणवरून सायंकाळीं ' तर्पण ' बंदरावर आलों व तेथील ' सरकारी बंगल्यांत ' मुक्काम केला. शेजारच्या खाणावळीण बाईच्या घरीं आमचा आम्ही स्वयंपाक करून जेवलों व पांच सहा माणसेंच गर्दीनें झोंपतील अशा त्या बंगल्यांत १५।२० माणसें व १५।२० बोजे कसे तरी सामावून 'कलकत्त्याच्या ब्लॅक होल'ची आठवण करीत मजेनें रात्र काढली. प्रातःकाळीं प्रातर्विधी सर्वांचा उरकून बोटींतून खाडी ओलांडून पलीकडे गेलों. बैलगाडया तीन केल्या. तीन मैल गेल्यावर पुनः खाडी आली. बैलगाड्या बैलसामानासह होडीवर घालून पलीकडे नेल्या. तो देखावा पाहून नवल वाटलें! उत्तरेकडील खाडींत आमच्या दोन्ही मोटारी आम्हांसह बोटींवर घालून नेण्यांत आल्या! दोन बोटींवर मोठा लांकडी प्लॅटफार्म घालून त्यावर गाडया, मोटारी व माणसें चढवून बोटी खाडींतून वल्हवींत नेतांना पाहून घाटावरील माणसांना अत्यंत आश्चर्य व मौजही वाटेल! आंकोला येथील लक्ष्मीनारायणाचें मंदिर पाहून दुपारीं तीन वाजतां सदाशिवगड येथें आलों. तेथें ओळख काढून एका प्रशस्त घरांत सामान लावून दिलें. सर्वांनीं स्नानें केलीं, भोजन उरकलें व पुढें कारवार येथें जाण्याचें ठरविलें. सदाशिवगडपासून कारवारची खाडी फार मोठी असून गेल्या तीन दिवस वादळामुळें बोटींचा व्यवहार बंद पडला होता. तथापि आम्ही बंदरावर गेलों तों वारा अनुकूल लागल्यामुळें मौजेनें समुद्राची हवा खात कारवारचे बंदरावर रात्रीं ८ ला पोंचलों व धमन्या करून कारवारला रात्रीं ९ वाजतां पोंचलों. वाटेच्या दगदगीमुळें मंडळी जातांच झोंपली. कारवारास मुक्काम रा. हळदीपूर या सुखवस्तु गृहस्थाचे घरीं झाला. दुसरेच दिवशीं मोटारी करून दुपारीं २ वाजतां गोकर्णमहाबळेश्वर येथें जाऊन पोंहचलों. कारवार येथें श्रीतुकारामभक्त शिवराव कैकिणी, हायकोर्ट वकील, यांची भेट होऊन एक तास मोठया आनंदांत गेला. कारवारच्या मंडळींचा तेथें व्याख्यानासाठीं राहण्याचा फार आग्रह होता. पण एकादशीच्या दिवशीं गोकर्णास जाऊन समुद्रस्नान करून श्रीशिवदर्शन घेण्याचा आमचा संकल्प असल्यामुळें आम्हीं राहिलों नाहीं. मार्मागोवाहून ८ तासांत थोरल्या बोटीनें आम्हांस गोकर्णास येतां आलें असतें; पण गोवेप्रांत व कारवार जिल्हा ह्यांत फिरून गांवें, खाडया, बोटी यांचा अनुभव आम्हास घ्यावयाचा असल्यामुळें आम्ही हा मार्ग मुद्दाम पत्करला. आमचा हा प्रवासही फार आनंदाचा झाला. वाटेंत शाहळीं, केळीं व फराळाचें जिन्नस यावर सर्वांनीं यथेच्छ ताव मारावा,

गोष्टी, वार्ता, हास्यविनोद करीत मार्ग क्रमावा, मधून मधून माहादेवआप्पांनीं सर्वांस भजन करायला लावावें, मग सर्वांनीं मुक्त कंठानें गावें, बागडावें, नाचावें असा क्रम वाटभर होता. सुटया पुरुषांच्या प्रवासाची मौज वेगळी, बायकामुलांसुद्धां प्रवास करण्याची मौज वेगळी. कमीजास्त खाणें, अकालीं भोजन व निद्रा, सर्व नित्याचे निर्बंध सुटले, तरी चित्ताच्या उल्हासामुळें कांहीं एक बाधत नाहीं व सर्वांच्या प्रकृति सुधारतात असा सर्वांचाच अनुभव आहे.

## ६ गोकर्णमहाबळेश्वर.

गोकर्णास दोन दिवस राहण्याचा बेत असून सर्वांचें चित्त रमल्यामुळें पांच सहा दिवस आम्ही आनंदांत राहिलों. सुब्बाभटजी बीन शेषंभटजी मुळे हे महाबळेश्वरचे मुख्य पुजारी असोन त्यांचे घरीं आम्ही उतरलों व त्यांच्या घरच्या स्त्रीपुरुषांनीं सर्वांनीं आमची व्यवस्था उत्तम ठेवली. श्रीगोकर्णमंदिराच्या पाठिमागेंच यांचें प्रशस्त घर असून त्या घराचे मागें समुद्र असें असल्यामुळें मोठें सोयीचें झालें. श्रीशंकरास गोकर्ण हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं पृथ्वीनें गाईचें रूप धरिलें तेव्हां अंगुष्ठरूपानें तिच्या कर्णांतून शंकर बाहेर पडले. शंकराची पिंडीही येथें अंगुष्ठरूप असून आंत आहे. हें क्षेत्र अतिप्राचीन आहे. गोकर्णाला रुद्रयोनी किंवा वरुणावर्त असेंही म्हणतात. रामरावणाच्या वेळीं ह्या शिवस्वरूप आत्मलिंगाची स्थापना झाली. महाबलदाता म्हणून महाबलेश. महाबलेश गोकर्ण हें मुख्य स्थान आहे तरी याचे आसपास लहान मोठीं अनेक पुण्यस्थानें आहेत. पाठीशीं गणेशमूर्ति असलेलें गणपतीचें मंदिर आहे. आधीं गणेशपूजन व मग गोकर्णपूजन असा येथें प्रघात आहे. गोकर्णापासून नजीक शतशृंग पर्वत आहे. त्याचे शिखरावर चढून पाहिलें असतां समुद्राचा विशाल व भव्य देखावा फार सुंदर दिसतो. या पर्वतावर लहान मोठीं अनेक तीर्थें आहेत. त्यांत रामतीर्थ फार रमणीय आहे. त्यासमोर एक साधु सांप्रत मोठें कुंड बांधीत आहेत, त्यांत पर्वताचे मध्यांतून वाहणारे निर्मळ उदकाचे दोन अखंड वाहणारे झरे घेतले आहेत. शतशृंगपर्वत फार मोठा आहे व त्यावर बरींच तीर्थें आहेत. कोटितीर्थ गांवाचे मध्यभागीं असून त्यांत स्नान करण्याचा विधि आहे. कोटितीर्थ हा बराच विस्तृत तलाव असून त्यांत स्नान करण्याचें थोर पुण्य सांगितलें आहे. ह्या तीर्थाचें स्नान व समुद्राचें स्नान अशीं स्नानें, गणेशाची पूजा व महाबलेशाची महापूजा हा येथील मुख्य विधि प्रायः सर्व यात्रेकरू करितात. आम्ही अष्टादश धान्यांची महापूजा बांधली व देवापुढें दीपोत्सव केला. आम्हांस ह्यास अडीच तास लागले. महाशिवरात्रीस येथें ४०।५० हजार यात्रा भरते. ते वेळीं दर्शन होणेंही मुष्किलीचें होतें, पण आम्ही गेलों ते वेळीं निवांतपणें श्रीगोकर्ण

महाबळेश्वराची महापूजा स्वहस्तें गीतवाद्यादिकांसमवेत आम्हां सर्वत्रांस करितां आली व यात्रा यथासांग पार पडली याबद्दल मनःपूर्वक संतोष झाला. पुजारी-बोवांनीं उत्तम साह्य केलें, कोणत्याही प्रकारें तसदी दिली नाहीं, इतकेंच काय पण आम्ही संतोषानें दिलें तें आनंदानें घेऊन संतोष दिला, व म्हणून मुळे भटजीस क्षेत्रोपाध्येपण लिहून देण्यांत आम्हांस पुढें आनंद वाटला. ते दिवशीं सोमवार शिवरात्र होती ( मार्गशीर्ष कृष्ण १४ ). समुद्रस्नाची, सायंकाळीं वाळवंटांत लोळण्याची, मुलाबाळांना यथेच्छ बागडण्याची, महादेव अप्पांना मनमुराद गाण्याची, सर्वांना सर्व प्रकारची पूर्ण मोकळीक असल्यानें खूपच आनंदांत हे दिवस गेले. ' ॐ नमःशिवाय. ' गोकर्णास प्रवचनाची हजेरी दिली. ब्राह्मणांचा घरीं वेदघोष करून यथाशक्त्या अन्नसंतर्पण झालें.

## ७ हुबळी.

पौष शुद्ध १ स आह्मी १० वाजतां स्नानभोजनदर्शनादिक उरकून मोटारीनें गोकर्णाहून निघालों तों सायंकाळीं ६ वाजतां हुबळीस येऊन पोहोचलों. हुबळीस श्रीकृष्णभक्त सुब्राव गोपाळ उभयकर यांचे घरीं उतरलों. हे व यांचे कर्ते पुतणे गोपाळराव व पद्मनाभराव यांनीं आणखी एक दिवस ठेवून घेतलें. हुबळीस दोन दिवस फार सुखांत गेले. सुब्रावबावा हे श्रीरमावल्लभदास सांप्रदायाचे असून त्यांनीं सद्भक्त ' आवडी ' यांची भजनपरंपरा चालविली आहे. चुलते पुतणे खरे सत्वस्थ व प्रेमळ आहेत. सुब्रावबावांची कृष्णभक्ति अपार आहे. प्रेमळ भक्त ह्मणून एक रात्र यांचे संगतींत काढल्यास कोणासही भक्तिसुखाची माधुरी कळणार आहे. घरांत भक्तीचें गोड वातावरण यांनीं उत्पन्न केलें आहे. रमावल्लभदास यांची गीतेवरील ' चमत्कार टीका ' 'श्रीकृष्ण जयन्तीव्रतकथा ' इ० ग्रंथ यांनीं आस्थेनें मिळवून छापविले आहेत. यांच्या संगतींत भक्तिसुखाची लूट मिळाली. यांच्या घरचीं मुलेंबाळें व स्त्रीमंडळी यांनीं भजनांत रंगविली आहेत. यांच्या घरच्या लहान गोजिऱ्या मुलीच्या तोंडून पुढील नाथाचें पद हावभावसहित अनेकवार ऐकून सर्वांसच फार आनंद झाला.

### पद.

सिंगाचें सिंगुलें । खांद्यावरी आंगुलें ।
नाचत तान्हुलें । यशोदेचें ग बाई । यशोदेचें ॥ १ ॥
येती गवळणी । करिती बुजावणी ।
लागति चरणीं । गोविंदाच्या ग बाई । गोविंदाच्या ॥ २ ॥
कडदोरि बिंदुली । वाघनखें साजिरी ।
नाचत श्रीहरी । यशोदेचा ग बाई । यशोदेचा ॥ ३ ॥

गोपीका भोळिया । वाजविति टाळिया ।
आमुचा कान्हया । देवराव बाई । देवराव ॥ ४ ॥
एका जनार्दनीं एकत्र शरण ।
भावें निंबलोण । उतरती बाई । उतरती ॥ २ ॥

सुब्रावबावांनी प्रेमभरांत कित्येक कवनें रचलीं आहेत. त्यांतील एक 'श्रीकृष्णरूपावरचे' व एक 'संतगौरवा'चें अशीं दोन मुलांकडून (व स्वतः) गायिलेलीं देतों-

## १ श्रीकृष्णपर पद.

चालः—आजि सगुणस्वरूप म्यां पाहिलें ।
किति सुंदर अहाहा कृष्ण रूपडें ॥ ध्रु० ॥
रूप हें कृष्ण रूपडें । निरखितां जीवु आनंदीं बुडे ॥ १ ॥
पूर्णब्रह्म हें सगुणरूपातें । धरुनि झालें नंदनंदन ॥ २ ॥
सर्व सुखाचें ओतिव साचें । त्रिभुवनसुंदर आनन ॥ ३ ॥
देहुडाचरणु ॐ आकृति तनु । विटेवरि उभा मनमोहनु ॥ ५ ॥
दासाचें ब्रीद कृष्णभक्ति । परमपावन सौंदर्यभूषणु ॥ ६ ॥

## २ संतस्तवनपर ( राग—सोहनी )

पहा पहा वैष्णववीर । परमपावन हरिकीर्तनरंगीं ।
रंगुनि येति समोर ॥ ध्रु० ॥
टाळ वीणा मृदंग घेउनि । धुमकिट धिक्किट धिलांग म्हणुनी ।
थै थै थै थै प्रेमें नाचुनि । डुलत येति समोर ॥ पहा० ॥ १ ॥
हरिनामाचा झेंडा झोलत । नवविधभक्तीडंका वाजत ।
भक्तां प्रेमसुधारस पाजित । करिती जयजयकार ॥ पहा० ॥ २ ॥
कुजनीं करितां छळ अतिनिंदा । न सोडिती जगजनहितधंदा ।
शास्त्राचरणीं गोवुनि मंदा । करिती दीनोद्धार ॥ पहा० ॥ ३ ॥
विषयी लोकां भाविक करुनी । आधीं सगुणी गोडी लावुनि ।
शेवीं स्वात्मानंदीं बुडवुनि । ज्ञानी करिती उदार ॥ पहा० ॥ ४ ॥
दासा पदरजें पावन करिती । वासुदेवकवचें आच्छादिती ।
कृष्णभक्ति दिवटा करिं देती । निरसिति जगदंधार ॥ ५ ॥

सुब्रावबावांना अलीकडे दिसणें व ऐकूं येणें कमी झालें आहे. तरी चंद्रदर्शनानें समुद्राला भरती येते तशी श्रीकृष्णस्मरणाबरोबर त्यांच्या भक्तिसुखसमुद्राला भरती येऊन त्यांचें शरीर अष्टभावांनीं भरून नेत्र प्रेमाश्रूंनीं झरझर वाहत असतात. त्यांची अशी कोमल मधुर भक्ति आहे. आमच्या मोटारी त्यांच्या दारापुढें उभ्या राहिल्या व त्यांना कळलें मात्र तों 'या हो या हो...' म्हणून तटकन उभे राहिले व जवळ येतांच त्यांनीं प्रेमपाशांनीं घट्ट आवळून

वरील पदांनीं सत्कार केला. सत्कार कसला—महाबोध केला. जागृतीची संजीवनी पाजिली. जडदेहांत चैतन्य ओतलें ! उभयतांच्या व इतरांच्याही नेत्रांतून प्रेमाश्रुधारा चालल्या. दुनियेंत सर्व भेटेल, पण भक्ताची भेट दुर्लभ आहे ! सुब्रावबावा परम प्रेमळ भक्त आहेत. ह्या खेपेच्या ह्या प्रथमभेटीच्या पहिल्या क्षणाला बावांनीं जी स्फूर्तीची महालाट उठविली ती हुबळीचा मुक्काम दोन दिवसांनीं हलेतों कायम होती. अद्यापही ती ओसरली नाहीं ! ‘ संत हीं देवाचीं रूडीं ’ आहेत यांत संशय काय ? हाच कृष्णभक्तीचा आनंद हुबळीस दुसऱ्या एका घरीं मिळाला. ‘ नागलीबाई ’ व त्यांचे यजमान असेच अत्यंत प्रेमळ आहेत. नागलीबाईनीं भेट होतांच जो असाच प्रेमाचा पूर वाहविला त्याला तोड नाहीं. त्यांच्या तोंडून सहज उत्कट प्रेमभरांत जी शब्दनिर्झरी वाहिली ती लेखणीनें लिहितां येत नाहीं. ‘ श्रीतुकारामचरित्रानें ’ त्यांच्या हृदयांत हा प्रेमा उभा केला. त्या ग्रंथांतील १।२ प्रकरणें तरी नित्य वाचल्याशिवाय त्यांना राहवत नाहीं. “ महाराज ! हा ग्रंथ तुकोबारायच आपल्या मुखानें बोलले आहेत. माझें संतप्त हृदय आपण आपल्या वाणीनें शमविलें आहे....” श्रीतुकोबारायांचे चरित्रावर अनेक विद्वानांनीं अभिप्राय दिले, टीका केल्या, तथापि त्या प्रसंगीं नागलीबाईची ती उत्कट भक्ति व ते प्रेममय स्फुरणें वगैरे सात्त्विक भाव पाहून आह्मा सर्वांसच अत्यंत गहिंवर आला. नारायणानें आपल्या हातून खरोखरच इतकी उत्कृष्ट सेवा घेतली आहे काय असें वाटून तत्प्रीत्यर्थ झालेल्या सकल श्रमांचा परिहार झाला. ह्या प्रेमळ अंतःकरणांतून जो जिव्हाळ्याचा उद्गार अश्रुपातांसह निघाला त्यापुढें विद्वानांचे सर्व अभिप्राय काय होत ? सुब्रावबावांच्या श्रीकृष्णमंदिरांत रात्रीं कीर्तन होऊन आम्हीं निघालों तों आमच्याबरोबर गोपाळराव सहकुटुंब निघाले. हुबळीस एक दिवस श्रीसिद्धारूढस्वामींचें दर्शन झालें. वय ९५ आहे. मूर्ति शांत, दृष्टि निवालेली व प्रसन्न आहे. बाबा गर्दे यांनीं स्वामींवर जें पद केलें आहे त्यांतील वर्णन यथार्थच आहे. महादेवआण्णांच्या प्रेमाग्रहास्तव बेळगांवीं एक रात्र त्यांचे घरीं। भोजनसमारंभास्तव उतरलों व दुसरे दिवशीं सर्व मंडळी नरसोबाच्या वाडीस गेलों.

## ८ नरसोबाची वाडी व कोल्हापूर.

बेळगांवाहून सकाळीं ८ वाजतां निघून १ वाजतां मिरजेस आलों व मोटारीनें २ वाजतां वाडीस येऊन पोंचलों. श्रीकृष्णाबाईचें स्नान व दर्शन होऊन सायंकाळीं ५ वाजतां अन्नाची आमची गांठ पडली. तो दिवस शनिवार होता. रात्रीं पालखी निघाली होती. प्रदक्षिणेस आरंभ होता. लोकांच्या प्रेमास्तव पालखीपुढें दोन प्रार्थनेचे अभंग म्हटले व रात्रीं ११ वाजतां श्रीदत्तपादुकांपुढें

' एको विष्णुर्महद्भूतं ' ह्या श्लोकावर प्रवचन झालें. वाडीचें पवित्र व रम्य स्थान, हुबळीपासून प्रेमा चित्तांत दाटलेला, भाविक गृहस्थ व विद्वान् संन्यासी यांचा समाज, खूर आनंद झाला. " हें परमात्म्याच्या वस्तीचें पुण्यक्षेत्र, येथें अंगांतलीं भूतें जातात. जीवकोटींत भूतांचीही एक योनि आहे, नाहीं असें म्हणवत नाहीं. पतितपामर भूतांनीं पछाडल्यामुळें पीडा पावून येथें येतात. येथें महद्भूत आहे. ' एको विष्णुर्महद्भूतच 'भूतांना गिळून टाकतें. हीं भूतेंच पण काय, ज्या पंचमहाभूतांचे पिंडब्रह्मांड बनलें आहे त्या पंचमहाभूतांनाही खाऊन टाकणारें हें महद्भूत आहे. हें भूतांच्या पलीकडचें आहे. हें एकीएक आहे. व्याप्यव्यापकभावरहित व्यापक [ विष्णु ] आहे. याला मात्र कोणी खाऊन टाकीत नाहीं. हें शाश्वत, अव्यय, अनादि आहे. साधीं भूतें पापी-पामरांना पछाडतात; पंचमहाभूतें सर्व जीवांना पछाडतात, पण दोन्ही प्रकारचीं भूतें हें महद्भूत गिळून टाकतें. आदिमध्यावसानीं हें एकमेवाद्वितीय आहे. पाप्यांना दुसरीं भूतें लागतात. पुण्यवंतांना हें महद्भूत लागतें. श्रीसमर्थ, तुकोबा, नाथ यांनीं हें महाभूत आपल्याला लागल्याचें लिहिलें आहे. हें आपल्याला लागावें म्हणून येथें यायचें व हीच त्याची प्रार्थना आहे. " अशा आशयाचें येथें प्रवचन झालें. दुसऱ्या दिवशीं कोल्हापूरच्या जगदंबेच्या दर्शनास मोटारींनीं आम्ही गेलों. दोन तास देवीसन्निध काढले. बायांनीं देवीची ओटी भरली. सायंकाळच्या गाडीनें मिरजेस आलों. तेथून मंडळी कष्टी अंतःकरणानें वियोगदुःख पावून बेळगांवकडे गेली व आम्हीं पुण्यास रात्रीचे मेलनें आलों. सर्व प्रवास महिनाभर अत्यंत सुखकर झाला. पुण्यामुंबईस आठवडा राहून आम्हीं डिसेंबरचे अखेरीस नाशकास आलों. नाशकास मुंबईचे श्री० लक्ष्मीदास यांनीं विष्णुयाग आरंभिला होता. शेवटच्याच दिवशीं येतांच मंडपांत ' नामजपा'वर रात्रीं प्रवचन होऊन दुसरे दिवशीं [ पौष पौर्णिमा ] मोठी मिरवणूक निघून गंगाबाईच्या दर्शनास जाऊन तेथें अवभृतस्नान झालं. आनदी आनंद आहे. ' जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ' ह्या तुकोबारायांच्या उक्तीचें व ' आपुलीं वाटती सर्वें धन्य तूं गा ! रघूत्तमा ' ह्या समर्थांच्या वचनाचें वारंवार स्मरण होत असे.

---

# ३० कळकळीचा प्रेमभाव.



१. चातुर्मास सुरू आहे. देवाधर्माचीं व व्रतवैकल्याचीं कामें या काळांत घरोघर व मंदिरांतून अधिक होत असतात. तीं कळकळीच्या प्रेमानें करावींत. किडक्या सुपाऱ्या, हलके तांदूळ व विडयांचीं पानें, वासरें तूप हें सारें देवाधर्माकडे व श्रीवर्धनी सुपाऱ्या, आंबेमोहोराचे तांदूळ व उत्तम नवतीचीं पानें आणि साजूक लोणकढें तूप खायला असला प्रकार कांहीं ठिकाणीं आढळण्यांत येत असतो! ह्या कृत्रिमपणानें, खोटेपणानें देवाला माणसें ठकवूं पाहतात, पण देवाला किडकी सुपारी दिली कीं, देव किडकेंच फळ माणसाच्या पदरांत टाकीत असतो हें विसरतात! बुद्धीसारखें फळ मिळतें. खोटेपणा मुळांतच वाईट, आणि अंतरंग जाणणाऱ्या देवापाशीं खोटेपणा म्हणजे नवलाची गोष्ट आहे. एखाद्या अधिकाऱ्याला, जांवयाला नाहीं तर स्नेह्याला मेजवानी देतांना जो मनोभाव प्रगट होतो तेवढा तरी देवाला दाखवा! माणसांशीं वागतांना जो खरेपणा दाखवितां तेवढा तरी निदान देवाशीं वागतांना असावा! 'देव भावाचा भुकेला' आहे, त्याला वरपंगी ढोंग नको असतें. भाव तसें फळ. भाव खोटा तर फळ खोटें. भाव शुद्ध तर भाजीचें पानही त्याला प्रिय होतें.

जैसा भाव जयापाशीं। तैसा देव तयासी।
जाणे भाव अंतरसाक्षी। प्राणिमात्रांचा॥ १३॥
जरी भाव असेल माइक। तरी देव होय महाठक।
नवल तयाचें कौतुक। जैशास तैसा॥ १४॥
जैसें जयाचें भजन। तैसेंचि दे समाधान।
भाव होतां किंचित न्यून। आपणहि दुरावे॥ १५॥
जैसा भाव प्रतिबिंबला। तयाचाचि देव जाला।
जो जैसें भजे त्याला। तैसाचि बोळे॥ १९॥

—दासबोध द. ३ स० १०

२. भाव तैसा देव, भाव तोचि देव, हें साधुसंतांचें वचन यथार्थ आहे. देवापाशीं खोटेपणा करणारा मनुष्य माणसांशीं काय खरेपणानें वागेल? म्हणून कृत्रिम अवघें टाकावें व खरेपणानें, कळकळीच्या प्रेमानें देवाला भजावें, अंतरंगापासून देवकार्य करावें.

देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम्।

असा श्रुतिमाउलीचा उपदेश आहे. देव बाह्य उपचाराला, बहिरंगाला भुलत नाहीं.

अर्जुना माझें ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाहीं ।
मी उपचारें कवणाही । नाकळे गा ॥ ३६७ ॥
—ज्ञानेश्वरी अ० ९

मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाही ॥ १ ॥
पहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ २ ॥
शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥ ३ ॥
तुका म्हणे विठोबाशीं । ठाव देई चरणापाशीं ॥ ४ ॥

३. ढोंगचतुरें, खोटेपणा, वरपंगी प्रेम यानें मनुष्य फसत नाहीं. पशुपक्षीही फसत नाहींत. मग तो अंतरसाक्षी देव कसा बरें फसेल? यासाठीं देवकार्यें सर्वच मनःपूर्वक सद्भावानें करीत असावींत म्हणजे देव प्रसन्न होतो व समाधानाचें फळ देतो. आतां गणेशोत्सव जवळ आला, अनंतव्रत आलें, देवाधर्माचा काळ आला आहे, तरी सर्वच कर्में देवाचा संतोष जोडेल अशा कळकळीनें करावींत. टाकणें टाकायचें म्हणून करूं नयेत. त्यांत अर्थस्वार्थ कांहींच नाहीं. जें आपल्याला मनापासून आवडतें तें देवाला वाहावें. पोरसुद्धां खोट्याला वळत नाहीं, मग प्रेममूर्ति आत्माराम कसा बरें वळेल? त्याला प्रेम हवें. एकच फूल व एकच तुळसीपत्र–पण तें सुगंधी फूल निर्मळपणें वहावें. फुलाला सुमन म्हणतात, सुमन मन शुद्ध करून देवाला अर्पावें. दास० ४ स० ८:––

देवासी परमसख्य करावें । प्रेमप्रीतीनें बांधावें ।
सख्यभक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ २ ॥

देवाला जें प्रिय तें आपण करावें, म्हणजे त्याचें आपलें सख्य जमतें. त्याला काय आवडतें?––

भक्तिभाव आणि भजन । निरूपण आणि कथाकीर्तन ।
प्रेमळ भक्तांचें गायन । आवडे देवा ॥ ४ ॥

देव सत्यस्वरूप असल्यामुळें त्याला सत्यच आवडतें. मनांत, वाणींत व आचारांत पूर्ण सत्य असणें हें देवाला आवडतें. असत्याची काळोखी देवदर्शन देण्यास असमर्थ आहे. देवाचीं कर्में निर्मळ सत्यत्वानें करायचीं संवय लागली कीं, मनुष्याकडून व्यवहारांतही असत्याचरण होऊं शकत नाहीं. व्यवहारांतलें सत्य वेगळें, राजकारणांतलें वेगळें, पारमार्थिकांचें सत्य वेगळें असें सत्याचे नानाप्रकार असूं शकत नाहींत! सत्य तें सत्यच, त्रिकालाबाधित सत्य, सर्वकाळीं, सर्वस्थळीं व सर्व अवस्थांतून एक सत्यच शाश्वत आहे. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' अशा प्रकारें परमात्मस्वरूप सत्य आहे, ज्ञानमय व अनंत आहे असें श्रुति सांगते. देव सत्य तर भक्तही सत्यच खरा. सत्य नसेल तर

भक्त कमचा ? सत्याची प्रीति भक्ताला असते ह्मणून त्याजपाशीं असत्य, कृत्रिम, ढोंग नसतें., कळकळ असते.

४. देवाशीं सत्यत्वानें वागायची संवय आपण लावून घ्यावी. अंतरींच्या कळवळ्यानें आपण देवाची पूजादि कर्मे करूं लागलों तर देवही आपणासाठीं अंतरीं कळवळेल. तो कळवळाच तेवढा पाहतो. त्याला बाकी कसलीही आवड नाहीं. श्रावणी जवळ आली आहे. तरी देवतर्पण, ऋषितर्पण, पितृतर्पण करायची ही महापर्वणी मोठ्या श्रद्धाभक्तीनें साधून मनाचा पवित्रपणा वाढवावा. उगाच टिवल्याबावल्या करीत चावटीचे बोल बोलत बसूं नये. थोर पूर्वजांच्या व पूर्वकालीन संतमुनींच्या पुण्यस्मरणानें चित्तशुद्धीचा हा प्रसंग आनंदानें साजरा करावा. ' भावार्थाचा दुष्काळ ' पडलेला दिसत आहे. तरी सभाग्यांनीं आपला भाव जतन करावा, वाढवावा व इहपरलोक साधून धन्य व्हावें.

५. फाजील तर्कटाची संवय खोटी, ती लावून घेऊं नये. देवाच्या मार्गांत तर्काला प्रतिष्ठा नाहीं. श्रद्धावंताला ज्ञान होतें असें देवच गीतेंत सांगतात. तर्कटाच्या कपाळीं भक्तिभावाचें गोड सुख नाहीं. तर्कटें, वादविवाद व संशय ह्या तीन दैत्यांनीं परमार्थमार्गाला अडथळे आणले आहेत, म्हणून ह्यांचा वाराही मनाला लागूं न देतां मन जेणेंकरून भक्तिभावानें उचंबळलें राहील तेवढेंच घ्यावें. देवाला अनुकूल तें स्वीकारावें, प्रतिकूळ तें त्यागावें. देव मधुर आहे, देव दयाळू आहे, देव वत्सल आहे, देव स्वजनांना सर्वोपरी सांभाळतो, अशी वाढती श्रद्धा व वाढता प्रेमा ठेवावा.

---

# ३१ आरोग्य, ब्रह्मचर्य व देशसेवा.

**शिष्यः**—महाराज! आज आपण आह्मांला ब्रह्मचर्याचें महत्व सांगणार आहांत ना?

**गुरुः**—होय. ब्रह्मचर्य, आरोग्य व देशसेवा याबद्दल मी आज तुह्मांस दोन शब्द सांगणार आहे. ते नीट ध्यानीं धरून त्याप्रमाणें वागा. 'दुःख दारिद्रय उद्वेगें' लोक सर्वत्र पीडिले आहेत. त्यांचा उद्धार करण्यास तरुणांनीं कंबरा कसल्या पाहिजेत. आजची तरुणपिढी ही पुढील पिढयांचा आधारस्तंभ आहे. आधीं शरीरसंपत्ति मिळविण्याकडे तरुणांनीं लक्ष पुरविलें पाहिजे. देशाच्या वाढत्या दारिद्रयामुळें बालपणापासून चिंता क्लेश तरुणांच्या मागें लागतात. व चिंताराक्षसीण तरुणांचें रक्तमांस खाऊन त्यांच्या मेंदूचे लचके तोडते ही गोष्ट खरी आहे. परराज्यामुळें आलेलें दारिद्रय ही महत्तम आपत्ति आहे, तरी आपत्तींतूनच आपला मार्ग आपणच काढला पाहिजे. सध्यां शाळा, कॉलेजें, सभा पाहिल्या तर गालफडें बसलेले, डोळे खोल गेलेले, निस्तेज व फिक्कट झालेले असे तरुणांचे कळप जिकडे तिकडे दिसतात! सारी परिस्थितीच बिघडलेली आहे. नाटकें, तमाशे, कादंबऱ्या, शृंगारिक सोहळ्यांचीं चव्हाटयावर प्रदर्शनें वगैरे ढोंगें सोंगें निघालीं आहेत. विद्यार्थ्यांमध्यें वाईट चाली व घाणेरडया संवयी पसरत आहेत. धर्मश्रद्धा ढांसळत चालल्यामुळें पापपुण्याची व देवा-धर्माची भीति पार उडून गेली आहे. अशा वेळीं दारिद्रय, धर्मलंडपणा आणि निरुपयोगी व पिळून टाकणारें शिक्षण ह्या सर्वांचा दुष्परिणाम तरुणांच्या आरोग्यावर अत्यंत झालेला आहे. अंतःकरणांत देशभक्तीची ज्योत पेटत आहे. पण एक थोबाडींत मारली तर तिरीमिरी येऊन पडण्याइतकी दुर्बलता बहुते-कांची वाढली आहे! बहुतेक तरुण सुदामदेव बनले आहेत! काडीपैल-वानांच्या हातून कोठें मोठालीं राष्ट्रकार्यें झालीं आहेत काय? नेपोलियन, शिवाजी, सीझर, बाजीराव, गॅरिबाल्डी हे सर्व प्रचंड वीर होते. शिवाजी महा-राजांना आपल्या कवेंत पकडणाऱ्या अफजूलखानाला पालथा पाडून त्याच्या छातीवर बसून वाघनखें त्याच्या पोटांत खुपसणाऱ्या शिवरायाचें शरीर किती कसलेलें होतें याची तुह्मांला कल्पना आहे काय? शिवरायाचें बाळपणीं लग्न झालें होतें. त्यांनीं राजकारणासाठीं नऊ बायका केल्या होत्या. पण इतकें असूनही ते केवळ वज्रदेही होते! राष्ट्रकार्य करूं पाहाणाऱ्या तरुणांच्या अंगीं प्रथम अद्भुत शरीरबळ असलें पाहिजे. रणशूर तानाजी मालुसऱ्याचा रोजचा आहार बावन्न शेरांचा असे व शिवाय तो रोज एक बकराही पचवीत असे,

असें बखरींत वर्णन आहे. यांत थोडी अतिशयोक्ति असली तरी विडयांचा धूर व चहाचें पाणी ह्यावर जगणाऱ्या तरुणांना ही गोष्ट म्हणजे कल्पित कादंबरीच वाटेल. चित्रगुप्तविरचित शिवाजी महाराजांची बखर पहा. तीत तानाजीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहेः—" त्याजवरून **तानाजी मालुसरा** वरिष्ठ हजार लोकांचा सरदार-कांहीं सामान्य नव्हे—ज्याचा धाक हबशियास व कुडाळकर खेमसावंतास, कोळवणचे राजे याम—वगैरे लोकांस भारी! पुंड, समशेरबहादर, सुदृढ, बलाधिक्यता अधिकोत्तर, दिग्गज पुरुष, त्याचे समागमें त्रिलोकात्रयास दुसरा नाहीं! सराईत व दंडाईत व पटाईत, सर्व शस्त्रांचें घडामोडींत प्रवीण, रूप पाहतां भयानक; भीमसेनाचे उपमेस योग्य; जनवाक्यें स्मश्रु, पिंगटा; नेत्र आरक्त, स्फुलिंगें तांबडीं, मिशा हस्तदंडप्राय मोठया लांब; तसेंच मस्तक प्रचंड, बलोन्मत्त जसे द्विरदच. हत्तीचा तमा ज्यास नाहीं, व हत्तीचे दोन्ही दंत धरून उभा करावा, ऐसी बळाची निस्सीमता! तानाजीराव ज्या फौजेंत असलीया सहस्त्राचे सहस्त्र लोकांनीं भयें करून पलायन संपादावें! समरीं भयें करून कोणी न टिकावें, त्यास विलोकून कंपायमान होत असावें!! असत्य सर्वथा नाही. महाराजांची परमकृपा तानाजीवर! संपूर्ण सत्तावीस मावळें, महाराजांस हस्तगत करून दिलीं." असले निधडे वीर शिवरायांनी आपलेसे करून घेतले होते म्हणून त्यांना स्वराज्य अल्पावधींतच मिळवितां आलें.

**शिष्य.**—तानाजीचें हें वर्णन अगदीं खरें आहे काय? कां त्यांत कांहीं अतिशयोक्ति भरलेली आहे?

**गुरुः**—डोकें दुखतें म्हणून आठचार दिवसांनी डोक्यावरून स्नान करणारे, चहा व मद्य ह्यासारख्या उत्तेजक व मादक पदार्थांनीं अंगात उसना तकवा आणणारे, तोंडांत विडी धरून शौचास आवतरणारे अलीकडचे तरुण वीर निसत्व झालेले आहेत, त्यांना तानाजीच्या गोष्टी खोट्याच वाटायच्या! तानाजीसारख्यांनीं दहावीस वर्षांतच राज्यें मिळविलीं व तुम्ही राज्याच्या वाटाघाटी व त्याही चव्हाटयावर जमून वर्षोनवर्षे करितां, येवढाच त्यांच्या तुमच्यांत भेद आहे. 'शक्तीनें मिळतीं राज्यें' असें समर्थांनीं म्हटलें आहे तें उगीच कां! समर्थ ' अध्यात्मसार ' ह्या प्रकरणांत म्हणतातः—

## कविता.

शक्तीनें पावती सुखें । शक्ती नसता विटंबना ॥
शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ १ ॥
कोण पुसे अशक्ताला ? । रोगीसे बगडी दिसे ! ॥
कळा नाहीं कांति नाहीं । युक्ति बुद्धी दुरावली ॥ २ ॥

साजिरी शक्ति तों काया । काया मायाचि वाढवी ॥
शक्ती तों सर्वही सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥ ३ ॥
सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ॥
शक्त तो सर्वही भोगी । शक्तीविण दरिद्रता ॥ ४ ॥
शक्तीनें मिळती राज्यें । शक्तीनें यत्न होतसे ॥
शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥ ५ ॥

**शिष्यः**—समर्थांची वाणी किती तरी ओजस्वी आहे! पण वरच्या पांचव्या ओवीचा अर्थ काय बरें ?

**गरुः**—समर्थ त्या ओवींत म्हणतात कीं, शक्तीनें राज्यें मिळतात पण राज्यें मिळविण्याचे प्रयत्न मात्र युक्तीनें केले पाहिजेत ! शक्ति व युक्ति ह्यांचा जेथें मिलाफ झाला आहे, त्या ठिकाणींच परमात्म्याचा प्रादुर्भाव होतो. शक्ति म्ह० धनुर्धर पार्थ व युक्ति म्ह० योगेश्वर कृष्ण. सदर ओवींत समर्थांनीं गीतावचनाचाच अनुवाद केला आहे. युक्ति म्ह० बुद्धिशक्ति, योग. योग म्हणजे जयापजयाविषयीं चित्ताची समता राखणें. शिवरायाच्या ठिकाणीं शक्ति व युक्ति दोन्ही नांदत होत्या, व तिसरी भक्तिही हजर होती. शक्ति, युक्ति व भक्ति त्या काळीं शिवाजी, रामदास व तुकाराम ह्यांच्या रूपानें महाराष्ट्रात मूर्तिमंत वावरत होत्या. तिन्हींचा एकजीव झाला होता म्हणून स्वराज्यसंस्थापना झाली. सांप्रत तरुणांच्या अंगीं शक्ति नाहीं, वडिलांपाशीं युक्ति नाहीं व कोणाच्याच अंतरंगांत भक्ति नाहीं म्हणून राष्ट्राची अशी दैना उडाली आहे. शक्ति, युक्ति व भक्ति या तिहींची तुम्ही जोपासना कराल तर हिंदुस्थानचेंच काय पण साऱ्या पृथ्वीचें साम्राज्य जवळ कराल.

**शिष्यः**—शक्तीचा काळ गेला आतां युक्तीचाच आहे !

**गुरुः**—अरे ! हा कोण भ्रम आहे ! शक्तीवांचून नुसत्या युक्तीला कोणी भीक घालीत नाहीं. ' मुक्त केल्या देवकोटी । सर्वही शक्तिच्या बळें ' असें समर्थ मारुतिस्तोत्रांत सांगत आहेत. ' युक्तीविण कामा नये ' पण ' युक्तीला पाहिजे शक्ती ! तस्मात् शक्ती प्रमाण हे. ' शक्तीवांचून जिणें व्यर्थ आहे. संसार नाहीं, राजकारण नाहीं व परमार्थ नाहीं. तिहींचा पाया शक्तीच होय.

देहीं आरोग्य चालतें । भाग्य नाहीं त्या परतें ॥

राष्ट्राच्या निकृष्ट काळीं धकाधकीचीं कामें करणाऱ्या तरुणांच्या अंगीं उत्साह, बळ व प्रचंड शक्ति पाहिजे. तरुण वज्रदेही पाहिजे. समर्थांनीं आपल्या काळीं महाराष्ट्रांतील तालीमखान्यांत शक्ति, युक्ति व भक्ति यांचें अधिष्ठान अशा मारुतीची स्थापना केली व लोकांत स्वधर्माचाराचें, ज्ञानाचें व उपासनेचें बळ उत्पन्न केलें. ध्येय वस्तूचे गुण ध्यान करणाऱ्यांत उतरत असतात. मारुतीचें

विशाळ रूप, त्याच्या हातांतली ती गदा, त्याचा तो वीररसात्मक पवित्रा, क्षणार्धांत लंकेला वेटाळणारें त्याचें तें पुच्छ, लीलेनें समुद्रोल्लंघन करणारें त्याचें प्रचंड उड्डाण, त्याचें लोकोत्तर ब्रह्मचर्य, त्याची निष्काम रामभक्ति, त्याच्या चरित्रांतलें सर्व अद्‌भुतपण ध्यात्याचें मन उन्नत, विशाळ व ओजस्वी करण्यास समर्थ आहे. मारुतीचें ध्यान करितां करितां ब्रह्मचर्य, रामभक्ति, लोकोपकारित्व हे त्याचे गुण समर्थांच्या अंगीं आले, यावरून मारुतीची उपासना तरुणांनीं प्रेमपुरस्सर घेतल्याशिवाय राष्ट्रोद्धाराचा सुलभोपाय नाहीं. मारुतीचें ध्यान करून प्रत्यहीं हजारपांचशें नमस्कार घालावे व वर धारोष्ण दूध प्यावें. चहा, चिवडा, भजीं असले रुक्ष घाणेरडे पदार्थ खाऊन, नाटक तमाशांत व प्रणयकथांत डोसकीं खुपसून राहणाऱ्या तरुणांचा देशाला फायदा काय ? त्यांचा त्यांना तरी काय? तालीम करावी,दंड काढावे, कुस्ती खेळावी, लाठी फिरवावी, सर्वत्र भरतखंडभर पायीं संचार करून डोंगरकडे किल्ले पायाखालीं घालावे. वीर्यशाली अशा मारुतीचीं समर्थकृत अष्टकें रोज घोषपूर्वक पाठ म्हणावींत. शरीरबळ, मनोबळ, बुद्धिबळ, आत्मबळ प्रचंड जोडावें व त्याचा रामकार्यांत म्ह. लोकोद्धारांत वेंच करावा. वीरांची जगत्कल्याणकर मंगलचरित्रें अवलोकावींत.

> एकांतीं चाळणा करावी । धारणा उदंड धरावी ।
> नाना विचारणा करावी । अरिमित्रांची ॥

**शिष्यः**—सर्वांनींच ब्रह्मचारी राहावें काय ?

**गुरुः**—' मरणं बिंदुपातेन जीवनं बिंदुधारणात् ' हें ब्रह्मचर्याचें पहिलें सूत्र ध्यानांत धरा. राष्ट्राच्या अभ्युदयासाठीं कांहीं तरुणांनीं नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळण्याचें व्रतच घेतलें पाहिजे. श्रीसमर्थमहाराजांनीं आपला संप्रदाय याच उद्देशानें काढला होता. आतां लोकांत आळस वाढला आहे तो जाऊन दीर्घ सांक्षेप बळावला पाहिजे. एकांतीं अखंड चाळणा ठेवावी व जनांचें अंतरंग होऊन राहावें. सांप्रत फाजील चिकित्सेनें सारा चिवडा केला आहे. भक्तिभावाचा दुष्काळ पडला आहे. पण लक्षांत ठेवा, जाणता व भाविक पुरुष खोबरें घेऊन जातो व तर्कटी पाखंड्यांच्या हातीं नारळाची आई येते ! ' अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन ' हें ज्याजवळ आहे त्यालाच जनमन आकळितां येतें. कडकडीत वैराग्य, पराकाष्ठेची निस्पृहता व निर्मळ सदाचार, लोकसेवेची कळकळ, परमात्मस्वरूपीं आत्मसमर्पण हे गुणपंचक ज्यांच्यापाशीं आहे असे शंभर तरुण देशाचा उद्धार अल्पकाळांतच करितील. निष्कलंक ब्रह्मचर्य पाळण्याइतकें मनोधैर्य ज्यांत असेल तो निःसंशय संसारपाशांत अडकलेल्यापेक्षां अधिक कार्य करील ! पण अविवाहित राहणें किंवा विवाह करणें हा प्रश्न ज्याचा त्यानें सोडवायचा आहे. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या आड त्यांचा वैय-

त्त्विक संसार आला नाहीं किंवा एकनाथ महाराजांच्या धर्मोद्धाराच्या कार्यांत त्यांच्या संसारानें विघ्न केलें नाहीं. हे महापुरुष संसारांत असून अलिप्तच होते आणि लग्न करूनही ब्रह्मचर्याचें फळ त्यांना मिळालें. ब्रह्मचर्याचें रहस्य समजून वागलें पाहिजे. मनाची पक्की तयारी केल्यावर, इंद्रियांना स्वाधीन ठेवण्याची शक्ति अंगांत आणल्यावर लग्न केलें काय आणि न केलें काय सारखेंच आहे. भीष्माचार्य, मारुतिराय, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, समर्थ हे मोकळे राहून अचाट कर्मे करूं शकले, तर रामकृष्णादि अवतार, जनक, शिवाजी, एकनाथ यांना प्रपंचांत राहूनही तसले पराक्रम करितां आले. आयुष्याचें ध्येय मुक्रर ठरवून तत्प्रीत्यर्थ कायावाचामनानें झटण्याचा निश्चय हें मुख्य आहे. ज्याचा आत्मनिश्चय ढळत नाहीं, स्वस्वरूपानुसंधान सुटत नाहीं तोच खरा ब्रह्मचारी होय.

**शिष्य:**—सध्याचे तरुण ब्रह्मचर्याचें व्रत घेऊं शकतील काय ?

**गुरु:**--कांहीं थोडे घेऊं शकतील व त्यांच्याच साठीं हा माझा उपदेश आहे. एकंदरींत पाहतां हा शिक्षणाचा ओघ बदलल्याशिवाय राष्ट्राला घडगत नाहीं. तरुणांची मनःप्रवृत्ति देवाधर्माकडे नाहींच पण ते पिंडपोषक होऊं पाहत आहेत. नटणें-मुरडणें, नाटकें-कादंबऱ्या, डोक्यावरचीं केसांचीं टोपलीं, ते बायकांसारखे भांग, त्या अर्ध्या-नितकोर चतकोर मिशा-हा हिडिस प्रकार अत्यंत नामर्दपणा सुचवीत आहे. बाहेर नखरेबाजपणाचे कपडे व आंत हाडांचे सांपळे ! चहाचें पाणी ( कीं ज्यांत उघड उघड टॅनिन नांवाचें भयंकर विष असून अग्निमांद्य आणतें ) तें चार चार वेळ घेऊन हे आपलें मरण जवळ कां आणतात हें समजत नाहीं. घरांतलें सात्विक शुद्ध अन्न तेवढेंच घ्यावें, पण चहा, चिवडा, भज्यांचा जो घाणेरडा प्रकार बळावत आहे याला वेळींच आळा न बसला तर तरुणांची स्थिति भयप्रद होणार आहे ! आहारशुद्धीनेंच सत्वशुद्धि राहते हे यांना समजत नाहीं काय ? असले कमकुवत, दुर्बळ, लुटुपुटीचें ब्रह्मचारी काय कामाचें ? ब्रह्मचारी एक फर्लांगावरूनच समजला पाहिजे. गंगाजलासारखें निर्मल आचरण ठेवणारे ब्रह्मचारीच देशकार्यार्थ पुढें सरसावले पाहिजेत. 'धगधगीत पुण्यराशी महापुरुष' हेच राष्ट्रकार्याच्या पटांगणांत पुढें आले पाहिजेत. राष्ट्रोद्धाराच्या मंगलकार्यांत अमंगल, अपवित्र, पापी पुरुष तळच्या रांगेंत सुद्धा नकोत. स्वराज्याच्या भव्य इमारतीच्या जोत्याला लागणारे पुण्यपुरुष नीतीचे पुतळे, धर्माचे आधारस्तंभ व सदाचाराचे आदर्श पाहिजेत. समर्थांनीं शिवाजीमहाराजांना जें पहिलें पत्र लिहिलें त्यांत:—

> **यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।**
> **पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ॥**

आचारशीळ विचारशीळ। दानशीळ धर्मशीळ।
सर्वज्ञपणें सुशीळ। सकळांठायीं ॥

ह्या प्रमाणें शिवरायाचें गौरव केलें. ह्या गुणांनी संपन्न असलेले तरुण, मग ते विवाहित असोत वा अविवाहित असोत, तेच लोककार्याचें जूं अंगावर घेण्यास लायख आहेत.

---

## ३२ इतिहासाचार्य राजवाडे.

( १८६४--१९२६ )

विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे महाराष्ट्रीय वाचकवर्गांत प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. आज इतिहासशास्त्र, भाषाशास्त्र व समाजशास्त्र हीं शास्त्रें पोरकीं झालीं. चालू क्षयसंवत्सरांत महाराष्ट्रभाषेचे चांगले कसलेले ५।६ ग्रंथकार व विद्वान् जाऊन मऱ्हाठी भाषेची अत्यंत हानि झाली आहे. प्रो. अण्णा **विजापुरकर** हे 'ग्रंथमालेचे' संपादक व राष्ट्रीय शिक्षणाचे आद्य पुरस्कर्ते गेले. 'महाराष्ट्रसारस्वताचे' संपादक ठाण्याचे विनायकराव **भावे**, 'केरळ-कोकिळचे' एका काळीं लोकप्रिय संपादक **आठल्ये**, अमेरिकन आरोग्य-पद्धतीचे प्रवर्तक सीताकांत **लोटलीकर**, साताऱ्याचे इतिहाससंशोधक **पारसनीस** व आतां शेवटचे **राजवाडे** अशीं हीं सहा पुरुषरत्नें एका वर्षांत जाऊन मराठी भाषेचें व महाराष्ट्राचें अपरिमित नुकसान झालें आहे. या सर्वांनीं आपापल्या-परीं महाराष्ट्राची सेवा चांगली बजावली. इतिहासाची फार मोठी हानि पारसनीस, भावे व राजवाडे या तिघांच्या मृत्यूनें झाली आहे. या तिघांनींही १८९८ मध्यें आपापल्या कार्याची ध्वजा फडकावली व २८ वर्षें मराठी वाङ्मयाची सेवा करून १९२६ सालीं तिघेही एकामागून एक गेले ! महाराष्ट्र सारस्वताची पहिली आवृत्ति भावे यांनीं १८९८ मध्यें काढली, पारसनीस यांनीं त्याच सालीं 'झांसीची राणी लक्ष्मीबाई' या शूरवीर स्त्रीचें सुंदर चरित्र प्रसिद्ध केलें व राजवाडे यांनींही त्याचसालीं 'मराठयांच्या इतिहासाचीं साधनें' ह्या पुस्तकमालेचा पहिला खंड प्रसिद्ध केला.* जुन्या बखरी व ऐतिहासिक कागदपत्रें प्रथम काशिनाथपंत साने यांनीं प्रसिद्ध केलीं. त्यांचे मागून हें काम पारसनीस, खरे व राजवाडे यांनीं केलें. ह्या सर्वांत राजवाडे यांची काम कर-ण्याची शैली कांहीं अपूर्व होती. त्यांची निरलसता, कष्टाळुपणा, निःस्वार्थता

---

* 'मराठी भाषेचें स्वरूप' हा आमचा पहिला निबंधही १८९८ सालींच प्रसिद्ध झाला !

सर्वांगीण विवेचकबुद्धि व शोधकपणा हे गुण असामान्य होते. शिवकालीन पत्रव्यवहार व शिवकालीन घराण्यांतील कागदपत्रें त्यांनीं विलक्षण कष्ट घेऊन संपादन केलीं. काव्येतिहाससंशोधनाच्या कार्यांत अत्यंत श्रमसाहस करून त्यांनीं इतिहासशास्त्राच्या अध्ययनास एक विशिष्ट वळण लावलें. त्यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' २२ खंडांत उपलब्ध करून ठेवलीं आहेत व त्यांपैकीं कांहीं खंडांना शोधक, विवेचक व मार्मिक प्रस्तावना जोडल्या आहेत. यांचे कांहीं सिद्धांत सर्वमान्य होण्यासारखे नाहींत. तथापि यांची विवेचकशक्ति दांगडी, बुद्धिमत्ता प्रखर व दृष्टि लोकोत्तर होती. यांच्यासारखा इतिहाससंशोधक महाराष्ट्रांतच नव्हे तर उभ्या हिंदुस्थानांत कोणी झाला नाहीं. कित्येक बाबतींत यांच्या बुद्धीची विशालता टिळकांपेक्षांही अधिक उच्च कोटीची होती यांत शंका नाहीं. मराठे, पेशवे, मराठी भाषा यांविषयीं त्यांचा अभिमान जाज्वल्य होता. यांनीं एवढ्या संशोधनांत एकही ओळ इंग्रजी भाषेंत लिहिली नाहीं ! टिळक, रानडे प्रभृति विद्वानांनीं आपले चांगले ग्रंथ इंग्रजी भाषेंत लिहिले याबद्दल राजवाड्यांचा त्यांजवर रोषही होता. विशिष्ट स्वभावरचनेमुळें व सडेतोड व फटकळ बोलण्याच्या संवयीमुळें यांचें फारसें कोणाशीं पटत नसे. पण हेही स्वतंत्र प्रकृतीचे पुरुष कोणासही मेचून नसत. मनास येईल तें बोलायचें व स्वतःच्या बुद्धीस पटेल तें लिहायचें असा यांचा बाणा असे. कोणाचीही यांनीं पर्वा केली नाहीं व कोणापासूनही दोन दमड्या मिळण्याची इच्छा केली नाहीं. रहाणी अत्यंत साधी व निर्व्यसनी. मन मिळाल्यावर बोलणें अत्यंत गोड. यांच्या दुर्वासपणामुळें पुष्कळ लोक बिथरून जात, पण थोडें यांच्या मनासारखें पडतें किंवा मिळतें घेतल्यास यांच्या वाणीचा अस्खलित प्रवाह चाले व मग त्यांत जगांतील राजकारणें, इतिहासशास्त्र, भाषाशास्त्र, पाणिनीय व्याकरण, समाजशास्त्र, इ० शास्त्रांतील प्रमेयें हे फारच बहारीनें उलगडून सांगत. यांच्या लोकोत्तर बुद्धिमत्तेची साक्ष यांच्या खाजगी संभाषणांत जास्त पटत असे, असे कांहीं प्रसंग आम्हांला आठवतात. राजवाडे यांच्याशीं दोन तीन बाबतींत आमचे तीव्र मतभेद असूनही त्यांच्या विषयीं सर्वकाळ आमच्या मनांत अत्यंत आदर होता याचें वरील कारण होय. पहिल्या व चौथ्या खंडांच्या प्रस्तावनेंत साधुसंतांविषयीं त्यांनीं जें विपरीत मत प्रगट केलें त्या मताच्या लाटांनीं तरुण पिढीचीं मतें बरींच बिघडून गेलीं आहेत. साधुसंतांविषयीं कित्येक तरुण व उच्छृंखळ लेखकांत जो अनादर व तुच्छता कधीं कधीं प्रगट होते तो राजवाड्यांच्या शिकवणीचा परिणाम होय. तसेंच स्वजातीच्या अतिरिक्त पक्षपातामुळें इतर जातींतील कार्यकर्त्या पुरुषांवर ते कधीं कधीं घसरत त्यामुळेंच कीं काय कोण जाणे जातिभेद व जातिमत्सर या दुर्गुणांस फार ऊत आला आहे ! परमार्थाचें बाळकडू यांना इतर बहुतेक

विद्वानांप्रमाणें न मिळाल्या कारणानें संतांविषयीं महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत जो प्रेमादर वसत आहे त्याची मीमांसा यांना झाली नाहीं. हे दोन दोष वगळले तर राजवाडे म्हणजे एक अष्टपैलू हिरा होता. त्यांच्या प्रस्तावनेंतील कित्येक सिद्धांत जपून घ्यायचें ठरवलें म्हणजे यांची कामगिरी बिनमोल आहे. अचाट व अलौकिक बुद्धीचा पुरुष यांत शंका नाहीं. राजवाडे यांना परमेश्वरानें आणखी दहा पंधरा वर्षें जगविलें असतें तर यांच्या परिपक्व बुद्धींतून निघालेल्या सिद्धांत-ग्रंथांनीं यांनीं जगास दिपविलें असतें, यांत आम्हांस तिळमात्र शंका वाटत नाहीं. धुळ्याच्या मंडळींनीं 'राजवाडेसंशोधकमंदिर' स्थापून त्यांत त्यांचें संशोधन कार्य पुढें चालविण्याचें ठरविलें आहे हें पाहून आम्हांस संतोष होतो. पक्षभेदाचें विष आमच्या सर्व संस्थांत व चळवळींत संचरलें आहे त्यापासून आपली संस्था सर्वथा अलिप्त ठेवून 'सकल लोक एक करावें' 'मराठा तितुका मेळवावा' ह्या श्रीसमर्थांच्या उपदेशाप्रमाणें सदर संस्था राजवाडेभक्त हे चालवतील अशी आम्हांस उमेद आहे.

---

## ३३ गोपींचें मुरलीशीं गोड भांडण !

एकदां भगवान् श्रीकृष्ण आपली मुरली खालीं ठेवून थोडे बाहेर गेले. मुरली एकटीच सांपडलेली पाहून साऱ्या गोपींनी तिला वेढलें व परोपरीनें छळछळून घेतलें. या प्रसंगीं त्यांचा जो गोड कलह झाला तो येणेंप्रमाणें:—

**एक गोपीः**–ही मुरली किनई एकटी अन् आपण इतक्या, पण ही आपल्या सगळ्यांच्या नाकावर मिरें वाटायला निघाली आहे.

**दुसरीः**–ही फार वाईट आहे.

**तिसरीः**––अतिशय शिरजोर झाली आहे.

**चौथीः**–भारीच माजली आहे.

**पांचवीः**–सगळ्याजणींना हिनें तुच्छ करून सोडलें आहे.

**मुरलीः**–मज गरीबावर कां हा गहजब तुम्ही करीत आहां ? मी तुमचें काय केलें आहे ?

**सहावीः**–पुन्हां तोंड वर करून चुरुचुरु बोलते आहे कशी पहा !

**सातवीः**–म्हणे मीं काय केलें ? अहो ! मी परवांच्या रात्रीं जाऊन सुखानें निजले होते. तेव्हां ही मेली घरघेणी लागली गायाला. मला कांहीं सुचेनासें होऊन मी दचकून उठले व बावरी होऊन आले कीं या कुंजवनांत. पावसानें जी झोड उठवली ती मी सारी भिजून चिंब झालें.

**आठवी:**–अन् मी थानपितें पोर खालीं ठेवून कीं हो आलें धांवत. पायाला ठेंच लागून पडलें. अजून पहा बोटें सुजलीं आहेत तीं.

**नववी:**–ही मोठी मायावी आहे. हिची सुस्वर तान कांनीं पडली कीं कांहीं सुचत नाहीं. सारा कामधंदा सोडून यावें धांवत पळत. ही मुरली नाहीं हा प्राण हरण करणारा बाण आहे.

**दहावी:**–मी शेजेचा पति सोडून आलें धांवत पळत.

**अकरावी:**–मी बाई ! पुढचें ताट दिलें ढकलून, न् आल्यें.

**बारावी:**–हिनें आमच्या संसाराचा सारा विध्वंस केला आहे.

**तेरावी:**–हिच्यामुळें आमच्यावर नाहीं नाहीं तीं बालंटें येतात.

**चौदावी:**–ही बटकी, नाटकी, चेटकी, आहे.

**पंधरावी:**–तो ठक आणि ही ठकडी. दोघांनीं मिळून आमच्या संसाराचें वाटोळें केलें आहे. रात्रींबेरात्रीं घराच्या बाहेर आम्हांला ओढून काढून पावसांत, वाळवंटांत चिंब भिजवीत रानोमाळ भटक्या मारायला लावलें आहे.

**सोळावी:**––मेलीचें निसंतान होवो. कसली चेटकी पण.

**सतरावी:**––अहो ! हिनें तुम्हांआम्हांला पागल बनविलें आहे एवढेंच नाहीं, हिच्या मंजुळध्वनीला चराचर भुलून जातें. खग, मृग पाणी प्यायचें विसरतात. नाग डोलायला लागतात. यमुना वाहण्याचें आपलें काम सोडून स्तब्ध होते. सूर्याचा रथ जागच्या जागीं खिळल्यासारखा होतो. वृक्षवल्ली डोलायचें विसरतात. पशुपक्ष्यांची गति मंद होते. देवगंधर्वअप्सरा अमृताचीं ताटें टाकून जिभल्या चाटीत पृथ्वीवर धांवत येतात. त्यांच्या विमानाचीं थाटें आकाशांत जमतात. पोरें प्यायचें सोडून देतात. योगी समाधी सोडून तल्लीन होतात. व्याघ्रवृकादि हिंस्र पशु स्वभावधर्म विसरून गाईमृगांच्या जवळ येऊन उभे राहतात. ब्रह्मांड नादानें भरून जातें. गाई तोंडांतला चारा तोंडांत ठेऊन वर माना करून पाहात राहातात. भूचर, जळचर, स्थळचर सारे तन्मय होऊन ऐकत आपापलें कर्मधर्म विसरतात.

**मुरली:**––बायांनो ! हा प्रताप माझा नाहीं बरें ! मी यःकश्चित् वेणुकन्या. हा त्या मनमोहन प्रभूचा सारा प्रताप !

**साऱ्याजणी:**––तूं हरीवर काय चेटूक केलेंस तें सांग. त्याच्या त्या कोमल हाताचा अखंड आश्रय करून तूं त्याचें दिव्य अधरामृतपान निरंतर करीत असतेस. तर तूं असा कोणता महायोग साधला आहेस ? मेल्यांनो ! आम्ही कृष्णाचे भक्त म्हणून आमचा जगांत डांगोरा आणि आम्हांला जो लाभ सटी सामासीं तो तुला निरंतर ! आम्हांला त्याचें पादपांसु शिरीं घ्यायला मिळालें कीं आम्ही आपणांस धन्य समजतों, आणि तूं त्याच्या करांगुलीवर बसून त्याचें अधरमधुपान नित्य करितेस. आम्हां सगळ्याजणींच्या मिळून वांट्याला जो

भगवान् येत नाहीं तो तूं एकटीनें कसा वश केलास ? असें तूं कोणतें महा-पुण्य केलें आहेस ? अळलं मेलीचें चेटूक. आमच्या अंगांला मत्सराचे निखारे लागले आहेत. आम्हीं अंतर्यामीं जळत आहोंत.

**मुरली:**——बायांनो ! नका अंतर्यामी जळूं मी तुम्हां सगळ्याजणींची दया मागते. तुम्ही माझे आधार, तुम्ही माझ्या मैत्रिणी, माझ्या उपकारकर्त्या आया आहांत. मी तुमचें लेंकरूं आहे.

**साऱ्याजणी:**——असें नुस्तें गोड बोलून नाहीं भागायचें. खरं सांग, नाहीं तर कृष्ण येण्याच्या आंत तुला आम्ही मोडून तोडून फेंकून देऊं. सांग तूं कृष्णाला कसें वश केलेंस तें.

**मुरली:**——बायांनो ! सांगते. आधीं मनांतले सारे विकार टाकून निर्मल व्हा. मी तुम्हांला माझें गुपित सारें सांगते. शांत व्हा, प्रेममय व्हा. माझें रहस्य थोडें आहे. हें पहा, माझें हृदय मी भगवंतासाठीं मोकळें केलें आहे. मी उपजत अशी नव्हते, पण खालचें आणि वरचें अशीं दोन्हीं बुचें टाकून दिलीं व मोकळें मन केलें तेव्हां हरीनें मला हातीं धरिलें. प्रपंच-परमार्थ, पाप-पुण्य, आपलें-तुपलें, जाणीव-नेणीव, ज्ञान-अज्ञान, जन्म-मृत्यु, सुख-दुःख, अशीं दोन्हीं बाजूंचीं बुचें कायम ठेवून जग परमार्थ करीत असतें. मी हीं दोन्हीं टाकून हरीसाठीं हृदय मोकळें केलें तेव्हां हरिप्रेमाचा वारा त्यांत परिपूर्ण भरला व हरिप्रेमाच्याच जोरावर मी विश्वाला तन्मय करीत असते. दोन्ही बाजूंचे अडसर टाकून द्या. तुमच्याही हृदयांत हरीच आहे. पण त्याच्या प्रेममधुर-नादाचा पसर होण्यास तुम्ही आपल्या हृदयांत अवसर देत नाहीं, याला मी काय करावें व हरीनेंही काय करावें ? मन मोठें करा, मन विशाळ करा, मनांतला कोनाकोपऱ्यांतला सारा केर काढून टाका, मन विशुद्ध करा. हरीला मोकळें मन आवडतें. मनांतील सत्वरजतमाची सारी अडगळ काढून टाका. ती जवळ बाळगून हरी कसा बरें वळेल ? तो शुद्धतम आहे. मोकळ्या मनांत तो प्रवे-शतो. ध्रुवप्रल्हाद, स्त्रीशूद्र इत्यादिकांना हरि जवळ असतो. याचें कारण त्यांच्या हृदयांत अडगळ कमी. विद्वत्ता, जपतपदानादि, यांनीं अडगळ वाढत असते, म्हणून सर्व बाह्य साधनांपासून हरि दूर असतो ! त्याला बाह्य उपचार आवडत नाहींत. अंतरंग मोकळें पाहिलें कीं तो तेथें तत्काळ प्रवेशतो. तो तेथें आहेच.

———

# ३४ तीन उत्कृष्ट वचनें !

( १ )

अष्टावक्र महामुनि एकदां जनकाच्या धर्मसभेंत अकस्मात् आले व याज्ञवल्क्य मुनि येण्यापूर्वीच मुख्य आसनावर जाऊन बसले ! श्रोते सगळेच मोठे, ज्ञानी, योगी, संतमहंत असे शतंभीष्म होते, पण अष्टावक्र मुनि सर्वांत अत्यंत श्रेष्ठ होते. ब्रह्मविद्वरिष्ठ असे ते होते. त्यांची मुद्रा, त्यांचें रूप, त्यांचा बावळा वेष पाहून व ते एकदम मुख्यासनीं जाऊन बसल्यामुळें श्रोते अंमळ हेळणेनें हंसले, तेव्हां ते महामुनि म्हणाले, ' ही ब्रह्मवेत्त्यांची सभा आहे असें समजून मी येथें आलों, पण मी फसलों ! ही ब्रह्मवेत्त्यांची सभा नसून चर्मकारांची ( चामड्यावर नजर असलेल्या चांभारांची ) सभा आहे ! ' इतकें बोलून ते चालते झाले ! !

( २ )

श्री. सीतारामहाराज मंगळवेढेकर ( यांचें चरित्र आमच्या ' संतचरित्रमाला ' ह्या ग्रंथांत दिलें आहे ) हे फार उंच कोटीचे सत्पुरुष होऊन गेले. ' वृत्तिशून्य योगेश्वर ' ह्या दोन शब्दांत त्यांचें वर्णन करितों. असो. एकदां मंगळवेढ्यास एका हरिदासाचें कीर्तन चाललें असतां लोकांनीं यांना बळेंच धरून कीर्तनांत नेऊन बसविलें. ' महाराज, आपण कीर्तन करा ' असा आग्रह करून यांना उभे केलें ! वीणा कसा धरितात हेंही यांना ठाऊक नव्हतें. कीर्तनास उभे राहिल्यावर हे एकच वाक्य बोलले व ' झाली कथा ' असें म्हणून विठ्ठल नांवाचा त्रिवार घोष करून खालीं बसले. सिद्ध पुरुषाच्या स्वैरालापांत श्रुत्यर्थ उमटतात. त्यांचे तोंडचें वाक्य असें: ' घरांत दिवा अन् दारांत अडखळतोय ! '

( ३ )

सीताराम महाराजांचीच गोष्ट. त्यांना एका शास्त्रीबोवांनीं एकदां घरीं जेवायला बोलावलें. मंडळी जमली पण महाराज आले नाहींत. त्यांना देहाची शुद्ध नसे ते कोठचें लक्ष्यांत ठेवायला ? लोक ते येईतों बसेनात. त्यांना धुंडून काढतां ते एका भाविक तेलणीच्या घरीं उभ्या उभ्या चतकोर भाकरी खात असलेले आढळले. त्यांना लोकांनीं शास्त्रीबोवांचे घरीं नेले व पाटावर बसविले. माझ्याकडे कबूल करून दुसऱ्याकडे कां जेवलांत असें शास्त्रीबोवांनीं विचारतांच महाराज हंसत म्हणाले, ' सीताराम लबाड, एकाचें खातो अन एकाला गातो ! '

# ३५ हिमाचल मे १९१६ व महाबळेश्वर–मे १९२२.



वनें भूवनें रम्य नानापरीचीं । बरीं शोधिलीं तीं गिरीकंदरींचीं ।
दरे शृंग पाठार मैदान दारीं । कपाटें गव्या वीवरें तीं भुयेरीं ॥
गिरिशृंग पाठार दारीं कपाटें । शिळाशीखरें वृक्ष पाषाण थाटें ।
दरे दर्कुटे थोर भ्यासूरवाणें । बहूतांपरीचे तरू ते पुराणे ॥

—श्रीसमर्थकृत रामायण.

१. नित्य नगरांत राहणाऱ्या व माणसांनीं गजबजून गेलेल्या वस्तींत वावरणाऱ्या मनुष्यास मधूनमधून वनोपवनींचे रम्य देखावे व एकांतस्थळें पाहण्याचे प्रसंग आले तर तो त्यांत पराकाष्ठेचा दंग होऊन जातो. लोकव्यवहार किंचित्काळ तरी विसरून सृष्टिदेवतेच्या सहज लीलांचा निरुपम आनंद भोगतो व सृष्टिकर्त्या कारागिरास निरभिमान होऊन धन्यवाद देतो. एकांत ही अर्धी समाधि आहे. लोकव्यवहार त्रिगुणात्मक आहे, त्याचा त्यास विसर पडून वृत्तिशून्यतेचें शांतिसुख कांहीं काळ भोगावयास सांपडतें. गिरिकंदरें व जलाशयपरिसरें पाहत असतां त्याचा तो आपणास विसरतो व अशी अवाढव्य पण पराकाष्ठेची रम्य सृष्टिरचना करणाऱ्या परमेश्वराच्या स्वरूपांत देहभानविवर्जित होऊन तल्लीन होऊन जातो. अशा प्रकारचें थोडेंफार सुख नारायणानें या जन्मीं दाखविलें आहे. विशीपंचविशींत सह्याद्रिपर्वताच्या कांहीं रांगा, किल्ले व बनें पाहण्यांत आलीं. दोन वेळ गोवे प्रांतीचे रम्य देखावे पाहिले. इ. स. १९१६ सालीं इंदोरचे महाराज श्री. सवाई तुकोजीराव होळकर यांनीं बोलावल्यावरून हिमालयाच्या परिसरांत मसूरीवर २।३ महिने माझें राहणें झालें व गेल्या मे महिन्यांत प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठीं महाबळेश्वरीं मी गेलों. या दोन्ही प्रसंगीं पाहिलेल्या नितांत रमणीय अशा सुंदर सृष्टिवैभवाचें थोडेंसें वर्णन करण्यासाठीं प्रस्तुत लेख लिहीत आहे. हिमाचलाचें वर्णन तेव्हांच मुमूक्षूंत केलें होतें. पण प्रस्तुत दोनही प्रसंगांचें वर्णन एकत्र करीत आहे. हिमाचल आपणापासून दूर आहे. महाबळेश्वराची रम्यता आपल्या प्रिय महाराष्ट्राचें भूषण आहे. येथें आपल्याच लोकांची वस्ती, आपली मराठी भाषाच सर्वत्र प्रचलित, आपल्या इतिहासाशीं हा भूप्रदेश निगडित झालेला इ० कारणांमुळें येथें आपलेपणा अधिक वाटतो. सकाळसंध्याकाळ सृष्टिशोभाजनित सुख भोगावें व दिवसा ऊन खालीं झाल्यावर भक्तिशास्त्रविनोदांत कांहीं काळ घालवावा असा हा महिना फार सुखांत गेला. मसूरीस श्रीमंत महाराज व महाराणी यांनीं ५।७ गीताप्रवचनें ऐकलीं. महाबळेश्वरीं श्रवण आणि कीर्तन या

दोहींचा लाभ झाला. सातारचे ज्ञानेश्वरीभक्त कोंडीबा ऊर्फ दादामहाराज, वांईचे गोभक्त चौंडे महाराज, श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि व श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांचींही कीर्तनें ऐकावयास मिळालीं. उभयतां श्रीमंत आपला मोठेपणा विसरून बाळगोपाळांच्या मेळ्यांत निरभिमानतया सामील होत असत. तेथें 'नारदभक्तिसूत्रें' दहा दिवस सांगण्यांत आलीं. क्षेत्र महाबळेश्वरीं व धोम आणि वाई येथें श्रीकृष्णाबाईच्या स्नानपानांचें सुख मिळालें. अनेक महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांच्या फिरावयास जातांयेतांना भेटी होत. अनेक बैठकीही होत. सकाळसंध्याकाळ 'पाइंटस्' कडे जाण्याच्या जो तो धांदलींत असायचा. असो. प्रथम मसुरी व नंतर महाबळेश्वर याप्रमाणें दोन्हीं स्थानांचें थोडक्यांत वर्णन करूं.

---

## १ हिमाचल—मे १९१६

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः ।
पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्यां इव मानदंडः ॥ १ ॥

२. हें कालिदासानें कुमारसंभवांत हिमालयाचें केलेलें वर्णन सर्वांस श्रुतच आहे. हिमालय हा सर्व पर्वतांचा राजा आहे, हा देवतात्मा आहे, हा पूर्वपश्चिम समुद्राला भिडलेला असून पृथ्वीचा जणूंकाय मानदंडच आहे. हा नगाधिराज आहे हें कांहीं कोणास सांगावयास नको आहे. इंग्लंडांत समुद्राच्या सपाटीपासून सर्वांत उंच असलेला डोंगर फार तर ४ हजार फूट उंचीचा आहे. साऱ्या युरोपखंडांत अत्युच्च पर्वत १२ हजार फुटांवर आहे, पण साऱ्या पृथ्वींत हिमालयाइतका उंच व रमणीय दुसरा पर्वत नाहीं. हा १८ हजार फुटांपासून २९ हजार फुटांपर्यंत उंच आहे. दार्जिलिंगपासून दिसणारें इव्हरेस्ट शिखर २९ हजार फूट आहे. शिवाय हिमालयांच्या रांगाहि अनंत असून त्या शेंकडों मैल दूर पसरलेल्या आहेत. हिमालय हा सर्व पृथ्वींतल्या नगांचा अधिराज आहे, हें त्याचें दर्शन होतांच मनावर ठसतें. भरतखंड ही परमात्म्याची आवडती भूमि आहे यांत शंका नाहीं. आपल्या दक्षिणेंतील सिंहगड, पुरंदर, जरांडा, पन्हाळा, सुधागड, शिवनेर, सप्तशृंगी, त्र्यंबकेश्वर इत्यादि उंच ठिकाणें मीं १५।२० वर्षांपूर्वी पाहिलीं असून सह्याद्रीच्या घांटमाथ्याचा बराच भाग फिरलों आहे. आपला महाराष्ट्र मला माझी जन्मभूमि असल्यामुळें अत्यंत प्रियच आहे. पण हिमालयाच्या सन्निधानांत आल्यावर जो कांहीं परमानंद झाला तो अनिर्वचनीय आहे.

३. हिमालयाला कालिदासानें देवतात्मा म्हटलें आहे तेंहि योग्यच आहे. हिमनगजा पार्वती व तिचा पति महादेव यांच्या वसतीचें हेंच दिव्यस्थान होय.

जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसी ठावो ।
जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥ ज्ञाने० ६–१०२

ही ज्ञानेश्वरमहाराजांची ओवी हिमालयाचें दर्शन होतांच मला आठवली. 'वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ' असा येथें पदोपदीं अनुभव येतो.

ऐसेनि न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी ।
थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ १६९ ॥
हें राज्य वर सांडिजे । मग निवांत तेथेंचि असिजे ।
ऐसें शृंगारियाहि उपजे । देखतखेवों ॥ १६८ ॥

असें पृथ्वीतलें परमपवित्र स्थान कोणतें असेल तर तें हिमालयच होय.

येणोंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्याजिलें ईशानें ।
गुंती जाणोनि श्मशानें । वास केला ॥ ज्ञाने० १३—२५

अशा महेशांचा कैलास हिमाचलावरच आहे. ' हंस ' व ' स्वेन हेडन यांनीं वर्णिलेलें मानससरोवर हिमालयावरच आहे.

' जगद्गुरु महेश्वर प्रभुशिरीं जिचें नांदणें ।
जिन्या जलमळें तुळे न शरदिंदूचें चांदणें ' ॥

—मयूरकेकावलि.

अशा विश्वापावनी गंगामाईचें जन्मस्थान हेंच होय. हरिद्वार, हृषीकेश, बदरीनारायण, इ. क्षेत्रदर्शनांचा आनंद भाविक प्रेमळजन भोगीत असतात. असो. ' मसूरी ' स्थान डेराडूनजवळ १२ मैलांवर शिवालिक पर्वतांच्या शिखरावर साडेसहा हजार फूट उंचीवर आहे. मसूरी, नैनिताल, सिमला व दार्जिलिंग हीं अलीकडील राज्यकर्त्या व श्रीमंत लोकांचीं हवा खाण्याचीं चार ठिकाणें सुप्रसिद्ध आहेत. मसूरी ६॥ हजार, सिमला ७ हजार व दार्जिलिंग ७॥ हजार फूट उंचीवर आहे. दार्जिलिंगपासून हिमाचल ४५ मैलांवर आहे व तेथून इव्हरेस्ट हें अत्युच्च शिखर दिसतें. मसूरीपासून हिमाचल १२० मैलांवर असून बदरीनारायण, गंगोत्री, जम्नोत्री, वगैरे ह्या सर्व भागास केदारखंड असें पुराणांतून म्हटलें आहे.

४. मुंबईस ९ वाजतां नॉर्दर्न एक्सप्रेसनें मी निघालों तों सुरत, बडोदा, रतलाम, कोटा, मथुरा, दिल्ली व सहारानपूर या मार्गानें तिसरे दिवशीं सकाळीं ११ वाजतां हरिद्वार व हृषीकेश यांजवळून वाहणाऱ्या गंगामाईचें दिव्य दर्शन घेत घेत डेराडूनला येऊन पोंचलों. तेथून राजपूर ७ मैलांवर आहे व तेथपर्यंत मोटार व टांगे चालतात. पुढें डिंडयांत बसून अगर घोडयावर स्वार होऊन वर जावें लागतें. म्हणजे शनवारीं रात्रीं मुंबईहून निघालेला मनुष्य वाटेंत कोठें न थांबतां तडक आला तर सोमवारी सायंकाळीं मसूरीवर येतो. मसूरी गांव

शिवालिक पर्वताच्या मध्यावर व शिखरावर वसलेला असून खालीं दक्षिणेकडे डेराडून ( डून ह्म. व्हॅली ) चें अफाट व रमणीय खोरें आणि उत्तरेकडे पर्वतामागें पर्वत अशा अनेक उंच उंच रांगा असून त्यांच्यामागें खुद्द हिमालय म्ह० बर्फानें आच्छादिलेला असा नितांतरमणीय भाग शेंकडों मैल एकसारखा पसरलेला दिसतो ! हें केदारखंड पुराणेतिहासप्रसिद्ध आहे. रावणवधानंतर रामराय लक्ष्मणासमवेत येथेंच तपश्चर्येसाठीं आले होते. पांच पांडव खास हिमाचलावर याच महापथानें जाऊन देहत्याग करिते झाले. ह्या भागांत ठिक ठिकाणीं वास करीत करीत ते उत्तरेकडे खास हिमालयावर जाऊन कैलासवासी झाले. खुद्द डेरा गांवांत शिखांच्या उदासी पंथाचे पूज्य महात्मे गुरु रामराय याचें समाधिमंदिर असून उदासीपंथाचें हें महाक्षेत्र आहे व उदासी लोक यालाच गुरुद्वार म्हणतात.

५. या प्रांतांतील पहाडी लोक फार कंटक, साधे व अत्यंत प्रामाणिक आहेत. चोरी करणें, फार काय, पण वाटेंत पडलेला कोणताही पदार्थ उचलून नेणें त्यांच्या कधीं मनांतही येत नाहीं. चोरी त्यांना माहीतच नाहीं ! त्यांना दिंडीला लावून आपण दिंडीत बसणें मनुष्याच्या जीवावर येतें. पुण्यामुंबईसारख्या शहरांत राहून कंटकपणाशीं पारखे झालेल्या लोकांना त्याशिवाय गत्यंतर नाहीं. चार सहा लोक दिंडी खांद्यावर आणतात. वर आल्यावर शेंकडों बंगले इतस्ततः पसरलेले दिसतात. पर्वतावर देवदार, आक्रोड, जरदाळु वगैरे वृक्षांच्या गर्द वनराजींतून हिंडण्यासाठीं सडका बांधल्या आहेत. कपुर्थळ्याचे महाराजांचा एक व नेपाळच्या माजी प्रधानांचा एक असे दोन भव्य राजवाडे येथें असून बहुतेक वस्ती युरोपियन लोकांची आहे. येथें युरोपियनांची अनेक मोठमोठालीं दुकानें, हॉटेलें, शाळा, टेनिसकोर्टस, लायब्ररी, पोलिसांचीं गेटें, बाजार वगैरे असून मसूरी हें एक शहरच वसलेलें आहे. येथील हवा अत्यंत निरोगी व थंडगार असून रोगराई सहसा कधीं उद्भवत नाहीं. पाणी मात्र जड असून अन्नपचनाला कठिण जातें. महागाई मनस्वी आहे. तुरीची डाळ येथें शिजत नाहीं. येथें मसुरीची डाळ मिळते. शिजते व पचते म्हणून ह्या स्थानाला मसूरी म्हणतात, असें कित्येकांचें म्हणणें आहे ! येथें युरोपियनांच्या वस्तीस प्रारंभ इ. स. १८३० पासून झाला. इ. स. १८५३ मध्यें रणजितसिंगाचे पुत्र महाराज धुलिपसिंग येथें कांहीं दिवस होते. येथील सर्वांत उंचशिखर साडेसात हजार फुटांवर असून तेथें जुनी ऑब्झरव्हेटरी आहे. येथें मुख्य बाजार लँडोर बाजार हा असून येथें व इतरत्रही कांहीं एतद्देशीयांचीं दुकानें आहेत. जपानी मालाचें एक भव्य दुकान येथें आपल्याच लोकांनीं चालविलें आहे.

६. येथें रोज ७।८ मैल फिरून आल्याशिवाय अन्नपचन होत नाहीं. सकाळीं ४ मैल व संध्याकाळीं ४ मैल फिरून येणें अत्यवश्य आहे. सर्वच भाग चढउताराचा असल्यामुळें अनेक दऱ्या, खोरी व पहाड चढउतार करतांना दिसून वेगवेगळे सृष्टिसौंदर्याचे नयनमनोहर देखावे दिसतात, तेव्हां चित्ताला परमाल्हाद होतो. वाटेंतून दुतर्फा अनेक प्रकारच्या वनस्पति, फुलें, फळें, उंच उंच वृक्ष, मधून मधून किलबिलणाऱ्या विविध पक्ष्यांचे आवाज व नजर फेंकावी तिकडील भव्य देखावे यामुळें आपण मनुष्यलोकीं नसून दिव्य अशा स्वर्गलोकांतच आहों असें वाटतें! येथें खडकी नांवाच्या वृक्षाचीं शेवग्याच्या फुलांसारखीं पण सुगंधी फुलें विपुल असून त्यांचा केल्यास सुगंधी तेलाकडे व अत्तराकडे उपयोग होण्याचा संभव आहे. येथें पर्वतावर धुकें व ढग वगैरे नेहमीं असल्यामुळें स्वच्छ सूर्य--प्रकाश पाहण्याचा योग थोडे वेळ येतो. परवां एके दिवशीं ढग पसरत पसरत इतके पसरले कीं, जवळचीं घरें व वृक्ष दिसेनासे झाले, व मेघगर्जनांचा गडगडाट होऊन पर्जन्यवृष्टि झाली आणि लगेच कांहीं वेळानें आकाश इतकें स्वच्छ व निरभ्र झालें कीं सर्व देखाव्यांना कांहीं वेगळीच शोभा प्राप्त झाली व ज्याची आम्हीं अत्यंत आतुरतेनें वाट पाहात होतों त्या नगाधिराजांचें दिव्य दर्शन झालें. आम्हीं येथील सर्वांत उंच पर्वतावर गेलों व तेथून अनेक पर्वतांच्या रांगा मागे असलेल्या गगनचुंबित हिमनगाचीं बर्फानें आच्छादलेलीं पांढरीं शुभ्र शिखरें व नंतर क्रमाक्रमानें त्याच्या छातीवरचा भाग अनेक मैल सारखा पसरलेला पाहून आमच्या डोळ्यांचीं पारणीं फिटलीं!! अहाहा! काय तो परमरम्य देखावा व काय त्या चित्तांत उत्पन्न झालेल्या सुखलहरी! त्या आनंदाचें वर्णन करण्यास कालिदासाचीच स्फूर्ति पाहिजे. आम्हांसारख्या सामान्य मनुष्यास त्या सुखोर्मींचा अनुभव येतो, पण त्या अनुभवाला वाचा फुटत नाहीं. आम्ही मुके आहोंत, कवि बोलतात. 'निराळीं' म्ह० हृदयाकाशांत ज्या गोष्टी चालतात त्यांना कवींच्या रसनेवर पल्लव फुटतात. कृष्णार्जुनांचा संवाद किती थोडया शब्दांत किंबहुना निःशब्द स्थितींत झाला असेल, पण त्याला व्यासांच्या वाणीचा उद्गार मिळाल्यामुळें आपणांस भगवद्गीता मिळाली.

कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली जे निराळीं । ते श्रीव्यासें केलीं । करतळीं घेवो ये ऐसी' (ज्ञानेश्वरी अ० १८) येथें ज्ञानोबारायांनीं 'निराळी गोठी चावळिली' म्हणून जें म्हटलें आहे किंवा शेक्सपीअरनें 'airy nothing' ला कवि नामरूप देऊन वर्णितो म्हणून जें म्हटलें आहे, तेंही आम्हांस स्पष्ट करून सांगतां येत नाहीं. असो. स्पष्ट सूर्यप्रकाशांत हिमालयाचें शिखर व त्या खालचा बराच भाग रजताच्या मुकुटासारखा चकाकत होता, किंवा सर्वच हिमाचल रजताच्या भिंतीसारखा शुभ्र दिसत होता. चंद्रप्रभेप्रमाणें

पांडुर असे ते हिमाचलाचे भाग व त्यांवर मधूनमधून पडणारी श्यामवर्ण छाया यांचें सौंदर्य कोणी कवीनें समक्ष पाहून साधल्यास वर्णन करावें. सूर्यास्तसमयीं संध्याराग--सुरंजित अशा त्या हिमाचलाच्या गगनभेदी भिंती पाहून चांदीच्या प्रचंड तबकावर सुवर्णाची नक्षी केल्यासारखें वाटे. असा रम्य देखावा इकडे-ही नेहमीं दिसतो असें नाहीं. बा हिमाचला ! आमचे अघाचल तुझ्याहून उंच नसतील तर त्यांना आपल्या पोटांत जागा देऊन तुझ्या ह्या शुद्धसत्वगुणी बहिरंगाप्रमाणें आमचें अंतरंग विमल कर. आमचे अघाचल तुझ्याहून उंच असतील तर तुझा आश्रय करणाऱ्या त्या कैलासपति शंकराच्या मस्तकावरून खालीं पडणाऱ्या व आपला प्रियपति जो रत्नाकर त्याच्या भेटीसाठीं उत्कंठेनें धांवत जाणाऱ्या शरदिंदुसहचरी गंगामाईच्या विश्वपावनी प्रवाहाबरोबर त्यांना सोडून दे, ह्मणजे गंगामाई त्यांना स्वसामर्थ्यानें लघु लघु करीत समुद्राच्या विशाल उदरांत तरी नेऊन सोडील. हिमनगराज ! किती तपस्वी, योगी, व महंत तुझ्या चरणापाशीं, तुझ्या अंकावर, किंवा तुझ्या मस्तकावर बसून दिक्कालाद्यवच्छेदांची तमा न बाळगतां शिवपार्वतीच्या ध्यानांत निमग्न होऊन बसले असतील ! हिमाचला ! त्यांपैकीं एखादा तरी महात्मा भरतखण्डावर सोडून दे, म्हणजे त्याच्या योगानें स्वधर्मसूर्याचा प्रकाश जगतीतलावर पडेल ! हिमनगराया ! तूं स्वतः इतका शुद्धिसंपन्न असावास व तुझ्या पायातळीं बस-लेले भारतीय लोक रजतमाच्या कृष्णछायेनें व्यापून असावेत हें तुला शोभतें काय ? थोर लोक आश्रितांचा परामर्ष असाच घेतात काय ? बापा ! तुझ्या निकट परमशांतीचे एवढें अफाट साम्राज्य पसरलेलें असतांना भारतीयांचीं हृदयें मत्सरद्वेषनिंदाकलह यांच्या कांटयांनीं इतकीं विदीर्ण होऊन जावीं याबद्दल तुला त्यांची दया येत नाहीं काय ? श्रीशंकरा ! तुम्ही ह्या परमपावन हिमा-चलाचा आश्रय करून बसलांत ते असेच चिरकाल बसा, पण आपले कांहीं गण भारतीयांची धर्मोन्नति करण्यासाठीं खालीं कां बरें धाडीत नाहीं ? ह्या गंगामाईला—ह्या यमुनामाईला आह्मां भारतीयांची चित्तवृत्ति पावन करितां येत नाहीं काय ? असें कसें बरें होईल ? हिमाचल जिचा पिता, रत्नाकर जिचा स्वामी, ती आमची गंगामाईः——

श्रुतीनां सर्वस्वं सुकृतमथ मूर्तं सुमनसां । सुधासौदर्यं ते सलिलमशिवं नःशमयतु ॥

असें जगन्नाथपंडितांनीं म्हटल्याप्रमाणें अनंतकालपर्यंत लक्षावधि जीवांना पावन करण्यास परमसमर्थ आहे. हिमाचला ! गंगा, यमुना, सिंधू, ब्रह्मपुत्रा ह्या चार कन्यकांनीं आम्हां भारतीयांवर जे अनंत उपकार केले आहेत, त्यांच्या मानानें थोर सम्राटाचे उपकार हे कांहींच नाहींत. हिमराया ! तूं आमच्या परमप्रिय भरतभूमीला पावन केलें आहेस, तिला शोभा आणली आहेस. आमच्या चित्तवृत्ति तुझ्या रूपाप्रमाणें सात्त्विक कर, आमच्या हृदयांत

तुझ्या चरणीं लोळत असलेलें शांतीचें साम्राज्य स्थापित कर. धर्मप्रीति न्यायनीति, सदाचार, सत्यनिष्ठा ह्या गुणांना बरोबर घेऊन तुझ्याकडे आलेल्या पांडवांना परत आह्मांकडे पाठवून दे ह्मणजे भक्तसहकारी भगवान् श्रीकृष्ण त्यांन्यासाठीं धांवत येऊन आह्मात मिसळतील व भरतभूला वैकुंठ बनवतील ! तुझ्या चरणीं माझे सहस्र प्रणाम असोत !

७. मी मसूरी येथें ता. १७ एप्रिल रोजीं येऊन दाखल झालों, तो ता. १७ जुलैपर्यंत ह्मणजे बरोबर तीन महिने हिमालयाच्या उत्संगावर स्वैच्छ विहार करण्याचा योग पांडुरंगानें आणल्याबद्दल मी त्याचें सप्रेमभरित अंतः-करणानें स्मरण करितों. खचितच हिमाचल हा परमेश्वरी विभूति आहे, असें या भागांत कोठेंहि चारदोन आठवडे आनंदानें घालविण्यास आलेल्या कोणा-ही रसिकास वाटल्यावांचून राहणार नाहीं. ‘सुजलां सुफलां’ इ० प्रकारें सर्वमान्य झालेल्या ‘वंदे मातरम्’ ह्या सुंदर पदांत भरतभूचें जें मनोरम वर्णन केलें आहे तें हिमाचलाचा हा परिसर व गंगायमुनांचे हे चित्तहारि देखावे प्रत्यक्ष पाहिल्यानें जसें मनावर बिंबतें तसें दुसरें कशानेंहि बिंबणार नाहीं. वृक्षराजींच्या घनदाट छाया, नानाविध पक्षिगणांचे रम्य किलकिलाट व त्यांच्या विविधरंग आकृति, गंगायमुनांचे प्रशस्त प्रवाह, त्यांचीं सुंदर वळणें, त्यांचे कालवे व त्याना आपलें सर्वस्व दान करणारे अनंत ‘वहाळ-वोहळ’ गगनचुंबित अनंत पर्वतश्रेणी व त्यांमधील दऱ्या, खोरीं, गुहा इत्यादि शेंकडों प्रकारांमुळें हा भाग इतका रमणीय आहे कीं, त्याचें सुख अनुभवाशिवाय कळणारें नाही. येथील शोभेचें व तद्दर्शनजनित आनंदाचें दिग्दर्शन केलेंच आहे. रोज फिरायला बाहेर पडलें म्हणजे सृष्टिदेवता आपलें स्वरूप अधिकाधिक रम्य व उदात्त असें दाखवीत आहेसें वाटतें. देखावे तेच ते असले तरीही आनंद नवा नवा व ताजा असतो. फुलें व फळें यांचे प्रकार येथें असंख्य आहेत. अक्रोड, चिलगोजे, स्टॉबेरी ह्मणजे इष्टापुरी, लुकाट, गूजबेरी, चेस्टनटस्, अंचु, सेवफळ, नाषपाती, लीची, पिकलेलीं जरदाळू, आडू, शेतून इ० अनेक प्रकारचीं फळें खुद्द मसूरीवर होतात व मिळतात. फुलांचे विविध रंग पाहून ईश्वराच्या अनंत गुणांपैकीं तो ड्राइंग पेंटर किती अतुल आहे याचें कौतुक वाटतें. कोकिलेचा आवाज तर येथें सारखा ऐकूं येत असतो. येथें कोकिळा विपुल आहेत. त्यांचा रंग कावळ्या-सारखाच असतो पण त्या आकारानें लहान असतात.

८. एके दिवशीं रात्रीं पाऊस पडल्यामुळें प्रभातींच सुंदर मोत्यांचे दागिने अंगावर घातलेल्या वृक्षवेलींचें रम्य दर्शनसुख भोगीत आम्ही ९ चे सुमारास बरेंच लांब हिंडत हिंडत खालच्या एका दरीजवळ गेलों. शेजारींच एक भव्य ऋषिगुहा दिसली, मात्र ऋषि कोणी आंत दिसले नाहींत. जवळपास मनुष्य

वस्ती वाढल्यामुळें ते दूर गेले असावेत. 'पलीकडे पर्वतांच्या पोटांतून मुक्तेश्वरांनीं ह्मटल्याप्रमाणें 'माजी निर्झरोदकांचे पाट । सैरावैरा धांवती!' हा देखावा पाहतांच आम्ही आनंदानें उंचीवरून खालीं सतत एका धारेनें पडणाऱ्या एका झऱ्याकडे धांवलों. चहूंबाजूंनीं गर्द झाडी व मध्येंच हे सतत वाहणारे शुभ्र झरे पाहतांच हे झरे नसून चरणांशीं लागलेल्या वसुंधरेच्या गळयांत पर्वतराजानें प्रेमानें घातलेले हे मौक्तिकांचे हारच आहेत असें आम्हांस वाटलें! झऱ्याचें पाणी पाहून हात पाय तोंड स्वच्छ धुवून आम्ही तें पाणी पोटभर प्यालों. कोठें हा जीवंत पाण्याचा रम्य झरा व कोठें तें पुण्यामुंबईकडलें तोटीचें पाणी!! दोहींचें नांवें मात्र पाणी, बाकी रंगारूपांत व गोडींत तुलनाच करितां नये इतकें अंतर! रंभा व कुब्जा दोन्ही स्त्रियाच, हिरा व कोळसा दोन्ही कार्बनच, संत व पामर दोघे माणसेंच—पण जशीं तीं तसेंच हें!

९. **हरिद्वार**—असो. दशाहरांत हरिद्वाराला जाऊन गंगास्नान करावें म्हणून आम्हीं मसूरीहून एका शनिवारीं दुपारीं १ वाजतां येथून दिंडींतून निघालों, ५ वाजतां पायथ्यापशीं राजपुराला जाऊन पोंचलों व लगेच मोटारमधून डेराडूनला गेलों व तेथें प्रो. नंदलाल यांचे घरीं क्षणभर बसलों. नंतर दीड तास मोटारनें सर्व डेराडून पाहून घेतलें. डेराडून गांव फारच थंड, हवाशीर, वृक्षच्छायामंडित व उपवनशोभित असें रम्यस्थान आहे. वस्ती ५० हजार आहे. येथें All-India Forest Research Institute असून इंपीरियल कॅडेट कोरचें हें ठिकाण आहे. येथें शिखांचें उदासीपंथाचें प्रशस्त मंदिर आहे तें आम्हीं पाहिलें. त्यांत नानकापासून १० वे पुरुष रामदास उदासी यांची समाधि आहे. मंदिरासमोर एक बराच विस्तीर्ण जलाशय असून त्यांत सोनेरी मासे आहेत. गांवांत घरें बहुधा एकमजली आहेत. पण तीं मजबूत असून सभोंवारच्या सुंदर आवारांत फलपुष्पांची दाटी असते. रात्रीं डेराडूनहून निघालों तों मध्यरात्रीं हरिद्वार येथें आलों व श्रीमती अहल्यादेवीच्या मठांत उतरलों. तेथें तीन दिवस आमची व्यवस्था उत्तम राहिली. अहल्यामठ हा कुशावर्ततीर्थ म्हणून गंगेच्या ज्या प्रवाहाला म्हणतात त्या तीर्थाच्या कांठींच बांधलेला आहे. श्रीगंगोदकाचें पान व भोजन करून रात्रीं आम्ही निजलों. उशाशीं असलेल्या मोठाल्या खिडक्यांतून श्रीगंगेचें पात्र दिसत होतें. तिच्या प्रवाहाचा मधुर निनाद कानांवर पडून अन्य विचारांस विस्मृति पाडीत होता. गंगातीरीं आल्याचा उल्हास चित्तवृत्ति प्रसन्न करीत होता. अशा सुखमय स्थितींत सुंदर झोंप लागली. पहाटे ५॥ वाजतां नेत्र उघडून पाहिलें तों गंगामाईचें प्रथम दर्शन झालें. गंगालहरीचे चार दोन श्लोक स्मरलें तसें म्हणतच "तुझ्या तीरीं नीरीं हृदय रमतें दुःख

शमतें । यशोगानें पानें कुमत गळतें ·विघ्न टळतें. " इत्यादि गंगावर्णनपर मोरोपंती आर्या व श्लोक मनाशींच गुणगुणत गंगामाईच्या सुधासौंदर्याचें पान करीत घटकाभर पडलों होतों. नंतर ब्रम्हकुंडावर आम्हीं स्नान केलें. गंगास्नानाचा पहिला दिवस तो मला अत्यंत भाग्याचा वाटला ! ब्रह्मकुंडांत हातभर लांबीचे मासे रगड आहेत. दुपारीं हरिद्वार येथील सनातनधर्मीयांची ऋषिकुल ही संस्था व आर्यसमाजी लोकांची गुरुकुलसंस्था ह्या दोन्ही आम्हीं सावकाशीनें पाहिल्या. दोन्ही संस्था आपल्या परीनें चांगलें लोकशिक्षणाचें काम करीत आहेत. माझा ऋषिकुलाकडे अधिक ओढा आहे व आर्यसमाजाचीं धर्मतत्वें हीं मला मान्य नाहींत. तरी गुरुकुलाची एकंदरींत व्यवस्था पाहून व त्याचे चालक व संस्थापक लाला मुनसीराम यांचे पोक्त, करारीपणाचें व भव्य वर्तन पाहून मनाला फारच समाधान झालें. गुरुकुलांत लहान मोठे ३०० विद्यार्थी असून १४ प्रोफेसर व शिक्षक आहेत. संस्था नमुनेदार आहे यांत शंका नाहीं. ऋषिकुलाला इकडील धर्मशील राजेमहाराजे यांचें पाठबळ आहे व गुरुकुल उत्साही आर्यसमाजी पुढाऱ्यांच्या व विशेषतः प्रि. मुनसीराम यांच्या परिश्रमानें चाललें आहे. आम्हीं गुरुकुलांत एक रात्र घालविली. सायंकाळीं नौकांत बसून बराच वेळ हरिद्वारीं गंगाबाईच्या उत्संगावर यथेच्छ जलविहार केला व स्नानही केलें. अपार आनंद झाला. गंगा–दर्शनस्नानपानांत चित्ताला अपार आनंद व चित्तशुद्धि वाटते. हरिद्वारीं गंगातीरीं तीन रात्री काढून आम्ही परत मसूरीस आलों. येथें जून ता. ८ ते ११ पर्यंत १२ इंच पाऊस झाला. सायंकाळीं आकाशांत जे विविध रंग उद्भवतात, जे अनंत रम्य देखावे क्षणोक्षणीं बदलणारे दिसतात, त्यांची शोभा अनुपम आहे. येथील एका उंच पर्वतावरून आम्हांला दशाहारांत बदरीनारायण, जम्नोत्री व गंगोत्री या पर्वतांचें उत्कृष्ट दर्शन झालें.

१०. मसूरीस असतांना श्रीतुकाराममहाराजांचें चरित्र अभंग वृत्तांत गावें अशी इच्छा होऊन मी ‘ श्रीतुकारामचरित्रामृत ’ एक हजार चरणांत गाइलें. तें दोन वर्षांपूर्वीं ( शके १८४२ ) प्रसिद्धही केलें आहे. त्याच्या उपसंहारांत हिमाचलाचें वर्णन केलें तेवढें येथें देतों. एका अभंगांत हिमाचलाला योगी म्हणून व दुसऱ्यांत भक्त म्हणून त्याचें वर्णन केलें आहे. पुस्तकाचे अभंग १०१ आहेत.

९९

हिमाचलावरी झालें माझें येणें । देवाजीचें देणें पावलों मी ॥ १ ॥
हिमनग श्रेष्ठ हरीची विभूती । पाहिली म्यां प्रीती दैवयोगें ॥ २ ॥
तपालागीं जणों बैसला निश्चळ । निवांत निर्मळ योगिराज ॥ ३ ॥
शुद्ध हा गंभीर आपादमस्तक । देव या हस्तक जोडिताती ॥ ४ ॥

गळां रत्नहार झळके रम्य भारी । गिरि जयाद्वारीं भालदार ॥ ५ ॥
माध्यान्हीं मस्तकीं हिऱ्यांचा मुकुट । शोभतो विराट तनूवरी ॥ ६ ॥
पांडित्य सांडोनी बालभाव दावी । योगियां गोसावी हिमराज ॥ ७ ॥
क्षणक्षणा बाह्य पालटती रंग । अंतरंगा भंग नाहीं नाहीं ॥ ८ ॥
कामक्रोधादिक दानवांचा स्पर्श । नसे, हा आदर्श ज्ञानियांचा ॥ ९ ॥
कर्मज्ञानभक्तिवैराग्यें आथिला । तनू ही शीतला अंतर्बाह्य ॥ १० ॥
किती जपी तपी सन्मुनी निःसंगीं । याचिया उत्संगीं तपताती ॥ ११ ॥
याचिया प्रसादें तरले सन्मुनी । पहावा जन्मुनी हाचि एक ॥ १२ ॥
याच्या संन्निधानीं याच्या साक्षित्वेसी । मति या अभंगासी प्रसवली ॥ १३ ॥

१००

हा हो गर्भें भक्त प्रेमसुधासिंधु । हृदयीं अमृतबिंदु स्त्रवले जे ॥ १ ॥
ते हे गंगायमुना सिंधु ब्रह्मपुत्रा । मुखविती धरा प्रवाहें हो ॥ २ ॥
यांनीं लोकां दिलें तें कवणींही नाहीं । सम्राटादिकांहीं देववेना ॥ ३ ॥
सदा सर्वां देती धनधान्यसमृद्धी । सर्व रिद्धिसिद्धी यांच्या ठायीं ॥ ४ ॥
यांचिया उदकें सुरम्यें पावनें । वनें उपवनें फुल्ल होती ॥ ५ ॥
वृक्षवल्ली नाना फळपुष्पसंकीर्ण । पशुपक्षीगण ठायीं ठायीं ॥ ६ ॥
यांचिया दर्शनें स्पर्शनें सेवनें । स्नानेंपानें मनें तुष्ट झालों ॥ ७ ॥
देवलोकीं आलों स्वेच्छ संचरलों । बहु सुखावलों तीन मास ॥ ८ ॥
केदारखंड या म्हणती पुराणीं । येथ माझी वाणी प्रस्फुरली ॥ ९ ॥

---

## २ महाबळेश्वर–मे १९२२.



११. महाराष्ट्रांतलें थंड हवेचें मुख्य स्थान म्हणजे महाबळेश्वर हें होय. हें सह्याद्रिपर्वताच्या शिखरावर आहे. धौम पायथ्याशीं असून महाबळेश्वर माथ्यावर आहे. हें अनादि क्षेत्र असून सुप्रसिद्ध आहे. अर्वाचीनांस हें थंड हवेचें ठिकाण म्हणूनच माहीत आहे. मी १९२२ च्या मे महिन्यांत महाबळेश्वरीं प्रथम गेलों व सबंध मे महिना तेथें ह. भ. प. बाळकृष्णबोवा चौंडे वाईकर यांच्या व इतर प्रेमळांच्या संगतीनें फार सुखांत काढला. प्रकृति सुधारण्यासाठीं म्हणून मुख्यतः गेलों व तेथील हवापाण्यानें ती पुष्कळ सुधारली. समुद्राच्या सपाटीपासून हें स्थान ४५०० फूट उंचीवर आहे. येथील पाण्यांत लोह आहे व म्हणून तें शक्तिवर्धक आहे. येथेंहि सकाळ-संध्याकाळ ८।१० मैल फिरून आलें तरच अन्नपचन होतें व चांगली भूक लागते. नवीन वस्ती

ज्या भागांत आहे त्या भागास आपले लोक नहर म्हणतात. पण सरकारी-रीत्या अगर सामान्य समजूतीनें तेंच महाबळेश्वर समजलें जातें. तेथून जुनें महाबळेश्वर चार मैलांवर आहे तेंच क्षेत्र महाबळेश्वर होय. तेथें श्रीशंकराचें प्राचीन देवालय असून जवळच श्रीकृष्णादि पंचगंगांचा उगम आहे. हिंदुस्थानांतल्या उत्तरेस हिमालय व दक्षिणेंत निलगिरी यांचे दरम्यान सर्वांत उच्च स्थान म्हणजे हेंच होय. येथील सर्वांत उंच टेंकडी सिंदीला टेंकडी ही मिरजकरांच्या बंगल्याजवळ ४७०० फुटावर आहे. पर्वतावरील सर्वच भाग थोडाफार उंचसखल असून दृष्टि जाईल तिकडे रम्य हिरवीगार झाडी दिसते. वाईपासून थेटपर्यंत रस्ता आहे. पूर्वेस वाई तालुका, दक्षिणेस जावळी प्रांत, उत्तरेस भोर संस्थानचा प्रांत असून पश्चिमेस रडतोंडीचा घाट, कोयनाखोरें व पुढें लगेच तळकोकण सुरू आहे. पुण्याहून महाबळेश्वरीं जाणारास कात्रजचा घाट व खांबटकीचा घाट ओलांडून वाईस यावें लागतें व तेथून पसरणीचा घाट सुरू होतो. हीच महाबळेश्वरची चढण होय. वाईपासून नहर २० मैल आहे. पसरणीचा घाट चढून आल्यावर पंचगणी लागते व तेथून १२ मैलांवर नहर आहे. नहर येथील मुख्य वस्ती मालकम पेठेच्या भोंवतीं आहे. पंचगणीपासून दोहों बाजूंस कृष्णा व वेण्या यांचीं खोरीं लागतात. महाबळेश्वरीं जमीन सर्वत्र तांबडी, भगवी किंवा हुरमुजी रंगाची आहे. येथें राहणारांचे कपडे सहजच भगवे होतात. समर्थ रामदासस्वामींची वस्ती जुन्या महाबळेश्वरीं व पलीकडील ब्रह्मारण्यांत कांहीं काळ होती व तेथें कृष्णाबाईच्या उगमावर त्यांनीं बांधलेलें मारुतीचें देऊळहि आहे. जावळी प्रांतात प्रतापगडच्या सन्निध अफजुलखान व शिवाजी यांच्या भेटीचें कारस्थान चाललें असतां समर्थ तेथून ६ मैलांवर असलेल्या क्षेत्र महाबळेश्वरीं कीर्तनें करीत होते ! सदर कारस्थानांत समर्थांनीं शिवरायास कोणतें साह्य केलें याची यथार्थ माहिती त्या गुरुशिष्यांसच असणार ! या प्रांतांत राहणाऱ्या समर्थांच्या लंगोटीचा, छाटीचा व कफनीचा रंग येथील मातीमुळें सहजच भगवा झाला होता, व त्याचीच खूण म्हणून समर्थसंप्रदायाचें व मराठी राज्याचें निशाण भगवें झालें असावें असें मला येथें आल्यावर वाटलें !

१२. येथें वेणाखोऱ्यांत बटाटे, कोबी, नवलकोल वगैरे भाज्या चांगल्या तयार होत असून येथील तांबडे बटाटे तर सर्वत्रच प्रसिद्ध आहेत. बटाटे मोठाले असून शिजले ह्मणजे फार नरम होतात व फार रुचकर लागतात. येथें फळें फार होत नाहींत. स्ट्रॉबेरी ( इष्टापुरी ), रॉसबेरी व जांभळें मात्र येथें होतात. जांभूळ, उंबर, रामाठा, गेळा व पिसा हीं येथील मुख्य झाडें होत. जांभळें लहान पण स्वादिष्ट असतात. हीं डायबेटिस व क्षय यांवर गुणकर आहेत असें सांगतात. जांभळीचीं झाडें अतोनात असून फळांचा झाडाखालीं नुसता सडा

पडतो. पिशाचीं पानें पौष्टिक असल्यामुळें पुष्कळ लोक रोज जातां येतां ४।२ पानें खातात. तीं गिळगिळीत लागतात, पण त्यांच्या गुणांकडे लक्ष देऊन लोक तीं खातात. वाळलेल्या पानांचें चूर्ण करून तें दुधांतून मुलांस दिल्यास तें फार मानवतें. येथें कांहीं विलायती फुलझाडें व ओकवृक्षही दिसतात. नेवाळीचीं किंवा कुसरीचीं झाडें अतिशय आहेत. येथील मध मात्र सर्वोत्कृष्ट असतो. अखरा नांवाची कांटेरी वनस्पति येथें विपुल आहे. तिच्या फुलांपासून मध काढतात. तो शुभ्र व स्वादिष्ट असतो. जांभळीच्या फुलांचा मध तांबूस व उष्ण असतो. येथें सांबर, रानडुकरें, वाघ, अस्वल, तरस, चितै वगैरे जनावरें, घोर अरण्यांतून पुष्कळ असतात. वाघाच्या भयानें लोक रात्रीं ८ च्या पूर्वीच फिरून घरीं परत येतात. वाघांच्या तावडींतून जंगलांत शिरलेली गाय परत हातीं लागणें मोठया मुष्किलीचें आहे ! पक्षी फारच कमी आहेत. कावळे क्वचित दिसतात. चिमणी तर पहायलाही मिळत नाहीं ! कृष्णादि नद्यांचें पाणी पहाडांतून खेळत असल्यामुळें व जिकडे तिकडे हिरव्यागार सच्छाय वृक्षांचीं दाटें पसरलीं असल्यामुळें हवा थंड आहे. हवेंत स्निग्धता आहे. येथें अतिशय फिरूनही थकवा येत नाहीं, उत्साह वाटतो व सकाळसंध्याकाळ अधिकाधिक फिरावेंसेंच वाटतें ! देश व कोंकण येथील हवेचे उत्तम गुण तेवढे या भागानें घेतले आहेत. मावळांतील सर्दी व कोकणांतील रखरखित उष्णता येथील हवेंत नाहीं. येथें साधारण वार्षिक उष्णता मान ६५° ते ७०° आहे. पावसाचें पाणी सर्व बाजूंनीं खालीं वाहून जात असल्यामुळें येथील हवेंत दमटपणा नाहीं व मलेरियादि रोग येथें उत्पन्नच होत नाहींत. पावसाळ्यांत राहणें मात्र तितकें हितावह नाहीं. येथें पावसाची सरासरी २७० ते ३०० इंच इतकी आहे, पण पंचगणीला ती सारी ५० आहे. येथील हवेंत सामान्यतः शोषकता असल्यामुळें सर्दी नाहीं. पित्त जागृत असल्यामुळें अग्निमांद्य येत नाहीं, पचन चांगलें होऊन रक्तशुद्धि होते.

१३. हवापाण्यापेक्षांहि येथील चमत्कृतिजनक रम्य सृष्टिसौन्दर्याचे देखावे अधिक चित्तवेधक आहेत. जेथून असे देखावे मनांत अधिक भरतात त्या पहाडाच्या टोंकास ' पाइंट ' असें म्हणतात. 'आज कोणता पाइंट पहाण्यास गेला होतां ' असा हरएक दुसऱ्यास प्रश्न करीत असतो. लोकवस्तीचा मुख्य भाग जी मालकम पेठ तेथून महाबळेश्वर पर्वताचीं चौफेर खोऱ्यांत पसरलेलीं जीं टोकें त्यांना पाइंटस म्हणतात. असे मुख्य पॉइंटस येणें प्रमाणेः–मुंबई पाइंट, कार्नाक पाइंट, फाकलंड पाइंट, लाडविक अथवा सिडने पाइंट, एल्फिन्स्टन पाइंट, आर्थर पाइंट व केट पाइंट. पहिले तीन पश्चिमेस कोयना नदीच्या खोऱ्यानें आहेत. मुंबई पाइंट समोर प्रतापगडचा भव्य व इतिहासप्रसिद्ध किल्ला दिसतो व सायंकाळीं त्याच्या पश्चिमेस सूर्यनारायण अस्तास जात असतांना जीं भिन्न

भिन्न रूपें दाखवितो तीं पाहत असतांना चित्तावर नानाविध तरंग उद्भवतात. त्याची ती मुकुटाकृति, तो टोपीचा आकार, तो पालथ्या घातलेल्या चरवीचा आकार, तो पारशी टोपीचा आकार, तो तप्त सुवर्णाकृति पत्र्याचा लांबट आकार हे पंधरा मिनिटांत एकामागें एक बदलत जाणारे आकार पाहून मन गंभीर विचारांत गर्क होऊन जातें. मुंबई पाइंटवरून समोर प्रतापगडच्या पाठीमागें अस्तास जाणाऱ्या सूर्यनारायणाकडे पाहतांना मराठी साम्राज्याचा उदय, मध्यान्ह व अस्त यांचा चित्रपट चित्तावर उमटतो व प्रतापगडच्या भवानीच्या मंदिरांतील शिखरास पाहून भवानी, शिवराय, समर्थ व मधील जावळीच्या खोऱ्यांतील चंद्रराव मोरे यांचें स्मरण व अफझुलखानाच्या थडग्याचें टोंक यांचें दर्शन स्मरण होऊन मनांत स्वाभिमानाचें स्फुरण होतें तोंच पाठीमागें उंच टेकडीवर असलेल्या गव्हर्नमेंट हाऊसचें भान येऊन वर्तमानपरिस्थिती डोळ्यांपुढें उभी राहते ! मुंबई पाइंटवरून खालीं कोयनाखोरें ३ हजार फ़ूट खोल आहे. उतरण संपली कीं प्रतापगडचीच चढण लागते. गाडीरस्त्यानें १० मैलांवर पण पायरस्त्यानें प्रतापगड सहाच मैल आहे. लॉडविक पाइंट नहरापासून ३ मैलांवर आहे. १८२४ सालीं साताराचा रेसिडेंट लॉडविक या गोऱ्या साहेबाचे पाय महाबळेश्वरला प्रथम लागले. या पाइंटकडे जातांना रस्त्यानें २ मैल दुतर्फा अति गर्द झाडी आहे. मध्यान्हींही कोठेकोठें सायंकाळ झाल्याचा भास होतो. उतरण संपल्यावर हत्तीच्या शुंडेप्रमाणें पाव मैल टोंक खोऱ्यांत घुसलेलें दिसतें. टोंकावर जाणें मोठें धोक्याचें वाटतें. या टोंकास आपले लोक डोमेश्वर म्हणतात. येथून अत्यंत रमणीय अशी सृष्टिशोभा दिसते. वृक्ष वनस्पतींचे हिरवेगार ताटवे व असंख्य पर्वत सभोंवार पसरलेले दिसतात. पायाखालीं तीन हजार फ़ूट खोल दरी पाहून नजर बावरी होते. केटस पाइंट क्षेत्र महाबळेश्वरच्या रस्त्यावर पण १॥ मैल जरा आड गेलें म्हणजे दिसतो. तेथून कृष्णाबाईनें प्रथम डोंगराखालीं उडी घातल्यापासून तों ती वाईजवळ जाईपर्यंतचा तिचा नागमोडी मार्ग सर्व दिसतो. खालीं दऱ्या खोल असून समोर कमळगड व उजवीकडे धौमक्षेत्र, पांडवगड, वामनपंडिताची पांडववाडी वगैरे भाग दिसतात. येथें धावड लोकांची वस्ती आहे. हे पूर्वी मुसलमानी अमलांत बाटलेले पण पूर्वीचे हिंदूच होत. येथील जमीनींत व दगडांत व पाण्यांत लोह फार असून हे लोक लोखंडाचे तवे वगैरे पूर्वी उत्तम करीत, पण सरकारच्या जंगलखात्याचे नियम यांच्या पोटाच्या आड येऊन हे आतां कंगाल झाले आहेत ! आम्हांस येथें एक ९५ वर्षांचा म्हातारा भेटला व त्यानें आपल्या धंद्यांत पूर्वी होत असलेली मिळकत व सांप्रतचें दारिद्र्य यांचें वर्णन करून मोठा शोक केला ! शिवरायाचे मावळेही सांप्रत काबाडकष्ट करून कंगालपणांतच आयुष्य कंठीत आहेत. पण त्यांना ‘ महाराजांचें ’ अगदींच विस्मरण झालें आहे असें

नाहीं! 'कालाय तस्मै नमः' म्हणून स्वस्थ बसणें भाग आहे. नहरास व सभोंवार मुंबईचे पार्शी व भाटे वगैरे लक्षाधीश यांचे बंगले व बागा आहेत. कोल्हापूर, भोर, सांगली, मिरज येथील संस्थानिकांचे बंगले व बागा आहेत. येथें युरोपिअन् जिमखान्याप्रमाणें एक हिंदु जिमखानाही आहे. तेथें सायंकाळीं सुखवस्तु व सधन हिंदु युवयुवती टेनिस वगैरे खेळ खेळण्यास जातात व कांहीं प्रेक्षकही मनोविनोदार्थ फिरत येतात. सर्वत्र देखावे रम्य आहेत. आपल्या महाराष्ट्रांतील संपन्न लोकांनीं येथें बंगले वगैरे बांधून इस्टेटी केल्या नाहींत. ऐतिहासिक स्थल, थंड हवेचें सुंदर ठिकाण व क्षेत्र या तिहेरी नात्यानें महाबळेश्वराकडे आपल्या लोकांनीं पहायला हवें. गेल्या पांच सात वर्षांत येथें हिंदु हॉटेलें निघाल्यापासून मध्यम स्थितींतील लोक अधिक येऊं लागले आहेत. समर्थ--शिवरायांच्या संचाराचा हा भूप्रदेश महाराष्ट्रीयांना अत्यंत स्फूर्तिदायक वाटला पाहिजे. येथें जो आपलेपणा वाटतो तो हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही हिलस्टेशनवर वाटणें शक्य नाहीं. बाजारपेठेंतून दोन मैलांवर बॅबिंग्टन पाइंट आहे. क्षेत्र महाबळेश्वराच्या पश्चिमेस सावित्री नदीच्या खोऱ्यानें एल्फिन्स्टन पाइंट व आर्थर पाइंट हे पाहण्यासारखे आहेत. एल्फिन्स्टन पाइंट एका अजस्र कड्याचे टोंकावर असून खालीं कोयनेच्या खोऱ्याची तीन हजार फूट खोल घळ आहे. आर्थरवरून खालीं डोकावणेंही भयप्रद आहे. सावित्रीनदीनें ज्या चिंचोळ्या खोऱ्यांत चार हजार फुटांवर खालीं कोंकण भागांत उडी घातली तो भव्य प्रदेश येथून उत्तरेस दिसतो. मधली १५ मैलांची कोकणपट्टी टाकून पलीकडे समुद्राची लांब रेषा दुर्बिणींतून पाहण्यासारखी आहे. येथून ५०।६० लहान मोठ्या पर्वतांच्या पंक्ति कांहीं काळ्या भुऱ्या पण बऱ्याच बोडक्या अशा पाहून गंभीरपणा उत्पन्न होतो. पलीकडच्या ब्रह्मारण्यांत तर वृक्षांची इतकी दाट छाया आहे कीं, कित्येक ठिकाणीं तर सूर्याचा कवडासाही कधीं जात नाहीं. तेथें व्याघ्रादि भयानक पशूंची अजून वस्ती आहे. यंदां नुकताच सांगलीकरांनीं येथें एक वाघ मारला. या घनघोर ब्रह्मारण्यांत श्रीसमर्थांनीं कांहीं काळ अनुष्ठान केलें होतें. सर्व पाइंटवर रोज स्त्रीपुरुषांच्या झुंडी फिरावयास जातात. विशेष गर्दी मुंबई पाइंटवर होते. वेण्या तलाव व त्या भोंवतालचे रस्ते तर माणसांनीं फुललेले दिसतात. नद्यांपैकीं फक्त सावित्री नदी कोंकणांत जाते. बाकी कृष्णा, वेण्या व कोयना या नद्या देशावर जातात. कृष्णानदी कमळगड व पांडवगड यांजजवळून वाईकडे जाते व तिला पुढें माहुली क्षेत्रीं वेण्या नदी दुसरीकडून येऊन मिळते. कृष्णानदीला कोयना ( ककुद्मती ) कऱ्हाडास मिळते. सर्वांत येथें कोयना खोरें अत्यंत रमणीय आहे. कोयनेच्या उगमानंतर ती जी पहिली उडी घालते ती ३ हजार फूट खोल आहे. एल्फिन्स्टन पाइंट व लॉडविक

पाइंट यांच्यामधून नागमोडीनें वाहात ती प्रतापगडाच्या खालून अफझुल-खानाच्या थडग्याच्या टेंकडीला डावी घालून पुढें जाते. तिचा हा ७।८ मैलांचा नागिणीप्रमाणें जाणारा मार्ग लॉडविक पाइंटवरून फारच उत्कृष्ट दिसतो. हा पाइंट खरोखरीच अत्यंत रमणीय असून याच्या डोंकावर उभे राहिले कीं उजवे बाजूस कोयनेच्या खोऱ्यापलीकडे एल्फिन्स्टन पाइंट, डावीकडे मुंबई पाइंट व समोर नीट प्रतापगड व त्याच्या चौफेर शेंगलास पर्वतांच्या रांगा आणि मधून जाणारा सर्पाकृति महाड रस्ता हीं सर्व शोभा अवर्णनीय दिसते! जिकडे तिकडे हिरण्यागार गर्द वृक्षांचे गालिचे पसरलेले, चौफेर गगनचुंबित पर्वतराजि आपापलीं मस्तकें वर आकाशांत उंच करून पाहणारीं, सर्वत्र विशाळ पर्वतांच्या दरी, जागोजागचे भव्य जलप्रवाहपात, व डोळे फिरविणाऱ्या ३ हजार फूट खालच्या खोऱ्यांतून नागमोडीनें वाहात जाणारी ती कोयना नदी व वृक्षवनराजींतून मधून मधून दृग्गोचर होणारा सर्पाकृति तो महाडरस्ता व समोर महावीराप्रमाणें वीरासन घालून बसलेला तो प्रतापगड व त्यावरील भवानीमातेच्या मंदिराचा तो चमकणारा कळस-हा सर्व भूप्रदेश खरोखरच पृथ्वीच्या अंगावरचा एक अमोल अलंकार आहे यांत संशय नाहीं.

१४. प्रतापगड हा शिवरायाच्या प्रतापाचें मूर्तिमंत स्मारक आहे, किंबहुना शके १५८१ सालीं शिवरायांच्या ज्या मावळे वीरांनीं महाप्रतापानें अफझुल-खानासारखा प्रचंड वीर नामोहरम केला त्यांच्या प्रतापाचें चिरंतन यश गाणारा हा कीर्तिस्तंभ आहे. यावरून समोर महाबळेश्वराच्या महाप्रचंड भित्ति-प्राय पर्वतांचें एकदम दर्शन होऊन जो गंभीर देखावा दिसतो त्याचें वर्णन करणें दुर्घट आहे. तळापासून शिखरापर्यंत सर्व महापर्वत दिसून सभोंवारच्या असंख्य पर्वतांची विस्तृत व पसरलेलीं शिखरें व स्वरूपें पहातांच मन भांबा-वून जातें. प्रतापगड मध्यस्थ असून त्याच्या चहूंबाजूंस गगनभेदी पर्वतांच्या रांगाच रांगा दिसतात. पश्चिमेकडेस दूरच दूर रायगड व राजगडही दिस-तात. गड चढून गेल्यावर भवानीमातेचें मंदिर दिसतें. नुकताच जळून गेलेला सभामंडप पाहून मात्र चित्त विपण्ण होतें. गडावर भवानीच्या सेवेंत चरितार्थ चालविणारीं इतकीं माणसें असून असा प्रकार घडावा याचें नवल वाटतें! हा प्रकार कसा झाला असेल याचा तर्क करण्यापासून तादृश फायदा नाहीं. पुण्यांतील इतिहासप्रसिध्द वाडे ज्या कालमाहात्म्यामुळें जळून गेले त्याच कालमाहात्म्याचा हा प्रताप होय, असें म्हणून स्वस्थ बसणें भाग आहे. आपल्या खडतर नशीबानें आपल्या प्रिय वस्तूंचे असेच धिंडवडे मांडले आहेत! महाराष्ट्राच्या भाग्यकाळाचे अवशेषही पुढील पिढ्यांस पाहावयास राहूं नयेत हें राष्ट्राचें दुर्दैव होय. तुळजाभवानी ही शिवरायांची व समर्थांचीही कुलस्वामिनी-तिचें दर्शन आपणांस इकडेच घडावें असें वाटून शिवरायांनीं तशीच मूर्ति घडवून

इकडे तिची स्थापना केली. गड आधींच मोरोपंत पिंगळे यांनीं बांधला होता, पुढें भवानीची प्राणप्रतिष्ठा झाली. गडावर बालेकिल्ला आहे त्याच्या तोंडाशींच द्वारासमोर मारुतिरायाची स्थापना समर्थांनींच केलेली आहे. वर जिजाबाई व शिवराय राहत त्या घराचे पडके भाग पाहून त्या ठिकाणीं त्यांना वंदन करून त्या ठिकाणची धूळ मस्तकाला लावावीशी वाटली. शिवरायसिंह ह्या पर्वतावर गर्जना करीत, त्या वेळची गडाची शोभा काय असेल ? त्यावेळच्या मावळे-वीरांच्या अंगांत कोणती वीरश्री खेळत असेल ? ह्या प्रतापगडचा मेघनाद विजापूर व दिल्ली येथील पातशाह्यांना हादरून सोडीत असे. आज ज्या माव-ळ्यांचीं पुण्याकडील भातखाचरें पाण्याखालीं कायमचीं बुडवून टाकण्यांत येत आहेत त्या मावळ्यांचें अंगचें पाणी काय सारें आटून गेलें ? 'कालाय तस्मै नमः'. असो. भवानीची मूर्ति लहान पण भव्य आहे. तिच्या अंगावर पूर्वींचे कांहीं अलंकार आहेत त्यांत समर्थांच्या नवसाचीं कर्णफुलें आहेत. तिच्या गळ्यांत बकुळीच्या सुवर्णकलिकांचा मोठा हार आहे. तो एकदां प्रसाद म्हणून समर्थांच्या गळ्यांत गेला होता असें सांगतात. देवीसमोर समर्थांचीं भवानीस्तोत्रें वाचतांना नेत्र भरून वाहिले:—

प्रपंचीं आमुचे कुळीं । तुळजा कुळदेवता ।
नेणतां ऐकिलें होतें । जाणतां स्मरलें मनीं ॥ १ ॥
तुळजापूर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।
पारघाटीं जगन्माता । सद्य येऊनि राहिली ॥ ११ ॥
एकाचि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझाचि वाढवी राजा । शीघ्र आह्मांचि देखतां ॥ १७ ॥
दुष्ट संहारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥ १८ ॥

समर्थांचे आपल्या पराक्रमी शिष्यावर केवढें प्रेम होतें व त्यांची महाराष्ट्राच्या अभ्युदयाविषयीं किती अनुपम कळकळ होती हें ह्या चार ओव्यांवरूनही कळून येणार आहे. गडाच्या जरा खालीं एका विशाळ सपाट टेकडीवर अफझुलखा-नाची कबर आहे. तेथें सदरेंत शिवरायांनीं त्यास कसें मारलें त्या प्रसंगाचें सविस्तर सुंदर वर्णन विनायकराव भावे यांच्या निबंधांत वाचावें.

१५. प्रतापगड—ऐतिहासिक दृष्टीनें अत्यंत महत्वाचा व क्षेत्र महाबळेश्वर धर्मदृष्टीनें अत्यंत पवित्र स्थान. हीं दोन ठिकाणें महाराष्ट्रीयांना आपल्या गतवैभवाचें स्मरण करून दिल्याशिवाय राहत नाहींत व त्या स्मरणाबरोबर अंतःकरण हादरून नेत्रावाटें अश्रूंच्या धारा न कळत वाहूं लागतात. शके १५८१ शिवथर घळींत दासबोधाचे ६ दशक संपवून श्रीसमर्थ क्षेत्र महाब-ळेश्वरीं येऊन राहिलेले, श्रीमहाबळेश्वरासमोर कीर्तनांची अमृतवृष्टि करीत अस-

लेले, त्यांचे शिष्य साऱ्या जावळीखोऱ्यांत त्यांच्या आज्ञेनुसार आपापल्या 'पहिलें तें हरिभजन व दुसरें तें राजकारण' या कर्तव्यांत निमग्न झालेले, त्याचवेळीं, अगदीं त्याचवेळीं (लक्ष्यांत ठेवा) वाईहून अफझलखान फौजेसह चढाई करून आलेला व शिवराय त्याशीं सदरेंत सामना देण्याच्या कारवाईंत अहर्निश गुंतलेले व अखेर मोठ्या यशस्वितेनें पार पडलेले! एकसमयावच्छेदेंकरून या गोष्टी घडलेल्या, भाटे केळुसकरप्रभृति महाराष्ट्रीयांनो! येथें येऊन व या प्रांतीं फिरून ध्यानांत आणा. 'दुरासदं च तत्तेजः क्षात्रं च ब्रह्मसंयुतम्' या कविकुलगुरूक्तीचें मनन करा. म्हणजे शके १५८१ च्या पूर्वी समर्थशिवरायांची भेटहि झाली नव्हती या तुमच्या भ्रमाचें निरसन होईल. समर्थांच्या राजकारणाच्या गोष्टी कागदपत्रांनीं सिद्ध होणें दुरापास्त दिसतें. पण त्यांची कविता व त्यांचा या सर्व भागाकडील अविरत संचार मनांत आणतां कोणाही महाराष्ट्रीयांस संशय राहूं नये. प्रतापगडावरील बालेकिल्ल्याच्या तोंडीं समर्थांनीं स्थापिलेला मारुति काय सांगत आहे! बालेकिल्ल्यावर जिजाबाईंच्या राहत्या घराच्या पडक्या भिंती काय बोलत आहेत? महापुरुषांचीं कृत्यें कागदावरील अक्षरांत धुंडण्यापेक्षां त्यांच्या संचारानें पावन झालेल्या स्थळांत शोधा. कानामनाला तीं भासतात, भाविकांशीं तीं बोलतात. प्रतापगड व क्षेत्र महाबळेश्वर येथें उभे असलेल्या मारुतिरायांना समर्थांचीं व शिवबांचीं महत्कृत्यें सर्व माहीत आहेत. त्यांना पूर्वग्रहदूषित न होतां तीं विचारा, ते सांगतील! अफझुलखानाच्या वधाच्या (शके १५८१) पूर्वींच समर्थशिवरायांच्या भेटी झाल्या असल्या पाहिजेत व शिवरायांच्या राजकारणाला समर्थांचा आशीर्वाद व साह्य त्यापूर्वींच मिळालें होतें असें ह्या प्रांतीं महिनाभर फिरून मला निर्भ्रांत वाटलें.

१६. क्षेत्र महाबळेश्वरीं पंचगंगेचा उगम आहे. कृष्णा, वेणा, कोयना, सावित्री व गायत्री या पांच नद्यांच्या उगमांचें पाणी गायमुखांतून सोडलें असून त्यांच्या धारेखालीं भाविक स्त्रीपुरुष स्नान करितात. उगमावर मंदिरापलीकडे श्रीसमर्थांनीं मारुतिरायाची स्थापना केली असून महाबळेश्वर मंदिर स्वतंत्र आहे व फार पुरातन आहे. पंचगंगेसमोर ब्रह्मकुंड व विष्णुकुंड अशीं दोन कुंडें असून सभोंवतीं दगडी चबुत्रे आहेत. पंचगंगेचें उर्फ कृष्णाबाईचें मंदिर रा. अनगळ यांनीं बांधलें असून त्यांचा चोफाळ्यावर शिलालेख आहे तो असाः—

'श्रीकृष्णावेणीककुदमती सावित्रीगायत्रीचेरणी आर्पण परशराम नारायण अनगळ.' महाबळेश्वरचें मंदिरहि त्यांनींच बांधलें आहे. ह्या देवालयांत अफझुलखानाच्या डेऱ्यावर असलेला पितळी मुकुटाकार टोप आहे. त्यावर कांहीं विजापूर पातशहांच्या मूर्ति कोरल्या आहेत. हा टोप बराच जड आहे. ह्या महाबळेश्वरास

शके १५६६ मध्यें अर्पण केलेला एक पितळी भव्य नाग आहे. नागमूर्तीवर मधोमध पुढील लेख कोरलेला आढळला तो असाः—

'श्रीशके १५६६ तारण संवत्सरे श्रावण वदि पंचमी सोमे नागार्पणमकृतं शिव पाहि'

हा नाग शके १५६६ मध्यें चंद्रराव मोरे यांनीं अर्पण केल्याचें कोणी सांग तात, कोणी अनगळ यांचें नांव घेतात. पंचगंगेसमोर देवी अहल्याबाई यांनीं रुद्रेश्वर महादेवाचें देऊळ बांधलें आहे.

धौम—हें क्षेत्र महाबळेश्वराच्या पायथ्याशीं कृष्णातीरीं कृष्णानदीच्या खोऱ्यांत वाईपासून सहा मैलांवर आहे. तेथें वाईहूनच जावें लागतें. वाटेंत नानाफडणीसाचा मेणवली गांव व वामनपंडितांची पांडववाडी लागते. वामनाची समाधि भोगाव-पांडववाडीस कृष्णातीरींच असून तिचा थोडासा जीर्णोद्धार दोन वर्षांपूर्वी झाला आहे. वैशाख शुद्ध ६ स तेथें अल्प प्रमाणावर उत्सव करण्यासही प्रारंभ झाला आहे. वाईकर या कृत्यास साह्य करतील तर बरें होईल.

पुढें धौम हें जुनाट क्षेत्र लागतें. हें स्थान रम्य आहे. येथें श्रीलक्ष्मीनृसिंहाचें मंदिर फार सुंदर बांधलें असून उंच दगडी पारावर देवाची स्थापना केली आहे. सभामंडप अलीकडेच बांधला आहे. या खोऱ्यांतून कृष्णाबाईचें उगमस्थान जें क्षेत्र महाबळेश्वर तें फार उंचावर दिसतें. कमळगडचा पर्वत व क्षेत्र महाबळेश्वराचा पर्वत दोन्हीही खालून पाहण्यानें त्यांच्या विस्तृतपणाची व उंचीची कल्पना येते.

---

## कृष्णस्मरण.

तो मज आठवे मनीं ग बाइये । तो मज आठवे मनीं ॥ ध्रु० ॥
गोकुळिं गोवळ होउनि रांगे ।
नंदाच्या अंगणीं । ग बाइये ॥ तो० ॥ १ ॥
भाळीं पिंपळपान सुशोभित ।
दिव्य तेज लोचनीं । ग बाइये ॥ तो० ॥ २ ॥
चरणीं वाळे रुणझुण वाजति ।
करिं मुरली मोहिनी । ग बाइये ॥ तो० ॥ ३ ॥
गोपगोपिकाप्रेमपुंज तो ।
भुलवि मंजु बोलुनी । ग बाइये ॥ तो० ॥ ४ ॥
मनहि मनाचें होउनि अंगें ।
दे मज सुखउन्मनी । ग बाइये ॥ तो० ॥ ५ ॥
अंतर्बाहिश्च भरला आपण ।
नुरला लक्ष्मण जनीं । ग बाइये ॥ तो० ॥ ६ ॥

# ३६ स्त्रियांची भक्ति.



भगवान् श्रीकृष्ण एकदां बलरामदादासह वनांत आहे असें पाहून देवाचे भक्त जे गोपाळ तेहि त्या ठिकाणीं आले. गोपाळांना भूक लागली तेव्हां त्यांनीं श्रीकृष्णाजवळ अन्नाची याचना केली. देवांनीं सांगितलें, 'येथें जवळच ऋषि यज्ञ करीत आहेत तेथें जा व माझें नांव सांगा म्हणजे तुम्हांला भोजन मिळेल.' पण त्या गोपाळांना त्या ब्राह्मणांनीं भोजन दिलें नाहीं. तेव्हां ते निराश होऊन परत श्रीकृष्णाकडे आले. देव हांसले व म्हणाले, 'गोपाळ हो ! तुम्ही त्या ऋषींच्या पत्न्यांस भेटा व बळरामदादासह मी येथें आलों आहें असें सांगा म्हणजे त्या तुम्हांस भोजन देतील.' पुरुषांपेक्षा स्त्रिया स्वभावतः धर्मशील, श्रद्धाळु व आतिथ्यकर्मी अधिक दक्ष असतात. त्यांना कृष्णदेव आपल्या आश्रमाजवळ आलेले ऐकून परमानंद झाला, व आप्तांनीं प्रतिबंध केला असतांही त्या चतुर्विध अन्न घेऊन श्रीकृष्णदर्शनास आल्या. आपल्या हातून श्रीकृष्णसेवा घडली नाहीं व आपल्या भार्यांनीं देवाच्या भक्तीचें व अतिथिसत्काराचें पुण्यकर्म केलें याबद्दल त्या ऋषींना मागाहून पुष्कळ पश्चात्ताप झाला. ही मधुर कथा भागवताच्या दशम स्कंधांत अ. २३ मध्यें दिली आहे व वामन पंडितांनीं 'यज्ञपत्न्याख्यान' म्हणून ७८ श्लोकांचें त्यावर सुंदर आख्यान रचिलें आहे.

* * *

विप्रस्त्रिया सारुनि पाक सारा, ध्याती मुकुंदा जगदेकसारा ।
अलंकृता मौक्तिकमाणिकांनीं । मनीं मुखीं माधव आणि कानीं ॥२३॥

गोपाळ हे खरे हरिदासच, त्यांनीं देव आले म्हणून सांगून त्या ऋषिपत्न्यांना वंदन केलें:—

देखोनियां हे हरिदास त्यांतें, 'नमो' म्हणोनी नमिती सत्यांतें ।
सन्मान देऊनि अनेकरीतीं, 'आला हरी' हें श्रुत ते करीती ॥ २४ ॥

ऋषिपत्न्या देव आले हें ऐकतांच आनंदभरित झाल्याः—

ऐकतां निकट आगमनातें, नावरेच अनुराग मनातें ।
अन्न षड्रस चतुर्विधजाती, घेउनी हरिस सन्निध जाती ॥ २६ ॥

समुद्रातें उच्चस्थळिहूनि मिळों जाति सरिता,
सुखाब्धीतें जाती त्वरितचि तशा प्रेमभरिता ।
तटीं कालिंदीच्या सुललित अशोकद्रुमवनीं,
स्वगोपालांमध्यें करि पदरजें धन्य अवनीं ॥ २८ ॥

अन्न षड्रस आहे ह्म. अन्नांत कडू, गोड, आंबट, खारट, तिखट व तुरट असे सहा रस आहेत. खाण्याच्या पदार्थांच्या चार जाति आहेत. लेह्य, पेय,

चोष्य व खाद्य. लेह्य म्ह. श्रीखंडादि चाटण्याजोगें, पेय म्ह. दुग्धादि पिण्याजोगें, खाद्य म्ह. भात, पोळी, लाडू इ. खाण्याजोगें व चोष्य म्ह. शेवग्याच्या शेंगा इ. चोखण्याजोगें.

सरितांची उपमा फार गोड आहे. नद्या पर्वतावरून उतरत उतरत खालीं समुद्राला येऊन मिळतात, त्याप्रमाणें त्या स्त्रिया भक्तिनम्र—निरहंकार होऊन सुखसमुद्र जो श्रीकृष्ण त्याला मिळाल्या. त्या सत्या म्ह. पतिव्रता होत्या. त्यांनीं श्रीकृष्णाला मनानें आलिंगिलें म्ह. सर्वेंद्रियांसहित त्या भगवंताला शरण गेल्या आणि लौकिकाचाराप्रमाणें त्याला वंदन केलें:—

ऐकोनि जो स्वहृदयांतचि रेखिला हो । प्रत्यक्ष तोचि नयनीं प्रभु—देखिला हो ।।
आलिंगिला निजमनें प्रभु त्या सत्यांनीं । केलें तयाउपरि वंदन त्यास त्यांनीं ।।३७।।

यावर श्रीकृष्णांनीं त्यांस उत्तम बोध केला व त्यांचा गौरव करून त्यांस पतींकडे जाण्यास सांगितलें:—

हरी म्हणे कीं ‘ तुम्हि विप्रदारा । महासभाग्या परमा उदारा ।
पहावया पातलियाचि मातें । अलभ्य जो मी त्रिदशोत्तमातें ।। ३९ ।।

त्रिदश म्ह. देव, त्यांचा स्वामी, मी इंद्रादि देवांनाही दुर्लभदर्शन आहें. माझ्या ठिकाणीं सर्वांची प्रीति निरतिशय व स्वाभाविक आहे. याचें कारण या सर्व जड व अनर्थ म्ह. नश्वर पदार्थांत मी एकच व्यापून राहिलों आहें.

जडा अनर्थांत समान साचा, जो अर्थ तो मी प्रियमानसाचा ।
सर्वांसही गोडचि वाटलों कीं, प्रीतीस ही एकचि वाट लोकीं ।। ४० ।।

सर्व अनर्थांत अर्थ म्ह. सारभूत आत्मा मी आहें, हें जो जाणून वागेल तो सर्वांच्या प्रेमास पात्र होईल. सर्व भूतांचें प्रेम मिळविण्याचा हा एकच राजमार्ग आहे. अनर्थरूप जी प्रकृति तिच्यावरची दृष्टि काढून जो आत्मरूपीं रत होईल तोच सर्व लोकप्रिय होईल. आत्मा सर्वप्रिय आहे.

आत्माचि तो परम मी म्हणऊनि मातें, जाणोनि संत भजती पुरुषोत्तमातें ।
जे हेतुवर्जित विनाव्यवधान साची, हे स्वात्मभक्ति मज अर्पिति मानसाची ।।४१।।

जे हेतुवर्जित आहेत म्ह. आत्म्याव्यतिरिक्त अन्य जड पदार्थांच्या ठिकाणीं ज्यांची आसक्ति नाहीं व चित्ताला आत्म्यावांचून दुसरें व्यवधान नाहीं असे आत्मनिष्ठ संत मला—परमात्म्यालाच भजतात. देव म्हणतात, “ स्त्रियांनो, तुमच्या प्रेमभजनांत मी आत्माराम तुम्हांला सांपडलों, आतां तुम्ही परत त्या यज्ञमंडपांत आपापल्या पतींना धर्मकर्मांत साह्य करण्यास जा. ”

प्रियें सारीं जेणें प्रिय परम तो वो स्वभजनीं,
असा मी त्या मातें तुम्हि गवसिलें प्रेमभजनीं ।
तुम्ही जावें जेथें स्वपति करिती देवयजन,
स्त्रियांच्या योगें ते करितिल समाप्ती द्विजजन ।। ४८ ।।

हा वेळपर्यंत भगवंताचें दर्शन, त्याचें मधुर भाषण, त्याच्या मुखांतून गंगे-प्रमाणें स्रवणारा तो स्वानंदबोध यांत त्या ऋषिपत्न्या इतक्या दंग होऊन गेल्या होत्या कीं, त्या आपल्यासकट सर्व जग—हा संसार—विसरल्या होत्या. असेंच देवाचें रूप डोळ्यांनीं सतत पाहत असावें, असेच अमृतमधुर शब्द त्याच्या मुखांतून निरंतर ऐकत रहावेत व ही परमात्ममूर्ति सर्वेंद्रियांत भरली असतांना संसाराचें पुनर्दर्शन न होतां यांतच भरून विरून विरघळून जावें असें त्या पुण्यशील सतींना वाटल्यास नवल नाहीं. या आनंदसमुद्रांतून देवानें आपल्याला दूर ढकलून दिलें, पतींकडे परत संसारांत जा म्हणून सांगून सुखपर्वतावरून दुःखाच्या दरींत लोटलें असें त्यांना वाटलें. देवाच्या समागमापासून परत संसारवृत्तीवर यावें असें कोणा भक्ताला वाटेल ? पण देवाचें करणें देवच जाणे ! गीतामृत पाजून अर्जुनाला देवानें पुनः युद्धकार्याला लावलें तसाच देव भक्तांना स्वात्मानंदाचें परमामृत पाजून पुनः संसारकर्मांतच लोकरहाटीसाठीं ठेवीत असतो. देव म्हणाले—

न प्रीतयेऽनुरागाय ह्यंगसंगो नृणामिह ।
तन्मनो मयि युंजाना अचिरान्मामवाप्स्यथ ॥ ३२ ॥

प्रत्यक्ष अंगसंग ह्म० शरीराचा समागम हा ह्या जगांत सुखाच्या किंवा प्रेमाच्या परिपोषणाला कारण होतो असें नाहीं. ह्मणून तुम्ही आपलें मन मत्स्वरूपीं ठेवा, म्हणजे लवकरच तुम्हांला माझी प्राप्ति होईल.

ह्या सुंदर भागवती श्लोकाचें वामनांनीं कसें सरस रूपांतर केलें आहे तें पहा

घडे भक्ति जैसी मनाच्या प्रसंगें, न साधे तशी माझिया अंगसंगें ।
मनीं ध्या मला, शीघ्र पावाल मातें, स्मरा अंतरीं सर्व सर्वोत्तमातें ॥५८॥

प्रत्यक्ष दर्शनाचें सुख थोरच आहे, पण त्याहूनही दर्शनोत्तर ध्यानाचें, अनुसंधानाचें, स्मरणाचें सुख निरंतर अपार आहे. देवानें त्या स्त्रियांना एकवार दर्शन दिलें, बोध केला व संसारांत राहूनही त्या बोधसुखाचा रंग भंग न पावावा म्हणून त्याच्या दृढीकरणासाठीं त्यांना परत संसारांतच ठेवलें. भक्ताचा संसार उधळून त्याला पूर्ण रंगांत ठेवणें देवाला काय अशक्य आहे ? पण नव्हे. संसार ही परमार्थ शिकण्याची उत्कृष्ट शाळा आहे; येथें परमार्थबोधाची कसोटी लागते; येथें परमार्थभावना दृढ होतात; येथें त्यांचें महत्व कळतें. संसाराच्या विविध वृत्तींशीं घसवटतां घसवटतां वैराग्य उत्पन्न होतें व ज्ञानबोध आस्ते आस्ते जिरत—पचत जातो.

असो. आपल्या पत्न्यांनीं श्रीकृष्णदेवाचा सत्कार केला, त्याचा प्रसाद जोडला, हें कळल्यावर त्या ऋषींना अनुताप झाला, त्यांना दुःख वाटलें व आपल्या हातून नाहीं तर नाहीं, पण आपल्या धर्मपत्नींकडून तरी हरीचा व हरिदासांचा योग्य सन्मान केला गेला यांतच त्यांनीं सुख मानून घेतलें. अनु-

तापाच्या भरांत ते ऋषि म्हणाले कीं “ हा आमचा जन्म, ही आमची विद्या, हें ब्रह्मचर्य, हा बहुश्रुतपणा, हीं आमचीं कर्में ह्या सर्वांना आम्ही कमीपणा आणल्यामुळें आह्माला धिःकार असो—! कां कीं, प्रत्यक्ष देव आमच्या घरीं चालून आले असून आम्ही त्याला विमुख झालों ! आम्हांला सर्व संस्कार झाले, आम्ही आपल्याला सुसंस्कृत झालों असें म्हणतों पण आम्हांला दृढ भक्तीचें वेड लागत नाहीं ! ! आणि ह्या स्त्रियाः—

नासां द्विजातिसंस्कारो न निवासो गुरावपि । न तपो नात्ममीमांसा न शौचं न क्रियाः शुभाः ॥ ४२ ॥

यांना उपनयनसंस्कार नाहीं, गुरुसहवास नाहीं, तप नाहीं, आत्मविचार नाहीं, शुध्दता किंवा संध्यावंदनादि शुभ क्रिया नाहींत असें असूनही यांच्या ठिकाणीं केवढें अलोट भगवत्प्रेम आहे ! ”

स्त्रियांच्या ठायीं विद्या, तप, गुरुसमागम, कर्माचरण इ. गुण नसूनहि शुद्ध हरिप्रेम असल्यामुळें त्या तरल्या, व पुरुषांच्या ठिकाणीं वरील गुण असूनहीः—

‘भक्तीविणें हरिचिया गुण ते उडाले, त्यांच्या स्त्रिया तरलिया, नर ते बुडाले !’

पुरुषांनीं ह्या कथेवरून फार बोध घेतला पाहिजे. पुरुषांचे व्यवसाय व व्यवहार सामान्यतः जास्त राजस असतात आणि म्हणून ते परमार्थाला तितके दुरावतात. सत्वगुण हा भक्तीला जवळ करितो, म्हणून स्त्रीपुरुषांनीं प्रपंचव्यवसाय करीत असतांना सुद्धां रजोगुणाचा विटाळ अंतर्वृत्तीला होऊं न देण्यासाठीं फार दक्ष रहावें. पुरुप काय किंवा स्त्रिया काय भगवत्प्रेम असेल तरच त्यांचें जिणें धन्य होय.

---

## ३७ वादानें ऐक्यभावाचा बिघाड.

१

ऐक्याचें बीज एकपणाच्या भावनेंत आहे, ‘ एकमेवाद्वितीय ’ असा आत्माराम असल्यामुळें त्या एकमय आत्म्याशीं तद्रूप होण्यांत आहे. लोकांची दृष्टि सामान्यतः आत्म्याकडे नसून प्रकृतीकडे असते. प्रकृति ही गुणदोषरूप आहे. गुण आणि दोष प्रत्येक व्यक्तींत, वस्तुमात्रांत आहेत. कोणीहि मनुष्य घेतला तरी त्यांत कांहीं गुण व कांहीं दोष असायचेच. एकाच मनुष्याकडे पाहण्याचे अनेकांचे भिन्नभिन्न दृष्टिकोन असतात. यामुळें कोणी स्तुति करणारे व कोणी निंदा करणारे उत्पन्न होतात. आत्मस्वरूपाची ज्याची बैठक स्थिर झाली त्याला

गुणदोष दिसतच नाहींत ह्मणजे ते प्रकृतिजन्य आहेत हें त्याला पूर्ण ज्ञान असल्यामुळें तो त्यांकडे न पाहतां आत्मारामाकडे पाहतो. असा पुरुष हाच लोकांत ऐक्यभाव रुढविण्यास समर्थ होतो. तोच खरा लोकनायक होय.

२

सांप्रत भरतखंडांत ही आत्मस्वरूपाची बैठक कायम ठेवून लोकांच्या चळवळींत पडणारे धर्मनिष्ट पुरुष विरळ असल्यामुळें 'मतामतांचा गलबला। कोणी पुसेना कोणाला' अशी बेदाद स्थिति झाली आहे. हिंदु संस्कृतीची घडी मोडून पाश्चात्य संस्कृति हिंदु लोकांच्या चित्तांवर आपली छाप बसवूं पाहत आहे. अशा या संक्रमणकाळीं नुस्त्या जुन्यानव्यांत नव्हे, तर नव्यानव्यांत आणि जुन्याजुन्यांत भिन्नभिन्न मतें फैलावून कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं हें वर्तमानपत्रें, मासिकें, सभा, मंडळें यांजकडे पाहणाऱ्याच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं.

३

सांप्रतचा काळ विचारस्वातंत्र्याचा आहे, चिकित्सेचा आहे, घटनेचा आहे असें सांगण्यांत येतें व मतभेद, वाद, चर्चा हीं झालींच पाहिजेत, झगडयांतूनच समाज टिकाव धरून राहील, सत्य बाहेर येईल इ. गोष्टी जो तो आपापल्या परीनें सांगत आहे—पण सर्वांचा परिणाम मात्र दिखाऊ होऊन अंतर्यामीं एकोपा बिघडून जात आहे! 'सत्यशोधक' पणाचा डौल सारेच मारतात, पण सत्य बाजूला राहून वादांत असत्य, हेत्वाभास, जल्प, वितंडा, अतिवाद हे सर्व प्रकार विरोधी पक्ष सारख्याच आवेशानें एकमेकांवर भडिमार करितांना योजीत आहेत! राष्ट्रांत ऐक्यभावनेचा प्रसार करणाऱ्या श्रीसमर्थांसारख्या महात्म्यांनीं वादांनीं कांहीं निष्पन्न होत नाहीं म्हणून त्यांत पडूं नका असें बजावलें असून त्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं.

४

**वादविवाद परमार्थांत तसाच लौकिक चळवळींतहि अनर्थकारी आहे** असा संतांचा उपदेश आहे व अनुभवहि तसाच आहे. ह्या संबंधानें मनाच्या श्लोकांत व इतरत्र बरेच ठिकाणीं सुंदर बोध केला आहे, तिकडे आपण पाहूं.

( १ ) वाद वाढला म्हणजे 'पुढें मागुता शोक जीवीं धरावा' लागतो ( ६१ ) वादाचा शेवट उभयपक्षीं heart-burning मध्यें होतो हें आपण पाहतोंच.

( २ ) वादापासून चार तोटे होतात. 'निजध्यास' म्ह. आत्मानुसंधान किंवा हरिचिंतन याला अडथळा येतो. 'अंतरीं शोकसंताप बळेंच' म्ह. विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करण्याप्रमाणें आपण होऊन बोलावल्यासारखा होतो. 'सुखानंद आनंद भेदें बुडाला' हा तिसरा तोटा—भेदभावना बळावते

व स्वसुखाला वादमग्न पुरुष व्यर्थ आंचवतो व मनाला खेद होऊन स्वनिश्चया-पासून च्युत होतो ( ६२ ).

( ३ ) क्रिया करणाऱ्याला वादांत पडायला वेळच 'नसतो, वादी पुरुष क्रियेवीण वाचाळता ' या दोषांत पडतो ( १०८ ).

( ४ ) वादविवाद सोडून द्यावा व मुखसंवाद करावा. हा शोकसंताप हरण करणारा व हितप्रद होतो ( १०९ ).

( ५ ) ' अहंतागुणें वाद नानाविकारी ' ( ११० ). अहंकारापासून वादाची प्रवृत्ति होते आणि एकदा वादांत पडल्यावर कोणताच धरबंद राहात नाहीं आणि दोन्ही पक्षीं अपशब्द वाढून द्वेषमत्सरवैरादि दुष्ट भावनांत त्याचें पर्यवसान होतें.

( ६ ) वादांत पडूं नये हें ' हितार्थ ' आम्ही सांगतों. वादाचे दुष्परिणाम काय होतात हें खाजगी किंवा सार्वजनिक गोष्टींतल्या वादांचे परिणाम 'शोधून पहा' म्हणजे समजेल ( १११ ).

( ७ ) जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला, परी वादवीवाद तैसाचि ठेला ।
उठे संशयो वाद हा दंभधारी, तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ११२ ॥

( ८ ) वादानें अहंता वाढते व मोठमोठे पंडित व व्युत्पन्न पुरुषही शेवटीं ब्रह्मराक्षस होऊन स्वहितास आंचवतात ( ११३ ).

( ९ ) अहंकारराहू हा स्वरूपाला आच्छादून टाकतो आणि यामुळें तमाची रात्रच अधिक घनघोर होत जाते.

५

श्रीसमर्थांनीं मनाच्या श्लोकांत वादविवादापासून कोणकोणते तोटे होतात तें सांगितलें आहे. त्याचा आपण सारांश काय तो पाहिला. वादापासून आपलेंच अत्यंत अनहित होतें. स्वरूपबोधाला व स्वानंदाला मनुष्य आंचवतो आणि दुर्भावना बळावतात. हें नुकसान ज्याचें त्याच्यापुरतें झालें. पण वादविवाद वर्त-मानपत्रांत, मासिकांत, सभांत, मंडळांत, विविध संप्रदायांत व समाजांत एकदां बोकाळत चालले कीं, मतभेद व पक्षभेद तीव्र माजून राहतात, नानाप्रकारच्या वृत्तींनीं वाचकांचीं मनें आंदोलन पावतात. एकात्मभावनेचा विध्वंस होऊन समाजाची अत्यंत हानि होते ! असा प्रकार सर्वत्र चालला आहे कीं नाहीं हें ज्याचें त्यानें पाहून घ्यावें, आणि वादाचा घरीं, दारीं, लौकिकांत, चळवळींत वीट मानायला शिकावें. वादबुद्धि खुंटली कीं एकोपा सहज आहे.

६

वाद, जल्प वितंडा, अतिवाद ही वादाचींच चढतीं दुष्टरूपें आहेत त्यांचें स्पष्टीकरण करूं:--

१ वादः--स्वपक्ष आणि परपक्ष यांच्या निर्णयासाठीं उभय पक्षांतील भाषणें.

२ जल्पः—आपलाच प्रश्न खरा असें अभिमानानें, हट्टानें, सिद्ध करण्याण्यासाठीं केलेलें भाषण.

३ वितंडाः–येन केंन प्रकारेण परपक्षाचा पाडाव करण्यासाठीं बोललेले शब्द.

४ अतिवादः–नुस्तेंच एकेरीवर येऊन अद्वातद्वा केलेलीं भाषणें, प्रमाणरहित तर्क.

अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । वोळखा जातीचा अंत्यज तो ॥ १ ॥
वेदश्रुती नाहीं ग्रथ ज्या प्रमाण । श्रेष्ठांचें वचन न मानी जो ॥ २ ॥
तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ ३ ॥

७

ज्ञानोबारायांनीं ' वाचिकी अहिंसा ' कोणती तें सांगतांना विरोधवादबळ, तर्कयुक्ति इ. नें दुसऱ्यास कामावीस करणें, उपहास, छळ, वर्मस्पर्श, अटीचें बोलणें, आवेशानें बोलणें, पेंचाचें भाषण, आशा, शंका, प्रतारण हे नऊ दोष सज्जनानें टाळावेत म्हणून सांगितलें आहे.

८

वरील सर्व दोष टाळून भाषण, लेखन इ. वाग्व्यवहार कसे करावे ?

तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ अमृताचे ॥ ज्ञानेश्वरी ( १३-२७० )

---

# ३८ मोगलाईंत व वऱ्हाडांत संचार.

( १९२६ )

## १ सत्संगतियोग.

या संसारांत कांहीं योगायोग असे अकल्पित येतात कीं, मनुष्य–प्रयत्नानें ते आणून येणार नाहींत. सुखें आणि दुःखें अप्रार्थित येतात. मनुष्याचा अहंभाव वृथा आहे. असा एक परम भाग्याचा योग आम्हांस गेल्या महिन्यांत आला. श्रावण शुद्ध १३ शनिवारपासून आमचा तब्बल एक महिना सत्संगतीच्या सुखांत गेला. नारायणानें सत्संगाचें सुख महिनाभर अपार दिलें. आचार विचारांच्या सुरांत सूर मिळालेले असे आमचे परमार्थांतलें स्नेही ' माई ' व ' आण्णा ' यांनीं व आम्ही दक्षिण हैद्राबादेस जाण्याचा बेत एकदम ठरविला. व त्याप्रमाणें आम्ही निघालों. हिंगणघाटकडील दोन भाविक तरुण नाशकास दोन महिने येऊन राहिले होते, तेही बरोबर निघाले. वडील ' बाळकृष्ण व धाकटा त्याचा मेहुणा ' उद्धव. ' आमच्या सर्व पुस्त-

कांचा कॉलेजच्या विद्यार्थ्यांसारखा सूक्ष्म अभ्यास केलेला 'बाळकृष्ण' हा जातीचा सोनार असून आचार विचारांत पुरा ब्राह्मण आहे! दोघेही तरूण प्रेमळ व परमार्थप्रवण आहेत. एक म्हातारे 'मामा' हीं संगे निघाले. ते मोठे विनोदी असल्यामुळें साऱ्या वाटेंत करमणुकीला कांहीं उणें नव्हतें. माई आणि आण्णा व बाळकृष्ण, उद्धव आणि मामा हे बरोबर घेऊन आम्हीं निघालों. हैद्राबादेस १६ दिवस मुक्काम झाला. येतांना पूर्णा स्टेशन-वर उतरून आंवढ्यानागनाथाचें दर्शन पूजन वगैरे झालें. टाकळीच्या दाजीमहाराजांची एक दिवस संगतपंगत झाली. हा सारा महिना प्रवास, प्रवचनें, संभाषणें, भजनपूजन, परमार्थचर्चा, साधुसंतांच्या भेटीगांठी यांत इतका बहारीचा गेला व मोगलाई वऱ्हाडांतील मंडळींच्या सहवासाचा आनंद एवढा झाला कीं, प्रपंचास पार विसरून आनंदमहोदधींतच रहिवास करणारे आम्ही—

निरंजनीं अक्षयीं निद्रा केली हो।
तेणें माझी सर्वही चिंता गेली हो॥
सुखशयनीं सर्वदा निरालंबी हो।
माझें मीपण बुडालें आत्मबिंबीं हो।

ह्या केशवस्वामींच्या वचनाप्रमाणें नारायणाचे खरोखरी लाडके आहोंत असें आम्हांस निभ्रांत वाटून राहिलें.

## २ सत्संगाची आवड.

पहिला सत्संग म्हणजे सत्संगाविषयीं निरतिशय प्रीति, आंतरिक निर्मल भावना हा होय! आपला शुभभाव हाच आपला तारक आहे. हा नसेल तर सत्संगांत भिजूनही खडक कोरडाच्या कोरडाच राहतो. तुकोबासारख्या पाहरीं 'पाझर रोकडे। फोडूं पाषाणांमध्यें' अशा स्वप्रत्ययबलानें गरजणाऱ्या आहे-तच. तथापि सामान्यतः विमलभाव मूळचाच असेल तर सत्संगापासून लाभ शीघ्र व सुकर होतो. 'भाव तोचि देव भाव तोचि देव। ये अर्थी संदेह धरूं नका" असें साधु गर्जून सांगतात तें यथार्थ आहे. पाकड आणि तांदुळ वेगळे करण्याचें तर्काचें काम झालें, साच आणि लटिकें जाणतां आलें, म्हणजे 'साचा' च्या ठायीं विमलमनानें बुडी द्यावी; देवाविषयीं विमलभाव व सदाचारप्रीति पाहून मग प्रेम द्यावें घ्यावें; दोषदर्शनाची कातर फार चालवूं नये; प्रकृतिजन्य गुणदोष प्रकृतीच्या माथीं मारून देवभाव तेवढा घेण्यास शिकावें म्हणजे सत्संगतींतला आनंद भोगतां येतो! नारायणानें बाळपणापासून आम्हाला सत्संग दाखविला असल्यामुळें सत्संगाची आवड सहज आहे. सत्संगाविषयीं अकृत्रिम अहेतुक प्रेम ही एक नारायणाची देणगी आहे.

मज वाटतसे सभाग्य मोठें, भगवद्भक्त तयांत म्यां जुडावें ।
तदधीन तुझ्या यशःसुधेचा, ऱ्हद गंभीर तयामधें बुडावें ॥
तुज वर्णिति संत संगमुक्त, प्रकृतिप्रेमळ तद्गणीं शिरावें ।
तुझिया गुणसागरांत माझें, मन हें सैंधव माधवा विरावें ॥ ( मोरोपंत )

भगवद्भक्तांच्या मेळांत 'म्यां जुडावें' हें माझें केवढें भाग्य! कां कीं, कीर्तिसुधेच्या गंभीर सरोवराच्या किल्ल्या त्यांच्या स्वाधीन आहेत व मला तर त्यांत मनमुराद पोहायची उत्कट इच्छा आहे. हरियशाची गोडी हरिभक्तांच्या मुखानें ऐकल्यानेंच लागत असते. गुणानुवाद कोणीही गावेत, पण ते भक्तांच्या तोंडून ऐकण्यांत खरी मौज आहे. देवा! तुझे गुणानुवाद संत गातात, ते संगमुक्त होऊन गातात, बाह्यसृष्टीला किंवा देहगेहादिकाना विसरून हरिमय होऊन गातात. अशाचा संग मला पाहिजे. ते पुन्हा प्रकृतिप्रेमळ असावेत. प्रेमळ भक्तांच्या समूहांत म्यां शिरावें आणि मिठाचा खडा समुद्रांत टाकतांच जसा विरघळून जातो तसें अहंकाराच्या काठिण्यामुळें चैतन्यांतून वेगळें पडलेलें माझें हें चित्त देवाच्या गुणसागरांत विरून जावें, वेगळेपणानें न उरतां हरीशीं समरस व्हावें. हें सर्व सत्संगांत लीलेनें होतें. म्हणून देवा! मला संत-संगांत मिळवून घे. संतसंगांत प्रेमामृत फुकाचें यथेष्ट प्यायला मिळतें. देहाचीं कर्में चालत असतांना देहाचें भान हरपतें, संसार सुखाचा होतो. अविरत आनंदाचा सुकाळ होतो, निरभिमानता सहज होते, दुःखलेश उरत नाहीं, देहविकार जाऊन आनंदलहरींनीं व अष्टसात्विक भावांनीं वारंवार चित्त भरून प्रसन्न होतें. सत्संग सर्व साधनांना वरिष्ट आहे.

सत्संग फार दुर्लभ आहे, लाभला तरी उमगत नाहीं, उमगलाच तर मात्र अमोघ आहे. पण तोही नारायणाच्या कृपेनेंच मिळतो. भूतमात्रीं हरि पाहण्याचा ज्यांचा अभ्यास दृढावला, ज्यांचें हरिप्रेम निस्सीम आहे, ज्यांच्या डोळ्यांत हरि भरला आहे, असे संत भेटणें म्हणजे काय सांगावें, ती देवाचीच भेट होय. संत व देव वेगळे नाहींत. प्रतिमा ह्या देवाच्या अचेतन मूर्ति व संत प्रत्यक्ष सचेतन देवच होत. म्हणून तुकोबांनीं 'देव सारावे परते । संत पुजावे आरते' असें सांगितलें आहे.

## ३ माई आणि बाबा.

'माई' आणि 'बाबा' यांची पुरी ओळख वाचकांस करून देतां येत नाहीं. ही प्रसिद्धि त्यांना आवडणार नाहीं. संसारांत असलीं झांकलीं माणकें मधून मधून आढळतात. माई प्रायः नाशकास राहतात व बाबा हैद्राबादेस राहतात. दोघेही 'प्रपंची' आहेत. प्रपंचाच्या शाळेंतच त्यांना परमार्थ शिकतां आला. पुष्कळ वेळां साधु, संन्याशी, गुरुजी, बोवा, महाराज, इ०

नांवानें प्रसिद्धीस आलेल्या पुरुषांत जो शुद्ध परमार्थ आढळणें दुर्घट होतें तो असल्या ' प्रापंचिकांच्या ' राहणींत आढळतो. माई व बाबा या दोघांचे गुरु वेगवेगळे, पण दोघांचा गुरुभाव एकच आहे. आमचा यांचा परिचय आज ८।१० वर्षांचा, पण खरी ओळख या तीन वर्षांतली आहे. उभयतांच्या परमार्थसुखांत प्रासादिक कविता उगम पावते, ती त्यांच्या संगतींत त्यांच्या तोंडून ऐकण्यांतच मौज आहे.

## ४ हैद्राबादेस पंधरवडा.

आमचे बरोबर पंधरा दिवस हैद्राबादेस राहणें झालें. माई, बाबा, अण्णा व मी असे चौघेजण तर अहोरात्र सद्भक्तीच्या गोड विचारांशीं व सगुणप्रेमोर्मीशीं खेळत, बागडत, नाचत, गात होतों. कधीं भटजीबापूंच्या मठींत, कधीं दंडीस्वामींच्या आश्रमात, कधीं वामन नाइकांच्या बगीच्यांत व बंगल्यांत व हमेषा घरीं किंवा मोटारींतून फिरण्यांत पण सर्वकाळ नारायणाच्या व संत-सद्गुरूंच्या कथालापांत रंगत होतों, एक प्रकारच्या हरिप्रेमांत मस्त होतों म्हटलें तर चालेल ! प्रत्यहीं रात्रीं ९ ते ११ पर्यंत माझें रेसिडेन्सींत जोशी वकिलांच्या भव्य वाड्याच्या मध्य चौकांत प्रवचन होत असे व घरीं आल्यावर रात्रीं २।३ वाजेपर्यंत सुखसंवादांत आम्ही दंग होत असूं. आठ वर्षांपूर्वी हैद्राबादेस माझे दासबोधावर २॥ महिने सतत प्रवचन होत असे. तेवढ्या वेळांत दासबोधाचे सहा दशक सांगून झाले होते व त्याच वेळीं हैद्राबादकर दक्षिणी स्त्रीपुरुषांचा घरोब्याचा परिचय झाला होता. या खेपेस तर प्रेम-सुखाच्या देवघेवीशिवाय आम्हांस दुसरा विषयच सुचत नव्हता. रसिक गोविंदराव अफझलपूरकर, आमचे विद्यालयकालीन जुने परिचित पुरोहित, शिवभक्त शंकरराव भागले व त्यांची सात्विक गृहमंडळी, वामन नाईक व त्यांची प्रेमळ मंडळी, न्यायमूर्ति केशवराव व असे कित्येक सज्जन यांच्याशींही संभाषणसुखाचे अनेक प्रसंग येत. या पंधरवड्यांतच गोकुळाष्टमीचा उत्सव आल्यामुळें स्वसुखाचा रंग अधिकच चढला. गोकुळाष्टमीच्या दिवशीं दोन प्रवचनें होऊन रात्रीं जन्मोत्सवाचें कीर्तन झालें. सतत बोलण्याचे व फिरण्याचे श्रम, जाग्रणें, नियमित भोजनाशिवाय सर्व प्रकारचा अनियमितपणा, हें अंतः-प्रसन्नतेमुळें बाधले नाहींत. चित्ताच्या उल्हासापुढें अनियमितपणाचे दोषही टिकत नाहींत. आत्मा अजरामर आहे, नित्य तरुण व आनंदरूप आहे. पर-मार्थसंगतींत आत्म्याचें तारुण्य वाढत आहे असें वाटतें, शरीर मात्र वयो-मानानें क्षीण होत जातें. त्यापुढें कोणाचाच इलाज चालत नाहीं. काळाची सत्ता देहावर चालते; आत्मा कालसत्तेला जुमानीत नाहीं. उल्हासाची घडी अखंड टिकायलाही सत्संगच पाहिजे. गोकुळाष्टमीचा सप्ताह घरींच चालू

होता. रोज मायबहिणींचा मेळा घरींच दुपारीं प्रहरभर जमत असे. श्रीकृष्ण-लीलानुकरणाचे गोड प्रसंग आम्हांस पाहावयास व भोगावयास मिळाले. हुबळीचे प्रेमळ कृष्णभक्त सुब्रावबावा उभयकर यांचे घरीं कृष्णजन्मोत्सवाचा आठवडा असाच एकदां आनंदांत गेला होता. तो आनंद यंदा द्विगुणित झाला. परमार्थाच्या आनंदांत श्रोतावक्ता हे भेदभाव लयाला जातात व 'होवोनियां श्रोतावक्ता । करी आपुली आपण कथा' याप्रमाणें श्रीहरि एकलाच नांदत असतो. 'गायन् विलज्जो विचरेदसंगः' हें भागवतकारांचें वर्णन यथार्थ आहे. पुरुष पुरुषपणा विसरतात व स्त्रिया स्त्रीपण विसरतात व उभयत्र पुरुषोत्तमच विलसूं लागतो. हैद्राबादेस सुविद्य, सुसंपन्न व सुविचारी असा स्त्रीपुरुषसमाज आमच्या इंग्रजी मुलखांतील लोकांपेक्षां अधिक धार्मिक, प्रेमळ व भाविक आहे. आमच्याकडे दुस्तर्काचें व फाजील चिकित्सेचें बंड फार माजत चालल्या-मुळें भक्तिसुखाचा खडखडाट उडत आहे. 'तार्किकांचा टाका संग । नुमगे खरें, बुडाल' असा इषारा तुकोबानीं दिलेला आहेच. भाविकपणा बराच वऱ्हाडांत आहे पण त्यापेक्षां अधिक मोगलाईंत आहे. भटजीबापूंसारखे निस्सीम भगवद्भक्त, दंडीस्वामींसारखे योगी व ज्ञानी, टाकळीच्या दाजीमहा-राजांसारखे कर्मनिष्ट तपस्वी या प्रांतांत असल्यामुळें भगवद्भक्तीचें, पूर्वपरंपरेचें, जुन्या हिंदु संस्कृतीचें वळण या भागांत सामान्य जनतेंतही अधिक प्रमाणांत जागृत असलेलें आढळतें.

संसारदुःख विसरवून संसार ब्रह्ममय करून टाकणारी एक संतगुरुमाउली आहे. असो. हैद्राबादेस परम भागवत भटजीबापू हे अनेक जीवांचें विश्रांति-स्थान आहे. यांचें चरित्र 'संतचरित्रमाला' नामक ग्रंथांत आह्मीं दिलेंच आहें. भटजीबापूंची भूतदया, अन्नदानादि सत्कर्म, उपासना, अखंड चालूच आहे. त्यांना आतां नेत्र व कर्ण यांनीं सोडलें आहे, तरी मुखांतून हरि-नामाचें पाठ अजून ऐकूं येतात. त्यांची प्रेमनिर्झरी न आटणारी आहे. अद्याप हे बोलतात, व फार थोडे ऐकतात. धन्य पुरुष आहेत. देह जीर्ण आहे, पण यांची नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा तरुण आहे. यांच्या संगती-पंगतीचा लाभ झाला. शहरापासून ७।८ मैलांवर पर्णकुटिकेंत राहणारे दंडी-स्वामी महान् विरक्त, ज्ञानी व योगानिरत आहेत. आजन्म ब्रह्मचारी असून ७५ वर्षांच्या वयांतही त्यांचें तीव्र अनुष्ठान, उत्साह व बळ पाहून मस्तक कोणासही नमवावेंसेंच वाटतें. उभयतांचाही विनय अपूर्व आहे. कृतकार्य असून अनुद्धत, उदार असून लज्जित, तपःस्वाध्यायनिरत असून नम्र, जीवो-द्धरणसमर्थ असून भूतमात्रीं विनत, अशा या सत्पुरुषांचे गुण कोठवर वानावेत?

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैर्
नवांबुभिर्भूरिविलंबिनो घनाः ।

अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः—
स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥

ह्या सिद्धांताचें वर्म असे सत्पुरुष पाहिल्यानेंच आकळतें. हैद्राबादेस एक श्रीमान् हलवाई उत्तम गुरुभक्त पाहिला. पतीचा छळ सोसूनही सतीधर्माला जागविणारी व गुरुभक्त एक सती पाहिली. अशीं अनेक नररत्नें व स्त्रीरत्नें जगांत आहेत, व म्हणूनच जग चाललें आहे.

मागें झाले, आतां असती, होणार जे पुढें काय ।
त्या भागवतांचे म्यां भावें साष्टांग वंदिले पाय ॥

## ५ आवंढ्या नागनाथ व टाकळी.

हैद्राबाद सोडतांना अनेक स्त्रीपुरुषांचा तो परमार्थजनित प्रेमा पाहून आम्हांसही जड वाटलें. मेजवान्या, पानसुपाऱ्यांचे समारंभ, ना० केशवराव यांच्या अध्यक्षतेखालीं झालेला बडा पानसुपारीचा समारंभ, त्यावेळीं केशवरावांनीं व इतर वक्तयांनीं केलेला प्रेमगौरव, निघण्यापूर्वी भेटावयास येणाऱ्यांपैकीं कित्येक स्त्रीपुरुषांच्या नेत्रांतून वाहणारे प्रेमाश्रुप्रवाह, इ० प्रकारांमुळें गुणगौरवभारानें वांकलेलें चित्त लज्जित होऊन वाटलें कीं, काय समाजाचें हें कारुण्य व दया आहे, या जनीजनार्दनाचा मी एक यःकश्चित् किंकर असून यांचा गौरव हा आशीर्वादपरच आहे. " स्तुति सामान्यतः अहंकाराला व पतनाला कारण होते, पण शुभाशय व प्रेमळ अशा सज्जनांनीं केलेली स्तुति निरहंकारतेला व चित्तशुद्धिद्वारां आपल्या उद्धाराला कारण होते. हे सज्जन पायां पडून पाया पडायला शिकवितात, नम्र होऊन नमायला शिकवितात, देव संतपणाचा निर्मळ भाव ठेवून जगाकडे देवबुद्धीनें पाहायला शिकवितात, स्वतःची देहबुद्धि विसरून देहभावाचे कांटे उपटून टाकतात. यांची स्तुति हे आशीर्वाद् आहेत, यांची पूजा ही देवभावाची जागृति आहे. तस्मात् हेच माझे संत व गुरुमायबाप आहेत. मी यांना शिकवायला बसलों पण हेच मला शिकविणारे माझे गुरु आहेत. जनीजनार्दनाच्या चरणाचा मी रजरेणु आहे. " गाडींत बसून परत येतांना असले विचार मनांत येऊन चित्ताची प्रसन्नता झाली, व तळमळ पार निघून गेली. स्वभावतः स्तुतिप्रिय व उद्धत अशी मनोवृत्ती जनीजनार्दनानें आपल्या निर्मलभावानें धुवून स्वच्छ केली. या चित्तशुद्धीच्या आनंदांत आम्हीं पूर्णास्टेशनवर उतरलों. श्रावण वद्य ३० सोमवार पाहून बैलगाडीनें १४ मैलांवर असलेल्या आवंढयानागनाथाच्या दर्शनास गेलों. तेथें स्नानदर्शनपूजनादि कर्में मनःसमाधानाचीं झालीं. हें स्थान अगदीं एकीकडे एकांतांत आहे. मंदीर फार प्राचीन असून भव्य व नितांत रमणीय आहे. हे प्रख्यात बारा ज्योतिर्लिंगापैकीं आहे. नामदेवासाठीं

देऊळ फिरविलें तें येथेंच ! समोर नामदेवांची समाधि आहे. बाहेर विसोबा खेचरांचें स्थान आहे. शिवभक्तीच्या रसांत विष्णुभक्तीची माधुरी येथें समरस झाली आहे. अशा ह्या पावन क्षेत्रीं दोन दिवस राहिलों. मंदिरांत श्रीवासुदेवानंद स्वामींचे शिष्य गांडामहाराज उर्फ योगानंदस्वामी चतुर्मासार्थ राहिले आहेत. ते टेंभेस्वामींचें ओवीबद्ध चरित्र लिहीत आहेत. त्यांच्याही भेटीगांठी झाल्या. धर्माची ग्लानि दूर व्हावी याविषयीं यांना तळमळ आहे. नागनाथाच्या मंदिरांत दोन दिवस आणखी आनंदांत गेले. लघुरुद्रब्राह्मणसंतपर्णादि झाले. तेथून पूर्णास्टेशनवर उतरून पुन्हां बैलगाडीनें सहा मैलांवर असलेल्या धनगरटाकळीस गेलों. तेथें गोदातीर आहे. यथेच्छ जलविहार झाला. दाजी महाराजांचें दर्शन झालें. प्रसाद त्यांचेकडेच झाला. कर्मनिष्ठ तपस्वी ब्राह्मण महान् सत्पुरुष आहेत. यांची कीर्ति सर्वत्र पसरलीच आहे. तेथून निघून श्रीगणेशचतुर्थीसाठीं नाशकास आलों.

## ६ गणेशोत्सवाचीं आमंत्रणें.

ता. ९ सप्टेंबरला म्ह० बरोबर तीन आठवड्यांनीं मोगलाईंतील प्रवास संपवून आलों तों गणेशोत्सवांतील ७५।८० आमंत्रणांचीं पत्रें घरीं येऊन पडलेलीं पाहिलीं ! सर्वांवर ताण ठाण्याचे मराठी भाषासेवक मित्र विनायकराव भावे यांच्या मुलाची तार कीं, ' आण्णा अत्यवस्थ आहेत व जरूर निघून या. ' मग भोजनोत्तर तसाच पंजाबमेलनें निघून रात्रीं पुण्यास आलों. रात्रभर राहून गणेशोत्सवासाठीं नाशकास गेलों. घरचें श्रीगणेशपूजन यथाविध होऊन दुसरें दिवशीं वऱ्हाडचे फेरीस निघालों. गणेशोत्सवाचीं पत्रें गाडींत वाचलीं. कित्येकांस ' सवड नाहीं, तसदीची माफी असावी ' अशीं उत्तरें लिहविलीं. ३५ आमंत्रणें एकट्या मुंबईंतील व मुंबईच्या आसपासचीं दादर, माटुंगा, विलेपार्लें इ. ठिकाणचीं होतीं ! बाकीच्यांत तंजावरपासून व कुरुंदवाडपासून तो वऱ्हाड सी. पी. पर्यंतचीं होतीं. हें लोकांचें प्रेम अनिवार आहे. सर्व पत्रांस उत्तरेंहि देता आलीं नाहींत.

## ७ वऱ्हाडांत गणेशोत्सव.

नाशकास उत्सवांतलें पहिलें प्रवचन करून रात्रीं नागपूर मेलनें अकोल्यास गेलों. तेथें आमचे स्नेही रा. बापूसाहेब फडके वकील यांचा प्रेमाचा सहवास घडला. दोन दिवसांसाठीं स्पेशल मोटार करून बापूसाहेब व मी वासीमला गेलों. तेथील बालाजीचें भव्य मंदीर पाहिलें. देऊळगांवराजा येथील बालाजीचें संस्थान सर्वोत्तम आहे. त्याच्याच बरोबरीचें हें सुंदर देवस्थान आहे. देवदर्शन करून व भोजन सारून रात्रीं श्रीगणेशोत्सवांत दुसरें

प्रवचन केलें. सकाळीं पुसद येथें गेलों. पुसद येथील लोकांची आस्था व भक्तिभाव पाहून आनंद झाला. तेथें २२ तासांत ३ प्रवचनें व गीतेच्या बक्षिससमारंभांत अध्यक्षपणाचें भाषण झालें. पुसदकरांचा कित्येक वर्षांचा प्रेमाग्रह, तेव्हां यंदा पुसद मुक्रर केलें होतें. आमच्याकडील लोकांपेक्षां वऱ्हाड मोगलाईंतले लोक अधिक भाविक, प्रेमळ, व हिंदुसंस्कृतीला चिकटून राहिलेले आहेत. इंग्रजी विद्या व इंग्रजी संस्कृति आणि रेल्वे यांपासून आपले लोक जितके दूर तितके आपल्या संस्कृतीला धरून असलेले अधिक आहेत ! शहरांतील नाटक, सिनेमा, वर्तमानपत्रांचे व मासिकांचे झगडे, पुढाऱ्यांतील परस्पर असूयाद्वेषादि भाव, चहाफराळांचीं दुकानें, नापिकांचीं स्थानें, ते मस्तकावर क्रप, ते अर्धनास्तिक विचार, देशाविषयीं वाढती भक्ति पण देवा-धर्माविषयीं अनास्था, पिंडपोषणाचे व नटवेगिरीचे बाजार—जाऊं द्यां हा सर्व प्रकार गोविंदसुत चिंचाळकर यांनीं आपल्या नवीन पुस्तकांत ( आधि-भौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा ' ) चटकदार रीतीनें वर्णन केलेला आहे व हा शहरांतला प्रकार खेडोपाडीं पसरत आहे व इंग्रजांच्या राज्या-पेक्षां ह्या अधिभौतिक सुधारणेपासून देशाचें अधिक वाटोळें होत चाललें आहे. परमेश्वर धर्माचा वाली आहे. ' धर्मस्य प्रभुरच्युतः ' तो सांभाळील तरच धडगत आहे. नाहींतर धर्माची हानि होऊन स्वराज्य मिळालें तरी त्याचा काय उपयोग होणार आहे ? धर्मासाठीं स्वराज्य पाहिजे. स्वराज्यसाध-नाच्या प्रयत्नांत धर्महानि होत असेल तर तें स्वराज्य तरी कोणाचें ! असो. वऱ्हाडांत पुसदची आनंददायक फेरी संपवून अकोलामलकापूरमार्गें बुलढाण्यास गेलों. बुलढाण्याचे देशपांडे व क्षीरसागर वकील वगैरे ५-७ मंडळी मलकापूर स्टेशनवरच घेण्यास आली होती. बुलढाण्यास दोन प्रवचनें होऊन परत फिरलों. बुलढाणें उंच टेंकडीवर वसलें असून तेथील हवापाणी उत्तम आहे. गांव टुमदार व थंड हवेचें आहे.

## ८ मुंबईची फेरी.

बुलढाण्याहून थेट मुंबई गांठली. तेथें गणेशापुढें ३–४ प्रवचनें झालीं. मुंबईचा गणेशोत्सव ह्मणजे यंदा बहुधा पुण्यामुंबईच्या राजकारणी लोकांचा ' इलेक्शनच्या ' धामधुमीचा आखाडाच बनला होता ! श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांचें एक व्याख्यान ऐकावयास मिळालें. शास्त्रीपंडित व भिक्षुक आणि गृहस्थ यांचेमध्यें सलोखा व प्रेम वाढावें. तो उलट स्वामींचा शास्त्री पंडित भिक्षुक यांचेवर कटाक्षच दिसला व त्या भरांत वासुदेवानंदस्वामी क्रप ठेवणारांस जवळ येऊं देत नसत याबद्दल ह्या महान् विभूतीवरही थोडी टीका झाली ! हें मला बरें वाटलें नाहीं. टेंभेस्वामी या काळांतले अवतारी थोर

पुरुष होते. हजारों लोकांवर त्यांची छाप पडली आहे. लोकसंग्रहाचें काम सोपें नाहीं एवढें खरें! श्रीगणेशोत्सवांत देवाधर्माचें प्रेम, पूर्वपरंपरेचें रक्षण, समाजसेवेची प्रीति लोकांत उत्पन्न करणें अवश्य आहे. स्वपक्षस्तुति, परपक्ष-निंदा, कडोविकडीचीं भाषणें व भांडणें इ० प्रकार देवतेपुढें गर्हणीय आहेत. मूर्तीच्या ठिकाणीं देवत्वबुद्धि उत्पन्न होऊन तिच्यापुढें आपलीं गाऱ्हाणीं सांगायचीं असतात. श्रीसमर्थांनीं कीर्तनभक्तीच्या समासांत सांगितल्याप्रमाणें देवतोत्सवाचें कार्यक्रम आखावेतः—

भक्तिज्ञानवैराग्य लक्षण । नीतिन्यायस्वधर्मरक्षण ।
साधन मार्ग अध्यात्मनिरूपण । प्रांजळ बोलावें ॥ १५ ॥
प्रसंगें हरिकथा करावी । सगुणीं सगुणकीर्ति धरावी ।
निर्गुणप्रसंगें वाढवावी । आध्यात्मविद्या ॥ १६ ॥
करावें वेदपारायण । सांगावें जनांसी पुराण ।
मायाब्रह्मीचें विवरण । साकल्य वदावें ॥ १९ ॥
ब्राह्मण्य रक्षावें आदरें । उपासनेचीं भजनद्वारें ।
गुरुपरंपरा निर्धारें । चळोंच नेदावी ॥ २० ॥
कीर्तन ऐकतां संदेह पडे । सत्यसमाधान तें उडे ।
नीतिन्यायसाधन मोडे । ऐसें न बोलावें ॥ २२ ॥

## ९ द्वारकेची यात्रा.

आमचे पारमार्थिक स्नेही हैद्राबादचे ‘बाबा’ व नाशीकच्या ‘माई’ यांच्या सत्संगतींत श्रीक्षेत्र द्वारका येथील यात्रेचा आनंद यंदा भोगण्यास मिळाला. बाबा व माई थोर अधिकाराचे प्रेमळ भक्त आहेत. श्रवण जसें सन्मुखानें करण्यांतच लाभ आहे, तशी यात्राहि सत्संगतींतच करण्यांत हित आहे. माई व बाबा यांची अनुभविक कविता बरीच आहे. माईचें एक पद नमुन्या-साठीं पुढें देतों:—

पाजिली भांग अचाट । दाटलें सुख सघनदाट ॥ ध्रु० ॥
सत्संग मसाला चैतन्य भांग । दोहींसी घोटितां एकचि अंग ।
भरिला मनरूपी लोटा ॥
रजःकण शर्करा प्रेमदुग्धदाट । पाजिली मज गटागट ॥ १ ॥
गहिरी भांग गहिरा रंग । निशाही गहिरी झालें मी गुंग ।
नामरूप निमाले ॥
मिळाली वाट गुरुपदीं नीट । गुरुरूप भरलें अफाट ॥ २ ॥
एकाचि तार लागली फार । महावाक्याचा होतसे गजर ।
घडिघडि मूर्च्छा येई ॥

आदळे कपाळ सद्‌गुरुपायीं । मज वेडीचा हा थाट ॥ ३ ॥
ऐसी मी भंगिष्ट छांदिष्ट भ्रष्ट । पागलखान्यांत नांदते स्पष्ट ।
सहजापायीची बेडी ॥
ब्रह्मपिशाच झाले मी वेडी । गुरुचरणाचा हा लोट ॥ ४ ॥

ही चैतन्यभांग पिण्यांत व पाजण्यांत आमचा आठवडा बहारीचा गेला. अशा आनंदांत द्वारकेची यात्रा झाली. द्वारकाधीश भगवान् श्रीकृष्णपरमात्म्याची श्यामसुंदर चतुर्भुज मूर्ति पाहून चित्ताला परमानंद झाला. द्वारका हें चार धामांपैकीं एक धाम आहे. हरिद्वार, जगन्नाथ व रामेश्वर हीं बाकीचीं तीन धामें होत. गोमती व सागर यांच्या संगमावर परमात्म्याची वस्ती आहे व तेथून एक मैलावर रुक्मिणीमातेचें मंदिर आहे. तेंहि सागरतीरींच आहे. मुख्य मंदिरांत बलिराम, देवकी, वसुदेव इ० मंदिरें आहेत. देवी भद्रकाळीचें स्थानही फार प्राचीन म्ह० आद्य शंकराचार्यांच्या पूर्वीपासूनचें आहे. हीच त्यांची शारदांबा. ही आचार्यांची उपासना असून त्यांची गादी द्वारकेंत आहे. गोमती संगमाचीं स्नानें, भगवंताचें स्वहस्तें पंचामृतपूजन, आरती, नैवेद्य वगैरे सर्व यथासांग होऊन अत्यानंद झाला. क्षेत्रास देवासाठीं देवच चित्तांत घेऊन जावें, पंडये वगैरे भिक्षुकांची स्थितिरीतिगति लक्षूं नये, तरच यात्रेचा खरा आनंद होतो. द्वारकेहून ओखा बंदर अगर स्टेशन २२ मैलांवर आहे. तेथून तीन मैल समुद्रप्रवास केल्यावर द्वारकाबेटांत जातां येतें. तेथेंही हाच थाट आहे. असो. आम्ही मुंबईहून अमदाबाद, विरमगांव, राजकोट, जामनगर ह्या रेल्वेमार्गानें गेलों व तसेंच परत आलों. परत येतांना अमदाबादेस दोन दिवस महाराष्ट्रमंडळाच्या आग्रहास्तव राहणें झालें व तेथें प्रवचन व चौंडेबुवांचें कीर्तन झालें.

---

## शहाणपणाचे उद्गार !

ईजिप्त ( मिसर ) देशांतला एक सत्पुरुष म्हणतो:--

१ खळदुर्जनांचा संबंध पडला तर तूं क्षमावृत्तीनें वाग व परमेश्वर त्यांचा यथायोग्य विचार करील असें मान, कां कीं त्यांच्यावर यापुढें दया करण्याचें परमेश्वराचे मनांत असेल.

२ देवाला संपूर्ण चित्त दे. ज्या सहा फूट जमिनीवर तूं निजतोस तीच लबाडीनें मिळविलेल्या सहा हजार फूट जमिनीपेक्षां अधिक आहे असें मान. ( पहिल्या जमिनीवर तुला शांत सुखाची निद्रा येईल. )

---

## ३९ अभेदभक्तीची माधुरी.

उदासीं स्वदासीं न मोक्षादि कांहीं ।
बहू मानिलें भक्तिवांचूनि कांहीं ॥
असें दास्य ज्याचें तया तूज देवा ।
स्वदास्यास मी मागतों वासुदेवा ॥ १ ॥

जो स्वयें रस तयां रस नाहीं । भक्तिमाजि रसही रसनाहीं ।
मुक्तिही न बरि यास्तव लोकीं । भक्ति गोड बहु मानवलोकीं ॥ २ ॥
सुधा जरी गोडचि फार साची । जिभेविणें आपुलिया रसाची ।
गोडी न जाणें, रस ना तिला हो ! । असे असाची तरी भक्तिलाहो ॥ ३ ॥
रसचि मुक्ति, परंतु न जी भली । म्हणुनि तीहुनि भक्ति अजी ! भली ।
तुजहुनी तव दास्यचि सुंदरा ! । बहु सुखप्रद कौस्तुभकंधरा ! ॥ ४ ॥
मेघबिंदु सुखसिंधुचि जाला । पावला जन मुमुक्षु अजाला ।
ऐक्य तों सुरनदीसम भक्तां । ऐक्यही-भजनही अविभक्तां ! ॥ ५ ॥
सहज ऐक्य कळोनिहि मागुती । घडिघडी तुज भक्तचि मागती ।
जसि पितां अमृता न पुरे धणी । निकट दास्य, असें जरि तूं धणी ॥ ६ ॥
फुटोनी जयीं पांख ये शक्ति पक्षीं । न मातेस मानील तो गोड पक्षी ।
पिलूं माउलीलाचि सर्वत्र पाहे । मुखीं अन्न तें माय घाली कृपा हे ॥ ७ ॥
प्रियोत्कंठता स्त्रीस जैसी वियोगीं । मला प्रीति ते दे हरी ! नित्ययोगीं ।
जसी भेटि अत्यंत काळें पतीची । सदा भक्ति ऐसी असो श्रीपतीची ॥ ८ ॥
प्रल्हाद गर्भांतहि आठवीला । त्याकारणें नारद पाठवीला ।
मुक्तींत हे प्रीति न देव दावी । ते मुक्तिची गोष्टिहि कां वदावी ? ॥ ९ ॥
सोनियाचि करितां परिसाची । श्रेष्ठता वदति हे परि साची ॥
त्या महत्व-न तथापिहि हेमीं । भक्ति थोर म्हणतों तसि हे मी ॥ १० ॥

—वामनपंडित [ भक्तिमाहात्म्य ]

नित्यानित्य विचारसार करितां वैराग्य चित्तीं धरी
तो जिज्ञासु मुमुक्षु विष्णुचरणीं सप्रेमसेवा करी ।
ज्ञानें अद्वयभक्ति त्यास कळतां ती गोड मुक्तीहुनी
जीवन्मुक्त मुकुंदभक्ति करितो सर्वात्मभावें मनीं ॥ ११ ॥

—वामनपंडित [ ब्रह्मस्तुति ]

वर वामन पंडितांचे जे अकरा श्लोक दिले आहेत त्यांचें मननसुख वाचकांनीं अवश्य भोगावें अशी आमची फार फार प्रेमाग्रहाची विनंति आहे. ते उगीच वरवर वाचून ठेवूं नयेत तर बदामाच्या दाण्यासारखे फोडून चावून पचवावेत ! मनाशीं **गुणगुणत** मननसुख भोगावें.

उदास म्ह० निरिच्छ निष्काम असे भगवद्भक्त भक्तीवांचून मोक्षादिकांची इच्छाच करीत नाहींत. असें ज्याच्या दास्याचें गोडपण आहे त्या वासुदेवाचें दास्य म्यां न मागावें तर मागावें तरी काय ?

मोक्षरूप परमात्मा रसरूप—आनंदरूप आहे पण त्याला स्वतः तो रस चाखतां येत नाहीं. ( साखर साखरेचा आस्वाद घेऊं शकत नाहीं ); पण भक्तींत रसही आहे व रसनाही आहे ! यासाठींच मी मुक्ति मागत नाहीं; भक्ति फार गोड, तीच मला मानवते ! सुधा गोड खरी, पण तिला जीभ नसल्यामुळें ती आपल्या रसाची गोडी जाणत नाहीं, तिला रसभोग नाहीं. भक्तिसुखाचा लाभ यासाठींच मुक्तीपेक्षां अधिक वाटतो. मुक्ति रसरूप आहे पण तेथें जिभली ( रसास्वादसामर्थ्य ) नाहीं म्हणून भक्ति श्रेष्ठ म्हणतों ! म्हणून वासुदेवा ! तुझ्यापेक्षां तुझ्या दास्याचीच याचना मी करितों. मेघबिंदु सुखसिंधु होतो तसा मुक्तपुरुप परमात्मरूप होतो, पण आम्हांला तसलें ऐक्य नको. गंगा—सागर—संगमाचें आम्हांला ऐक्य पाहिजे, त्यांत ऐक्यही आहे व भजनही आहे ! अभेदभक्तीची गोडी कशालाच यायची नाहीं. देवा ! तुझें व जीवाचें सहज ऐक्य आहे हें कळूनही भक्त तुलाच मागतात. अमृताहून वेगळें राहून तें पिण्याची मौज आहे, तुजशीं ऐक्य कळून तुझें दास्य मागण्यांत तीच मौज आहे. पक्ष्याला पंख फुटल्यावर तो उडून जातो, मग आईला जाणत नाहीं, पण पिलूं अंतर्बाह्य माउलीचें ध्यान करितें व म्हणून त्याला आई प्रेमानें भरवितेहि ! पतीच्या विरहांत सतीच्या मनाची जी दर्शनोत्कंठा असते तशी तुझा नित्ययोग असून मला भक्ति दे ! देवाला भक्तप्रल्हादाचें गर्भांतही स्मरण झालें म्हणून त्याच्यासाठीं नारद पाठविला. भक्ताची जशी देव काळजी वाहातात तशी मुक्ताची वाहत नाहींत ! सोन्यासाठीं परिसाची श्रेष्ठता, नाहींतर परिसाला पुसतो कोण ! भक्तासाठीं देवाचें देवपण ! म्हणून देवा ! तुझी अद्वयभक्ति दे !

---